# भूदान-गंगा

[ आठवा भाग ]



विनोबा



परंधाम विद्यापीठ प्रकाशन

किंमत दीड रुपया

# अनुक्रमणिका



# भूदान - गंगा

## ( भाग आठवा )

### ब्रह्मचर्य, त्याग आणि अहिंसा हे तिन्ही भावात्मक आहेत  : १ :

एकदा रामकृष्णपरमहंसाना एकाने विचारलें कीं, गीतेचें सार काय आहे ? त्यानीं मोठ्या गमतीनें समजावून सागितलें कीं, 'गीता गीता-गीता' अशा प्रकारचा जप करा. गीता गीता या प्रमाणें जोरात म्हणायला लागा, म्हणजे ते तागी तागी होईल. ( बगालींत तागी याचा अर्थ त्यागी असा आहे ) नतर आपल्याला गीतेचें सार समजेल. त्याची समजावून सागण्याची ही एक पद्धत होती ज्या प्रमाणें आपण लहान मुलाना समजावून सागतों तसें ते सागत असत. ते वेदान्त हि समजावून सागत तो विनोदी पद्धतीनें आणि साध्या शब्दात.

#### त्याग हें च गीतेंतील तात्पर्य

त्याग हे च गीतेतील तात्पर्य आहे. त्याला कोणी अनासक्ति म्हणतात, तर कोणी फल त्याग म्हणतात. गीतेत 'मोक्ष-सन्यास' सागितला आहे. त्याचा अर्थ असा कीं, या वेळीं मनाची अशी स्थिति बनते कीं, त्यामध्यें मोक्षाची सुद्धा जरूर उरत नाहीं. मोक्षाचा सुद्धा त्याग गीतेत समजावून दिला आहे. येथें त्यागाची हद्द झाली. येथें मुक्तीचा डाव मुक्तीवर च उलटविला आणि म्हणून त्यासाठीं 'मोक्ष सन्यास' हा शब्द वापरला. शब्द कोणता हि घ्या, तात्पर्य हे आहे कीं, गीता त्याग शिकवते आणि सागायला सकोच वाटतो. परतु भारतीय सस्कृतीचें हें च मूळ आहे. सकोच यासाठीं होतो कीं, असें निश्चयपूर्वक सागण्याला योग्य असें आमचें आचरण नाहीं.

## त्यागप्रधान संस्कृति हें भारताचें वैभव

परतु वस्तुस्थिति अशी आहे कीं, येथील लोकाना त्यागानें युक्त असलेला सदेश ऐकायला जितका आवडतो तितका दुसरा कसला च सदेश आवडत नाहीं. तो पुष्कळ लोकाना अवघड वाटतो. बाबा दररोज गावोगाव फिरतो आणि हजारों श्रोते त्याचा सदेश अत्यत शाततेनें ऐकतात. त्याची अशी एक हि सभा होत नाहीं कीं जीमध्यें लहान मुले, म्हातारे लोक, बायका वगैरे सर्व शाततेने त्याचें म्हणणे विचार ऐकून घेत नाहींत आणि सर्वांचें समाधान होत नाहीं. ज्याच्या जीवनात भोग भोगणें ही गोष्ट मुख्य आहे त्याना हि हे समाधान वाटतें. त्याना बाबानें सागितलेला त्यागाचा सदेश च पटतो – भोगाचा नाहीं. ही हिंदुस्थानातील लोकाच्या मनाची स्थिति आहे हिंदुस्थानातील लोकाची सर्वांत मोठी शक्ति आणि वैभव हें आहे असें मी समजतों. या ठिकाणीं मोठमोठे पर्वत, सुदर नद्या, सर्व तन्हेचें सृष्टिसौंदर्य उपलब्ध आहे. या दृष्टीनें आम्ही भारतभूमि मोठी भाग्यवान आहे असे म्हणू शकतों. परतु हिंदुस्थानचें मुख्य वैभव हें नसून भारतीय सस्कृति त्याग शिकविणारी आहे हें आहे.

येथील शिक्षकानीं आज मला विचारलें कीं, ब्रह्मचर्यासबधीं आम्हाला काहीं साणा. अशी इच्छा करणारे सुद्धा मोठे भाग्यवान असतात. भगवान् शकराचार्यांनीं लिहिलें आहे कीं, मनुष्याला अत्यत भाग्याच्या गोष्टी तीन आहेत. मनुष्यत्व मुमुक्षत्व महापुरुषसश्रय.. म्हणजे मनुष्यजन्म, सज्जनाची सगत आणि मुक्तीची इच्छा. अशा प्रकारें ब्रह्मचर्याचा सदेश ऐकण्याची इच्छा धरणारे हि मोठे भाग्यवान आहेत.

## ब्रह्मचर्य अभावरूप नाहीं

ब्रह्मचर्य अभावरूप नसून भावरूप गोष्ट आहे. परतु लोक त्याला अभावात्मक समजतात. वास्तविक ब्रह्मचर्यांत पुष्कळ गोष्टी करण्याच्या असतात, सोडण्याच्या नाहींत. ब्रह्मचर्यामध्यें समोर जें ध्येय आहे ती च एक वस्तु आहे. उरलेलें सर्व तुच्छ आहे. त्यासाठीं जी ' चर्या ' आहे ती ' ब्रह्मचर्या ' होय. त्यात सर्व बाबतींत मनुष्याच्या जीवनाचा विकास होतो.

## ब्रह्मचर्यासाठीं शिक्षण आवश्यक आहे

ब्रह्मचर्यासाठीं सर्वांत मोठी गोष्ट ही आहे कीं, ब्रह्मचर्यानें वेद वगैरे आध्यात्मिक साहित्य शिकलें पाहिजे. ब्रह्मचर्य ही परिपूर्ण होण्याची साधना आहे. म्हणून त्याचा पाया आध्यात्मिक साहित्याचें शिक्षण होय.

सध्या अशी समजूत झाली आहे कीं, बी. ए., एम. ए. पास झालें म्हणजे शिक्षण संपलें. गृहस्थाश्रमात शिक्षणाची मुळीं च आवश्यकता नाहीं. परंतु उपनिषदातून गृहस्थाश्रमाचें वर्णन केलेलें आहे. त्यात म्हटलें आहे कीं, गृहस्थाश्रम ही अगदीं मौलिक गोष्ट आहे. सर्व जनता त्याचे आधारावर आहे. म्हणून यज्ञ, अध्ययन आणि दान या तीन गोष्टींची जरूरी त्यात आहे. म्हणजे गृहस्थाश्रमात यज्ञ, दान हे आहे च, आणि या तीन गोष्टींचे मध्यें अध्ययनाचें फार महत्त्व आहे आणि ते आवश्यक आहे. उपनिषदानीं यावर आणखी जोर दिलेला आहे. त्यात म्हटलें आहे कीं, 'शुचौ देशे स्वाध्यायम् अधीयान ।' आपल्या घरात एक पवित्र जागा तयार करावी आणि तेथे बसून आपलें अध्ययन करावें. सारांश हा कीं, गृहस्थाश्रमात हि शिक्षण अवश्य आहे.

तप, दान, अतिथिसेवा वगैरे गोष्टी मनुष्याला जगण्यासाठीं जरूर आहेत. परंतु प्रत्येक साधनाबरोबर अध्ययन, अध्यापन जोडून दिलें आहे. वरचेवर सांगितलें आहे कीं, ऋत असलें पाहिजे आणि त्या च बरोबर स्वाध्याय हि. 'सत्य' असलें पाहिजे त्या च बरोबर स्वाध्याय हि आणि इंद्रियावर निग्रह ठेवला पाहिजे व त्या च बरोबर स्वाध्याय हि. वरचेवर एकएका साधनाचें नाव घेऊन त्याचे बरोबर स्वाध्याय जोडला आहे. 'ऋत च स्वाध्याय प्रवचने च, सत्य च स्वाध्याय प्रवचने च ।' अशा प्रकारें अध्ययन व अध्यापनाला इतकें महत्त्व दिलेलें आहे. ब्रह्मचर्याश्रमात हि त्याचें महत्त्व आहे. ज्ञान मिळविण्यासाठीं ब्रह्मचर्याची आवश्यकता मानली गेली आहे. '**सत्येन लभ्यस् तपसा होष आत्मा, सम्यक् ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ।**' म्हणजे योग्य ज्ञानासाठीं ब्रह्मचर्य पाहिजे. या प्रमाणें ब्रह्मचर्याश्रमात अध्ययनाला महत्त्व देण्यात आलें आहे.

याच्यानंतर इंद्रियें, बुद्धि आणि मनाचा विकास करण्याची गोष्ट आहे. कोणत्या तरी एका विशिष्ट इंद्रियाचा निग्रह करणे इतका त्याचा स्थूल अर्थ नाही. वाणी आणि बुद्धि याचा उत्तम उपयोग होणें, कानानें चांगल्या गोष्टी ऐकणें, पुष्कळ ज्ञान ऐकणें, वगैरे सर्व गोष्टी ब्रह्मचर्यांत येतात. तुलसीदासानीं मोठे सुंदर वर्णन केलें आहे '**जिनके श्रवण समुद्र समाना, कथा तुम्हारी सभग सरि नाना । भरहिं निरंतर होहि न पूरे ।**'

समुद्राला असंख्य नद्या येऊन मिळतात, तरी तो भरत नाहीं. या प्रमाणें असंख्य हरिकथा, हरिचर्चा ऐकता ऐकता च आमचे कान भरून जावेत. याशिवाय सतत ज्ञान प्राप्त केलें पाहिजे. या प्रमाणें ब्रह्मचर्याची मोठी व्यापक आणि भावात्मक कल्पना आहे.

### त्याग म्हणजे बीं पेरणें

ही गोष्ट त्यागाला लागू होते. त्याग करणें म्हणजे 'फेकून देणें' इतका त्याचा साधा अर्थ नाहीं. त्याग करणें याचा अर्थ आहे 'पेरणें.' बीं जर असें कसें हि फेकलें तर धान्य उगवणार नाहीं किंवा कमी प्रमाणात येईल. परंतु योग्य तऱ्हेनें पेरलें तर धान्य उत्तम येईल. म्हणून त्यागाचा उद्देश बीं पेरणें हा आहे. त्यापासून खूप उत्पन्न होईल. समाजासाठीं जो त्याग केला जातो तें हि एक पेरणें च आहे. म्हणून त्यागाची व्याख्या सुद्धा भावरूप आहे.

### त्यागाबरोबर क्रोध असूं शकत नाहीं

मी लोकाना सांगतों कीं, आपली जमीन, संपत्ति आणि बुद्धीचा सहावा भाग समाजासाठीं द्या. ही त्यागाची गोष्ट आहे. हिंदुस्थानात खूप प्रेमवृद्धि व्हावी, धान्य उत्पन्न व्हावें, पैसा असावा, शांतता वाढावी असें मी इच्छितो. जर आम्हीं प्रेमानें गरीबाना एक हिस्सा दिला तर समाज एकरूप होतो, शक्ति वाढते, काम करणाऱ्याना प्रेम मिळतें, आणि प्रेमानें प्रश्न सुटू शकतो, शांतता प्रस्थापित होते. हें सर्व त्यागानें होतें. म्हणून गीतेमध्यें त्यागाची कसोटी सांगितली आहे. त्यागानें शांति होईल. कोणीं एखाद्यानें पुष्कळ त्याग केला तर काहीं लोक अतिशय त्यागी झाल्यामुळें अत्यंत रागीट हि दिसतात. तो प्रत्येक गोष्टीला चिडतो आणि दुसऱ्याची साधी,

सोपी, सरळ गोष्ट सुद्धा ऐकत नाहीं. अधिक त्यागी झाल्यामुळें त्याच्या रागावण्यामुळें भीति वाटते कीं, कोण्या एखाद्याला शाप तर देणार नाहीं ? अशा प्रकारें त्यागाबरोबर क्रोध येण्याचें कारण असें कीं, तो खरा त्याग च असत नाहीं. असे लोक 'हें सोडा, तें सोडा' असें म्हणून गोष्टी सोडतात. त्यापासून त्यांना एखादी वस्तु टाकण्याचा अहंकार होतो आणि राग हि येतो. म्हणून जेथें त्यागाचे बरोबर राग येतो तो खरा त्याग च नाहीं. त्यागामुळे शांति निर्माण झाली पाहिजे. त्याग बळजबरीमुळें होऊं शकत नाहीं.

## क्रांतीचें भावात्मक कार्य

सध्या क्रांतीची गोष्ट बोलली जाते; म्हणतात कीं, लोकांचे बुद्धीमध्यें बदल घडवून आणायला बरा च वेळ लागेल. असें म्हणून बुद्धींत बदल घडवायचे ऐवजीं हिंसेनें डोके कापून लौकर काम करून घेतलें पाहिजे. परंतु श्रीमंताचीं डोकीं कापणें याचें नांव क्रांति नाहीं. डोकीं कापण्यानें क्रांति होत नाहीं कारण त्यामुळें त्यांच्या डोक्यात काहीं फरक पडत नाहीं. एका सुखी इसमाला दु:खी करायचें व एका दु:खी इसमाला सुखी करायचें यामुळें त्यांत काय फरक झाला ? समाजांत काहीं दु:खी आणि काहीं सुखी तरी राहिले च. ही काय क्रांति ? विचारांत बदल झाल्यानें क्रांति होते. म्हणून प्रेमानें समजावून सांगितलें पाहिजे. हें भावात्मक काम होईल, त्यापासून धर्म होईल.

लोक म्हणतात कीं, हें काम कायद्यानें लौकर होईल. परंतु ते एक साधी गोष्ट समजत नाहींत कीं, जर सरकार जमीन काढून घेईल तर गांवोगांव खटले चालतील, भांडणें होतील. प्रत्येक गांवांत असंतोष पसरेल. त्यामुळें काय होईल ? भूदानाच्या पद्धतीनें वेळ लागेल असें म्हणणाऱ्यांना मी असें विचारतों कीं, घर तयार करायला वेळ लागतो आणि जाळायला ? जर लौकर करायचें आहे तर काय घराला आग लावणार ? यावरून स्पष्ट होतें कीं जें काम अभावात्मक आहे त्यापासून काम होणार नाहीं.

ब्रह्मचर्य आणि त्याग ज्या प्रमाणें अभावात्मक नाहींत तशी च अहिंसा

सुद्धा अभावात्मक नाहीं. मनात सूप हिंसा चालली आहे आणि हात बाधले आहेत तर ती काय अहिंसा झाली ? युनायटेड नेशन्स् ऑर्गनायझेशनमध्ये काय होते ? काय तेथें अहिंसा आहे ? टेबलावर समोरासमोर बसतात, तलवारीऐवजीं एकमेकाविषयीं मनात अविश्वास ठेवून बसतात. अविश्वास तलवारीचें काम करतो. अहिंसा म्हणजे हातात तलवार न घेणे एवढें च नाहीं. तर हृदयात प्रेम भरलें गेलें पाहिजे. प्रत्येकाचे हृदयात ज्योति असते हें लक्षात ठेवलें पाहिजे. हा भावात्मक विचार होय.

## भौतिक उन्नतीबरोबर आध्यात्मिक उन्नतीची जरूरी

भूदान यज्ञ हें मोठें विधायक काम आहे. लोक म्हणतील कीं, पचवार्षिक योजनेसारखें हें काम आहे. दोन्हीमध्यें काहीं फरक नाहीं. दोन्ही निर्मितीचीं कामें आहेत. तरी हि फरक आहे. ती योजना भौतिक विकासाचे बाबतींत विचार करते. परतु भौतिक विकासाचे बरोबर च आध्यात्मिक विकास हि झाला पाहिजे. फक्त धान्य वाढलें पाहिजे एवढा च उद्देश त्यात नसून प्रेम हि वाढले पाहिजे. प्रेमाबरोबर च धान्य वाढले पाहिजे. विष्णूच्याबरोबर लक्ष्मी असली पाहिजे म्हणजे लाभ होतो. शकराचेबरोबर शक्ति वाढली म्हणजे ती तारक होते शकरापासून ती दूर होईल तर मारक होईल. पचवार्षिक योजनेद्वारे भौतिक फायदा पुष्कळ होईल, परतु तो तारक होणार नाहीं. म्हणून भौतिक आणि नैतिक ह्या दोन्ही गोष्टी बरोबर च झाल्या पाहिजेत. त्यापैकीं एक च गोष्ट घेतली तर ती मारक ठरेल, तारक नाहीं. आम्ही भूदान यज्ञामध्यें आध्यात्मिक उन्नती-बरोबर च त्याला अनुकूल भौतिक विकास व्हावा असें इच्छितों.

पेरिनायकम् पालेयम्
२१-९-'५६

# पूर्ण नीतीची स्थापना हें ध्येय : २ :

ज्या कार्याचा प्रसार व्हावा असें मी इच्छितों तें एक धर्मकार्य आहे. आम्हाला नवे सिद्धान्त स्थापन करावयाचे आहेत आणि पूर्वीचे जुने चुकीचे सिद्धान्त बदलून टाकावयाचे आहेत. पूर्वीचे सगळेच्या सगळे सिद्धान्त चुकीचे आहेत असें मी म्हणत नाहीं. त्यात काहीं चागले काहीं वाईट हि आहेत. परतु अद्याप पूर्ण नीतीची कल्पना स्थापन झालेली नाहीं. आजपर्यंत लोक अपूर्ण नीति चालवीत आहेत. सर्व लोकाना सत्याची जरुरी, योग्यता समजावी असे मी इच्छितों. पूर्वीचे लोक हि असे च म्हणत आले आहेत. परंतु सत्याचा महिमा आजपर्यंत स्थापित झाला नाहीं कारण सत्याबरोबर निर्भयता पाहिजे. पण ती आम्ही अद्याप स्थापित करू शकलों नाहीं.

## शिक्षेच्या भयामुळें असत्य

जर आपल्याला सत्याचा महिमा स्थापन करायची इच्छा असेल तर जे अपराधी लोक आहेत त्याना दडाचे भय असता कामा नये. समजा एखाद्या मुलाने काहीं चुकीचें काम केलें आणि आपण चुकीचे काम केलें आहे हे त्याला समजलें, तरी सुद्धा तो तें लपवितो. ती चूक एखादे वेळीं आपल्या मूर्ख मित्राजवळ प्रगट करतो. पण त्याचा काहीं लाभ होत नाहीं. आपल्या मुलाबद्दल करुणा, प्रेम याव्यतिरिक्त ज्याच्या अतःकरणात दुसरें काहीं असत नाहीं अशा आपल्या आईवडिलापुढें हि ती गोष्ट तो लपवितो. कारण त्याला शिक्षेचें भय वाटतें. कदाचित् आई कमी प्रमाणात शिक्षा करेल म्हणून तो आपलें मन आईपुढें केव्हा तरी उघडें करील.

## सत्यासाठीं निर्भयतेची जरूरी आहे

आपण सत्याची प्रतिष्ठा स्थापन व्हावी असे इच्छितों आणि सर्व सद्-गुणामध्यें श्रेष्ठ गुण ' सत्य ' आहे असें मानतों. सर्व दुर्गुणामध्यें वाईट गुण असत्य आहे असे सागतों आणि ल्हान सहान वाईट गोष्टी केल्या तर

शिक्षा देतो. त्याचा परिणाम असा होतो की, मनुष्य खोटें नाटें करतो आणि ल्हान दोष लपवितो. यामुळें अपराध वाढतात. जे लोक सत्याचा महिमा मानतात आणि त्या च बरोबर शिक्षा हि करतात ते सत्याचे खंडन करतात. ज्या वेळीं एखाद्याने केलेल्या अपराधाबद्दल त्याला दंड, शिक्षा होणार नाहीं त्या वेळीं सत्याची प्रतिष्ठा प्रस्थापित होईल. तोंपर्यंत सत्यावर जोर दिला किंवा सत्य चांगलें आहे असें म्हटलें तरी ती अर्ध-नीति च होते, पूर्ण नीति होत नाहीं म्हणून सत्याचे बरोबर निर्भयतेला महत्त्व दिलें पाहिजे. सर्व तऱ्हेच्या अपराधांना शिक्षेचें भय राहता कामा नये. यावर आपण म्हणाल कीं, यामुळें अपराध वाढतील. तर मग आम्ही म्हणतों कीं, सत्याला इतकें महत्त्व तरी का देता ?

### अपराध हा एक रोग च आहे

ज्या प्रमाणे माणूस आपल्याला झालेले रोग सांगतो त्या प्रमाणें शिक्षा होणार नसेल तर मनुष्य आपले अपराध हि प्रकट करील. जर त्याला असा विश्वास उत्पन्न होईल कीं, केलेले अपराध प्रकट केले तरी लोकांची सहानुभूति आणि अपराधाचें मार्जनासाठीं लोक मदत करताहेत, तर तो ते प्रकट करेल. ज्याला आपण अपराध म्हणतों ते रोग आहेत. रोग आपण लपवत नाहीं. बाबाच्या पोटात ' अल्सर ' हा रोग आहे. बाबा तो लपवून न ठेवता उघड करतो. परंतु लोक जर उद्या असें मानू लागतील कीं बाबाच्या पोटात अल्सर आहे तेव्हा हा खचित अनीतिमान मनुष्य आहे ! तर तो लपवावा असें बाबाला वाटू लागेल. मी असे कित्येक स्वत चा रोग लपविणारे कुष्ठरोगी पाहिले आहेत. हा एक फार भयंकर रोग आहे. थोडा झाला असताना च तो प्रकट केला तर त्यावर उपायाचा उपयोग होतो. परंतु कुष्ठरोग्याबद्दल इतरांचे मनात घृणा निर्माण होते. त्याचा परिणाम असा होतो कीं तो ते लपवितो. शेवटीं जेव्हा तो मोठ्या प्रमाणात वाढतो तेव्हा आपोआपच प्रकट होतो तेव्हा डॉक्टर म्हणतात कीं, तो आता कमी होणार नाहीं. जरी कुष्ठरोग्याला त्यापासून अत्यंत त्रास होत असला तरी तो प्रकट करत नाहीं. जर त्यानें तो लौकर प्रकट केला तर त्याचा त्यापासून फायदा होतो. परंतु जेथें आपल्या एका विशिष्ट

रोगाबद्दल घृणा सुरू झालेली असते तेव्हा रोग्यामध्यें तो लपवून ठेवण्याची प्रवृत्ति उत्पन्न होते.

### एकांगी नीतीची उदाहरणें

सत्याबद्दल आपल्याला आदर असेल तर त्याबरोबर अपराधाना शिक्षा होता कामा नये. अपराध पुन्हा होणार नाहीं अशी काळजी घेतली पाहिजे. परंतु समाजात जर एखादी व्यक्ति अपराध करेल तर ती सज्जन लोकांपुढें प्रकट करेल. त्यामुळें सत्याची प्रतिष्ठा वाढेल. निर्भयता व शिक्षा न करणें याला महत्त्व दिल्याखेरीज आपण सत्याला महत्त्व दिलें तर ती एकांगी नीति होते. त्या च प्रमाणें आपण चोरीला गुन्हा मानतों. परंतु त्यानें चोराला निर्माण केलें त्या त्याच्या बापाला गुन्हेगार मानत नाहीं. जेव्हा मनुष्य संग्रह करून ठेवतो तेव्हा चोरी होते. जर चोरी हा गुन्हा आहे तर संग्रह करणें हा हि गुन्हा होय. परंतु आम्ही संग्रह करणाऱ्याला प्रतिष्ठित समजतो. त्याला गादी तक्क्यावर बसवतों आणि चोराला जेलमध्ये पाठवतों. म्हणजे चोराचें जेल हें ठिकाण आणि शेठसावकाराचें गादी. ही गोष्ट शास्त्राविरुद्ध आहे. शास्त्रात असें सांगितलें आहे कीं, जर आपल्याला 'अस्तेय' हवें असेल तर त्याबरोबर 'अपरिग्रह' हि पाहिजे. दोन्ही बरोबर पाहिजेत. परंतु आजच्या जगात फक्त चोरीला गुन्हा मानला गेला आहे. परंतु 'संग्रह' आणि 'परिग्रह' याला गुन्हा मानला नाहीं. इतकें च नाहीं तर त्याला मान प्रतिष्ठा दिली गेली आहे. ही अगदीं एकांगी नीति आहे. पत्नीला पतीबाबत पुष्कळ प्रेम, निष्ठा असायला पाहिजे ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु पतीला हि पत्नीबद्दल तितकी च निष्ठा असली पाहिजे असें का म्हणत नाहीं? पत्नी जर पतिव्रता असली पाहिजे तर पतीला हि पत्नीव्रत घेतलें पाहिजे. सध्या स्त्री एका वेळीं दोन लग्नें करू शकत नाहीं परंतु पुरुष करूं शकतो. एखाद्या पुरुषाकडून व्यभिचार झाला तर तितकासा गुन्हा मानला जात नाहीं, परंतु तो जर एखाद्या स्त्रीनें केला तर तो गुन्हा मानला जातो. असें का? उपनिषदात तर विरुद्ध लिहिलें आहे. त्यामध्यें एक जण आपल्या राज्यात काय काय चांगल्या गोष्टी आहेत त्यांचें वर्णन करताना म्हणतो कीं 'न स्वैरी, स्वैरिणी कुतः?' माझ्या राज्यात

व्यभिचार करणारा पुरुष च नाहीं तर व्यभिचारी स्त्री कोठून असणार? तात्पर्य हें कीं, जथे दुराचारी पुरुष असतात तेथेसुद्धा स्त्रिया सदाचारी असतात कारण बहुधा स्त्रिया ज्यास्त धर्मनिष्ठ असतात. म्हणून जेथें दुराचारी पुरुष च नाहींत तेथें दुराचारी स्त्री कोठून असणार ? म्हणजे दुराचाराची ज्यास्तींत ज्यास्त जबाबदारी पुरुषावर आहे परंतु सध्याच्या समाजाने तीं जबाबदारी स्त्रियावर टाकली आहे. जबाबदारी समान पाहिजे ना ?

स्त्रियाच्या गळ्यात मंगळसूत्र घातलेलें असतें कारण कीं, तिला पति आहे. परंतु पतीला जर स्त्री असती तरी त्याच्या गळ्यात मंगळसूत्र घालीत नाहींत, म्हणजेच तो बेताल होय. अशा प्रकारें एकागी नीति कधीं प्रतिष्ठा मिळवू शकत नाहीं. पूर्ण नीति च झाली पाहिजे. स्त्रियानीं सतीत्व राखावें असें आपण जर इच्छिले तर पुरुषानीं सत्वाचें रक्षण केलें पाहिजे, दोन्हीवर सारखा जोर दिला पाहिजे.

कोण्या एका स्त्रीचा पति मेला आणि ती विधवा झाली तर तिनें व्रतनिष्ठ राहिलें पाहिजे ही गोष्ट चागली आहे. परंतु त्या च प्रमाणें एखाद्याची स्त्री गेली तर त्यानें हि व्रतनिष्ठ राहिले पाहिजे. तो दुसरी स्त्री का करतो ? हा काहीं मी विनोद करीत नसून असें सागतों आहे कीं, आपल्या समाजातील ही न्यूनता, अपूर्णता, नाहींशी केल्याशिवाय समाजाची प्रगति होणार नाहीं.

### समजून घेऊन त्याग करण्यानें च क्रांति होते

आजपर्यंत समाजात जीं मूल्यें होतीं तीं सर्वच्या सर्व वाईट होतीं अशी गोष्ट नाहीं तीं एकागी होतीं. आणि आम्हाला पूर्ण मूल्य स्थापित करायचें आहे. हा कार्यक्रम आपला आहे असें समजून तो हातात घेणाऱ्या विचारवान् कार्यकर्त्याची सध्या जरूरी आहे. सध्या तामीळनाडमध्यें लोक बाबावर कृपा करून थोडें दान देतात. सभा वगैरेंची व्यवस्था करतात. परंतु मी म्हणतों कीं, बाबावर कृपा करू नका. आपण स्वत वर च कृपा करा. जर या धर्मविचारामुळें आपल्याला आदुन स्फूर्ति मिळत असेल

तर काम करा. तामीळनाडमध्यें मी एकेका माणसाचा चेहरा पाहतों आहें. चेहऱ्यावर तेज आहे का पाणी आहे का तो पिकट आहे हे मी पाहतों आहे. आतापर्यंत त्याच्यात क्रांति आहे असे अगदीं थोडे चेहरे दिसत आहेत. त्यातील पुष्कळसे पूर्वीसारखे च दिसून येतात ते च पूर्वीचें जीवन आणि तो च संग्रह करण्याची पद्धत कायम आहे. बाबा आलेला आहे म्हणून त्याला पाच एकर जमीन देऊन त्याच्यावर उपकार करू नका. बाबाला जमीन घेऊन तरी काय करायच आहे? बाबा तुमच्या हातात क्रांतीचा झेंडा देऊ इच्छीत आहे.

एक श्रीमत खिस्ती इसम येशू खिस्तापाशीं जाऊन म्हणू लागला कीं, मला उपदेश द्या. खिस्त म्हणाले कीं, सर्वांवर प्रेम करा, चोरी करू नका, शेजाऱ्याना मदत करा—द्या तेव्हा तो म्हणाला कीं, या सर्व गोष्टी तर मी करीत च आहे. मला काहीं विशेष असा उपदेश द्या. पुन्हा खिस्त म्हणाले कीं, आपल्याजवळील धन गरिबाना वाटून टाकून माझ्या पाठीमागें या. हें मात्र तो करू शकला नाहीं सारांश, आपल्याजवळ जी वस्तु आहे, तिचा समजून उमजून त्याग जेव्हा केला जाईल तेव्हा क्रांति होते. कायद्याने एखाद्या गोष्टीचा त्याग करायला लावून क्रांति होत नाहीं. कित्येक चोराना १५ २० वर्षे तुरुंगात शिक्षा भोगावी लागते आणि त्यामुळें आपोआप ब्रह्मचर्य पाळलें जातें म्हणून काय त्याच्यामध्य शुकदेवाची योग्यता येईल? जबरदस्तीमुळे जें काम होते त्यामुळे क्रांति होत नाहीं.

## अंतर्निरीक्षण केलें पाहिजे

श्रीमत, विद्वान् अशा लोकानीं संपत्ति, जमीन व बुद्धि या सर्वांचा उपयोग गरीब आणि समाजासाठीं करणे हा आपला धर्म आहे असें समजून पुढें यावें आणि या कामाला चालना द्यावी, हें काम चालू करावे बिहार-मध्यें यापैकीं काहीं थोड झालें आहे येथील लोक म्हणतात कीं, आमच्या येथील जमीन फार किंमतवान् आहे तर काय बिहारमध्यें जमीन मोफत मिळत होती? आमच्या येथें कावेरी नदीचें पाणी आहे असें येथील लोक म्हणतात. तर काय बिहारमध्यें पाणी नाहीं? या ठिकाणीं कावेरी

चांगली झोप लागल्याचे भान होतें. अशा प्रकारें आपण आनंदानें वेष्टिलेलों आहों. आमच्या पुढें मागें, वर खालीं, आत-बाहेर, सगळीकडे आनंद च आनंद भरला आहे. परतु आपल्याला आनंदाचे प्रत्येक क्षणीं भान होत नाहीं. असें समजा कीं, ज्या क्षणीं दुःख नाहीं त्या सर्व क्षणात आनंद च आनंद आहे. कधीं दुःखाचा अनुभव आला तर तो तितका च लक्षात रहातो. परतु चोवीस तास आनंद असतो परतु त्याची आपल्याला आठवण रहात नाहीं आणि त्याचे भान हि रहात नाहीं.

## आनंद मिळवायचा नसून तो शुद्ध करायचा आहे

आनंद च आपले स्वरूप आहे. तें केवळ मनुष्याचें स्वरूप नाहीं, तर दोणातल्या किड्याचें हि स्वरूप आनंदमय आहे म्हणून आनंदाच्या प्राप्तींत काहीं विशेष नसून त्याच्या शुद्धींत वैशिष्ट्य आहे. एखाद्याला बिडी ओढण्यात, तर एखाद्याला दूध पिण्यात, तर एखाद्याला फळफळावळ खाण्यात, तर एखाद्याला भूकी माणसाला खायला घालण्यात, तर एखाद्याला एकादशीचे दिवशीं उपास करण्यात आनंद मिळतो. अशा प्रकारें बिडी ओढणाऱ्यापासून ते उपास करणाऱ्या माणसापर्यंत आणि दुसऱ्याला खायला घालणाऱ्यापर्यंत आनंदाचे कित्येक प्रकार आहेत. परतु त्या सर्वांचें स्वरूप एक च आहे. त्यामुळें एकाग्रता होते. बिडी ओढणारे लोक किती एकाग्रपणें फिरत असतात हे आपण पाहिलें असेल. एक व्यक्ति बिडी पीत पीत बाबाचे स्वागतामध्ये आली. बहुधा असें कोणी करत नाहीं कारण बिडी ओढण्यात लाज वाटते परतु त्या दिवशीं जेव्हा मीं त्याला पाहिलें तेव्हा आनंद झाला. कारण तो आपल्या आनंदात लाज हि विसरला. तो आपल्या आनंदात इतका तल्लीन झाला होता कीं, तो सर्व विसरला. सारांश, बिडी ओढण्यापासून आनंद होवो अगर सद्ग्रंथ वाचण्यामुळें होवो त्याचें स्वरूप एक च आहे. मनुष्याचे जीवनात जितकी शुद्धि निर्माण होईल तितका त्याचा आनंद शुद्ध होईल. म्हणून मनुष्याचें ध्येय आनंदाची शुद्धि व्हावी असें पाहिजे, फक्त आनंद मिळावा एवढ च असता कामा नये.

### आनंद प्राप्त करण्याच्या प्रयत्नांत दुःख होतें

काहीं मोठे मोठे वेदान्ती हि सांगतात कीं, आनद प्रत्येकाला पाहिजे. म्हणून आनद मिळविणें हें एक मोठें ध्येय आहे. परंतु त्याना विचार समजला नाहीं. वास्तविक पहाता आनद मिळविण्यासाठीं कोणाला हि काहीं श्रम कष्ट करावे लागत नाहींत. जर कोणी आनद मिळविण्यासाठीं प्रयत्न करून राहील तर त्याला दु ख होईल एक जण म्हणत होते कीं, 'मला झोंप येत नाहीं.' मीं विचारलें कीं, तर मग काय करता ? तेव्हा ते म्हणाले, झोंपेसाठीं खूप प्रयत्न करतों पण झोंप येत नाहीं. मा म्हणालो, 'प्रयत्न करता म्हणून झोंप येत नाहीं प्रयत्न करणे ही गोष्ट झोंपेच्या विरुद्ध आहे. म्हणून प्रयत्न सोडाल तर झोंप येईल.' म्हणून मनुष्य आनद मिळविण्यासाठीं जितके प्रयत्न करतो तितकें त्याला दु ख होतें. आनद मिळविण्याच्या प्रयत्नात सर्व लोक आहेत हें आपण पहात आहों. परंतु त्याचा परिणाम ते दु खी होण्यात होतो. 'माझ्या जीवनात केवळ आनद च आनद आहे, परिशुद्ध आनद आहे' असें म्हणणारा मनुष्य दुर्लभ च असतो अशा प्रकारें आनद प्राप्त करण्याकरिता प्रयत्न करून सुख प्राप्त करण्याऐवजीं लोकाना हें समजेल कीं, आनद तर आपला वडिलार्जित हक्क आहे तो आपल्याजवळ आहे च त्याला शुद्ध केलें पाहिजे. आपला स्वच्छ श्वासोच्छ्वास चालू आहे हा पहिला आनद होय. म्हणून चोवीस तास आपला आनद चालू आहे परंतु त्याला आपण शुद्ध केलें पाहिजे सर्व समाजशास्त्र, धर्मशास्त्र, नीति शास्त्र याचें असें म्हणणें आहे कीं, आनद शुद्ध केला पाहिजे म्हणजे लोकाना स्वच्छ रीतीनें आनद मिळेल

### शुद्ध आनंद स्वत-ला त्रासदायक होत नाहीं

शुद्ध आनदाचें लक्षण हें कीं, तो स्वत ला त्रासदायक होत नाहीं जो आनद स्वत ला टोंचतो तो खरा आनद नाहीं विडी ओढणारा मोठ्या आनदाने ती ओढतो परंतु थोड्या च दिवसात फुप्फुसें, छाती खराब होतात. आजकाल तर डॉक्टर येथपर्यंत म्हणतात कीं, त्यापासून 'कॅन्सर' होतो म्हणजे तो विडी ओढण्याचा आनद आनदाला घालवितो म्हणून मी ही साधी सरळ व्याख्या करतों कीं, 'जो आनद आनदाला कापतो तो खरा

आहे तर तेथें गगा आहे, गडक आहे. बिहारमध्यें एकराला ५ हजार रुपये पडणारी जमीन आहे. परतु प्रत्येकाला वाटतें कीं, या ठिकाणची गोष्ट वेगळीच आहे. बिहारात जमिनीची काहीं विशेष किंमत असणार नाहीं. आपल्याला आपलीं मुल बाळे आवडतीं—लाडकीं आहेत तर बिहारमध्यें लोकाना त्याचीं मुले बाळें आवडतीं नाहींत ? दोन्हींमध्ये फरक तो काय असू शकतो ? जी आसक्ति या ठिकाणीं आहे ती च आसक्ति त्या ठिकाणीं आहे. परतु तेथील काहीं समजुतदार श्रीमत लोक पुढे आले व त्यानीं लाखोंनी दान दिले आणि या कामाचा झेंडा हातीं घेतला.

बिहारमध्ये हें काम कसें झालें याचा आम्ही विचार करू लागलों तेव्हा त्याचें एक च उत्तर मिळालें कीं, भगवान् बुद्ध, महावीर यांच्या प्रतिभा काम करत आहेत. पुन्हा मी विचार करू लागलो कीं, तामीळनाडमध्यें काहीं सत्पुरुष झाले च नाहींत काय ? या ठिकाणचे मीं वाङ्मय पाहिलें. दोन हजार वर्षापासूनचें साहित्य येथें प्रचलित आहे. " कुरल "पासून सध्याच्या कवीपर्यंत कितीतरी सत या ठिकाणीं झाले आहेत. येथें च शैवसिद्धान्ताचा शोध झाला. रामानुजासारखे मोठे आचार्य झाले. तर या ठिकाणीं काय कमी पुण्य आहे ? गगा च फक्त पुण्य करू शकते आणि कावेरी करू शकत नाहीं ? आम्हाला असें दिसून येत आहे कीं, येथें आमचें सामर्थ्य, तपस्या, पुण्य कमी पडत आहे. ही आम्ही व आपण हि विचार करण्यासारखी गोष्ट आहे. ज्या व्यक्तीला आपली भाषा हि येत नाहीं ती व्यक्ति येथें येऊन आपल्या गावाच्या गरीब लोकासाठीं फिरली आणि आपण नुसते बसून राहिला तर काय ही गोष्ट शोभादायक ठरेल ? आजपर्यंत कित्येक लोक फड वगैरे घेण्यासाठीं आले आणि घेऊन गेले परतु मी येथील जमीन घेऊन काहीं गुजराथमध्यें नेऊन वाटणार नाहीं. म्हणून आपण थोडें अतर्निरीक्षण करावें.

घेलाकिनारू ( कोयम्बतूर )
२३-९-'५६

'भारतीयार' या काव्यात कवि परमेश्वराचे उपकार मानताना म्हणतो कीं, 'तू आमच्यासरिता कोण्यावधि सुखें निर्माण केलीं आहेस.' अशा प्रकारचें ईश्वराच्या उपकारांचें वर्णन धर्मग्रथातून बरेच वेळा येते. परमेश्वरानें कोणतीं कोणतीं सुखें निर्माण केलीं आहेत त्याची यादी हि धर्मग्रथातून मिळते. वस्तुस्थिति अशी आहे कीं, परमेश्वरान फक्त मनुष्यासाठीं च सुखे निर्माण केलेलीं नाहींत, इतके च नाहीं तर तीं प्राणिमात्रासाठीं हि केलेलीं आहेत

## आम्ही आनंदानें बुडून गेलेलों आहों

वास्तविक पहाता ज्याला आपण 'आनद' म्हणतो तो स्वत चें च रूप आहे आनद हे च आमचें स्वरूप. म्हणून आनदाशिवाय एक क्षण देखील जिवत राहणारा एक हि प्राणी असणार नाहीं. आनदाचें भान नेहमीं होत नाहीं परतु त्याचा अनुभव प्रतिक्षणीं येतो. आता आपण सर्वजण येथें मोकळ्या हवेंत बसलो आहों. म्हणून आम्हाला आता किती आनद होत आहे ! परतु जरा नाक बद करून पहा म्हणजे एकाएकीं घाबरे होऊन जाल. ही हवा आम्हाला सतत मिळत आहे त्यामुळें आनद अनुभवाला येत आहे. परतु आपल्याला आता पुष्कळ आनद होत आहे याचें भान आपल्याला होत नाहीं. परतु जर बद हवेच्या कोठडींत आपल्याला बद करून ठेवलें तर बाहेर हवेमुळें किती आनद मिळत होता तें समजेल. ज्याचीं फुफ्फुसें कम जोर झालेलीं आहेत, ज्याला क्षयरोग झाला आहे आणि श्वास घेणें सुद्धा अशक्य झाले आहे, अशा माणसाला आजारी पडण्याचे अगोदर श्वास घेण्यामध्यें किती आनद होता हे समजून येईल आजारी मनुष्य सकाळीं उठून काल रात्रीं गाढ झोप लागली त्या आनदाचे वर्णन करतो. इतराना त्या आनदाचा अनुभव येत नाहीं. कारण दररोज त्याना गाढ झोप लागते. ती गोष्ट त्याना दररोजची असते. परतु आजारी मनुष्याला कित्येक दिवसा पासून चागली गाढ झोप येत नव्हती आणि एखादे वेळीं आली तर त्याला

आनद नाहीं.' आपण असा आनद मिळवितों कीं जो आनदाचा नाश करतो. रात्रीं जागरणें करणें, सिनेमा पाहणें किंवा कादबऱ्या वाचणे यामुळे डोळे बिघडून जातात आणि त्यामुळें वाचणें, पाहणें याचा आनद नाहींसा होतो. म्हणून असं म्हणावे लागेल कीं, मूळचा आनद मिळविण्यासाठीं घातक आनद आम्ही भोगतों. दारू पिण्यामुळें बुद्धि बिघडते. पैसा नाहींसा होतो. आजूबाजूच्या लोकांबरोबर भाडण होतें. पत्नीबरोबर जमत नाहीं. मुलें प्रेम करीत नाहींत अशा प्रकारें दारू पिण्याच्या आनदामुळें इतर आनदाचा नाश होतो. म्हणून पुन्हा सयमाचा प्रश्न उत्पन्न होतो. भाजींत सुद्धा मीठ घालण्याची मर्यादा असते. बेताचें घातले तर चव येते परतु जितकें मीठ जास्त घालाल तितकी चव जास्त येईल असें मात्र नाहीं विशिष्ट मर्यादेपर्यंत च त्याची गोडी टिकते. एका गृहस्थाना गोड खाण्याचा शोक होता. त्यांनीं पत्नीला सांगितलें कीं, शेंगाच्या दाण्याचे लाडू तयार कर. पत्नीने सुदर लाडू बनविले. परतु ते म्हणाले, ' हे अगोड वाटतात. गूळ कमी आहे.' दुसऱ्या दिवशीं त्याच्या पत्नीनें असे लाडू तयार केले कीं ते खूप च झाले पाहिजेत. परतु ते म्हणाले, ' आज थोडे बरे आहेत. ' पत्नी म्हणाली, ' थोडासा च बरा आहे ? आज तर मीं यात शेंगदाणे घातले च नाहींत. फक्त गुळाचा लाडू तयार केला आहे. आता यापेक्षा जास्त गोड मी करू शकत नाहीं.' म्हणजे तो इतका मूर्ख होता कीं, लाडवात फक्त नुसता गूळ च आहे हें देखील तो ओळखू शकत नव्हता. गोड खाऊन खाऊन त्याची चव इतकी बिघडली होती कीं, गोडानें च गोडाला मारलें. म्हणून जेव्हा आपण आनदाला सुद्धा मर्यादा घालतो तेव्हा आपल्याला आनदापासून त्रास होत नाहीं.

### संयम हा आनंदाचा प्राण आहे

एका गरीब इसमानें लॉटरींत एक रुपया घातला. त्याला एक हजाराचें बक्षिस मिळालें आहे असें कळलें तेव्हा त्याला इतका आनद झाला कीं त्याच्या धक्क्यानें तो मरण पावला. त्या आनदामुळें आनदाचा नाश झाला. म्हणून आनदाच्या शुद्धीसाठीं आनदाला सुद्धा मर्यादा पाहिजे. काहीं लोक समजतात कीं, जितकें उत्पादन वाढेल

तितका आनद पण वाढेल. परतु सध्या अमेरिकेमध्ये खूप उत्पादन होतें आहे परतु तेथें आनद वाढलेला नाहीं. तेथें आत्महत्या पुष्कळ होतात. लोक भयभीत झाले आहेत. नेहमीं स्पर्धाईची तयारी करत आहेत. म्हणजे केवळ आनद वाढवत जाण्यामुळे तो टिकू शकत नाहीं. मर्यादेपेक्षा ज्यास्त आनद भोगण्याचा प्रयत्न करणें म्हणजे आनदाचा नाश करणे होय. आनद शुद्धीकरिता शास्त्रकार नेहमीं सयम शिकवतात याच हे च कारण होय वस्तु गोड लागली म्हणून पुष्कळ खाता कामा नये कारण त्यामुळें पोट बिघडेल. आपण आजारी पडू. आनद नष्ट होईल. सयम करण्याला सागितलें ही दु खाची गोष्ट झाली असें लोक समजतात. परतु सयमामध्यें आनद आहे हें न समजणें म्हणजे केवळ मूर्खपणा होय. सयम हा आनदाचा प्राण आहे. म्हणून समाजाची अशी रचना करायला पाहिजे कीं, सयमाची मर्यादा आणि युक्ति समाजाला शिकवली जाईल जो समाज सयम शिकेल तो आनद मिळवील. त्या समाजातील लोकाचा आनद आनदाने नाहींसा होणार नाहीं. अशा प्रकारें जेव्हा सयमाबरोबर आनद असतो. तेव्हा आनदाची शुद्धि होते. आनद प्राप्त व्हावा म्हणून काहीं करायला नको आहे. जें काहीं करायचे आहे ते फक्त आनदाची शुद्धि करण्याकरिता करायचें आहे.

### आनंदामध्यें दुसऱ्याना भागीदार बनवावें

आनदाची शुद्धि करण्याकरिता दुसरी गोष्ट म्हणजे आनदात इतर सर्वांना भागीदार बनविणें ही होय मला या ठिकाणीं सुदर हवा मिळत आहे त्यानें आनद होतो. परतु आपल्याला हवा न मिळाल्यामुळें आपण तडफडत आहा हें मी पहातों तेव्हा मला मिळणाऱ्या सुदर हवेचा आनद मला मिळणार नाहीं मी जेवायला बसलों आहें ताटात सुदर पक्वान्ने वाढलीं आहेत परतु समोर दोन तीन दिवस ज्याला खायला मिळाले नाहीं असा भुकेला मनुष्य रडत आला तर जेवण गोड लागू शकत नाहीं म्हणून शुद्ध आनद जेव्हा दुसऱ्याला आपल्या आनदात आपण सामील करून घेऊ तेव्हा च मिळेल जर आपण स्वत एकटे दुसऱ्याला सामील न करता खाऊ तर तो आनद आपल्याला च तापदायक होतो

## त्यागामुळें आईच्या जीवनांत आनंद असतो

आम्हाला आनंदशुद्धि करायची आहे. त्यासाठीं दोन कामें करायला पाहिजेत —

( १ ) आनंदांत, भोगांत संयम–मर्यादा ठेवणें आणि ( २ ) आनंदांत सर्वांना सामील करून घेणें. आई प्रथम मुलाला खायला प्यायला घालते आणि नंतर स्वतः खाते. म्हणून तिला जो आनंद मिळतो तो शुद्ध आनंद होय. जर उद्यां अशी आई निघाली कीं जी आपल्या मुलांना म्हणेल कीं, प्रथम मी खाणार, नंतर तुम्हाला खायला घालीन, कारण मी हि कमजोर होईन. मग तुमची सेवा कोण करणार ? अशा आईला काय म्हणावें ? परंतु ही च गोष्ट जे स्वतःला 'देशसेवक' म्हणतात ते करतात. देशसेवकाना जर खायला चांगलें मिळालें नाहीं तर आपली सेवा कोण करणार असें आपण लोकांना म्हणतों. देशसेवकाची ही जर युक्ति आई शिकेल तर कोणता कवि मातेवर काव्य रचील ? सध्या आईचे जीवनात शुद्ध आनंद असण्याचें कारण, ती आपल्या मुलासाठीं त्याग करत असते.

सारांश, आनंदशुद्धीचे दोन मोठे सिद्धान्त आहेत. ( १ ) दुसऱ्याना वाटून राहिलेल्याचा उपभोग घ्या आणि ( २ ) जें खायचें आहे, भोगायचें आहे, तें मर्यादेनें–संयमानें भोगा. दुसऱ्याना वाटून सुद्धा नंतर आपण मर्यादेपेक्षा जास्त भोगू लागू तर तें हि चालणार नाही. त्याचा परिणाम म्हणजे दुःख होईल. म्हणून वाटून, सर्वांना देऊन, भोगावें परंतु तें सुद्धा संयमानें मर्यादेनें भोगावें. या दोन गोष्टींशिवाय आनंदशुद्धि होणार नाहीं. परंतु लोक आनंद मिळविण्याच्या च पाठीमागें लागतील आणि जें करायला पाहिजे तें न करता आणि जें करण्याची जरूरी नाहीं तें करतील तर आनंद प्राप्त न होता दुःखाची प्राप्ति होईल.

मधुकरै ( कोयम्बतूर )
२९–९–'५६

: ४ :

जगताची सेवा करण्याकरिता भगवान्-परमेश्वर मोठ्या पुरुषाना इह लोकीं पाठवितो. हा त्याचा व्यवसाय च आहे ' जेव्हा केव्हा जरूर लागेल तेव्हा महापुरुषाना पाठवीन ' असें त्यानें गीतेत सांगितलें आहे. त्यान असा निश्चय केला आहे कीं, जगतात धर्माचा नाश होऊं लागला म्हणजे मोठे लोक येऊन लोकाचीं मने सरळ रस्त्यावर आणतील हें आपण पहात आहोंत. अशा प्रकारचा व्यवसाय परमेश्वराला करावा का लागतो ? याचें उत्तर सध्या कोणाला हि मिळाले नाहीं. वरचेवर मोठ्या पुरुषाना पाठवावे लागणार नाहीं आणि हा नास होणार नाहीं अशी व्यवस्था परमेश्वर का करत नाहीं ? लोक योग्य त्या रस्त्यावर राहतील अशी कायम ठेवण्याची व्यवस्था करावी. पण तो तसें करत नाहीं. आणि का करत नाहीं ? ती त्याच्या मर्जीची गोष्ट आहे वैज्ञानिकानीं सुद्धा हे जाणण्याचा प्रयत्न केला आहे. वैज्ञानिक असा प्रयत्न करत आहेत कीं, असें एक यत्र मिळावे किंवा तयार करावें कीं, जे एकदा सुरु केले म्हणजे तें सतत चालाव. परतु तो प्रयत्न अद्याप साधला नाहीं. ल्हान ल्हान घड्याळें २४ तास चाल्तात. त्याना मध्ये च केव्हा तरा किल्ली देण्याची आवश्यकता पडत नाहीं. २४ तासानतर पुन्हा किल्ली द्यावी लागते काहीं घड्याळें अशीं आहेत कीं ज्याना आठवड्यातून एक दिवस किल्ली द्यावी लागते. परतु अद्याप असें घड्याळ, कीं ज्याला एकदा किल्ली दिली म्हणजे अगदीं प्रल्यापर्यंत चालेल असें, तयार झालेलें नाहीं त्या प्रमाणें वैज्ञानिकाना हें साधले नाहीं तसें च परमेश्वराला हि हें साधलें नाहीं असें दिसतें. किंवा ईश्वराला असें करण्यात च गमत वाटत असावी त्या प्रमाणें समुद्रात एक लाट उत्पन्न होते, पुन्हा खालीं जाते, दुसरी उत्पन्न होते, पुन्हा खालीं जाते, त्या प्रमाणे परमेश्वराचा सुद्धा खेळ चालू असतो वर येणे, पुन्हा खालीं जाणें, पुन्हा वर येणें, पुन्हा खालीं जाणें, हा चैतन्याचा स्वभाव च आहे परतु वर येताना आणि पुन्हा खालीं जाताना सुद्धा शेवटीं तो वर च जात

आहे. ज्याना इतिहासाचा अनुभव आहे ते म्हणतात कीं, या प्रमाणें जगाचा विकास च होत चाल्ला आहे.

## संतपुरुष आणि युगपुरुष

महापुरुषाचे दोन प्रकार असतात. एक असे महापुरुष कीं जे नेहमीं च कांहींना कांहीं सूचना देत राहतात आणि लोकाना सरळ मार्गावर ठेवण्याचा प्रयत्न करतात. असे महापुरुष 'सत्पुरुष' या नावानें ओळखले जातात. ते लोकाना थोडाफार उपदेश हि देतात. कांहीं लोक त्याचा उपदेश पूर्णतेनें अमलांत आणतात तर कांहीं लोक त्याच्या कांहीं गोष्टी च मानतात. जे लोक त्याच्या गोष्टी मानतात त्याना त्यापासून लाभ होतो आणि जे मानत नाहींत त्याना त्यापासून लाभ मिळत नाहीं. परंतु सत्ताची कोणावर हि शक्ति नाहीं. ते असें मानतात कीं, आमची आज्ञा कोणावर हि चालता कामा नये. आपली सत्ता दुसऱ्यावर चालावी, आपल्या म्हणण्याप्रमाणें त्यानीं वागावें, ह्या गोष्टी त्याना बऱ्या वाटत नाहींत. अशा सत्पुरुषाना परमेश्वर पाठवितो. म्हणून ही दुनिया चालली आहे. या साधुपुरुषाचे द्वारा या यंत्राला स्नेहन घातलें जातें. आणि त्यामुळें तें घर्षण न होता चालतें. याच्याशिवाय तो कांहीं असे हि महापुरुष पाठवितो कीं जे दुसऱ्या प्रकारचे असतात. ते एका सर्वसाधारण नीतीचा उपदेश देतात. पण त्यामुळें ज्या काळांत त्याची आवश्यकता असते त्याची पूर्तता होते. जेव्हा लोकाना आवश्यकता असते आणि त्या वेळीं अशा साधूचा उपदेश मिळतो व दोन्हींचा मेळ होतो. म्हणजे त्या वेळीं आवश्यकता असते ती भागते, त्या वेळीं ते पुरुष 'युगपुरुष' होतात. म. गांधी अशा प्रकारचे युगपुरुष होते.

## इंग्रजांनीं केलेला प्रयोग फार भयंकर होता

इंग्रजानीं हिंदुस्थान आपल्या हातांत घेतल्यानंतर एक मोठा पराक्रम केला. यापूर्वी कोणीं हि असा भयानक प्रयोग करण्याचें धाडस हि केलेलें नव्हते. ज्याच्यावर सत्ता चालवली गेली आणि ज्यानीं ती चालवली त्या दोघाच्या हि दृष्टीनें तो प्रयोग फार भयंकर झाला. त्यानीं संपूर्ण देशाला निःशस्त्र केलें. कोणत्या हि बादशहानें दोघाना हि ज्याच्यापासून धोका,

संकट आहे असा प्रयोग केला नव्हता. जे सत्ता चालविण्याची इच्छा करतात त्याच्यावर त्याच्यावर सत्ता चालवावयाची त्याचे रक्षणाची जबाबदारी येते. जर बाहेरुन हल्ला झाला तर प्रतिकार करायला लोक तयार नाहींत म्हणून सरकार भयभीत असतें. म्हणून त्याच्यासाठीं तो प्रयोग धोकादायक होता. त्याच्यावर हा प्रयोग केला गेला त्याच्या दृष्टीने हि तो धोक्याचा होता च कारण नि शस्त्र बनल्यामुळे आपला स्वतःचा देखील बचाव करु शकत नव्हते ते. परतु असा धोकादायक प्रयोग त्यांनीं केला. त्याचा परिणाम असा झाला कीं, हिंदुस्थानच्या लोकामध्यें डोकें वर काढण्याची शक्ति राहिली नाहीं. ते कायम भयभीत बनले. प्रजेला अभय देणे हें राजाचें कर्तव्य आहे. आमच्या राज्यव्यवस्थेत अभयदानाला पार महत्त्व दिलें गेलें आहे. परतु इग्रजाच्या या भयकर प्रयोगामुळे हिंदुस्थानची कबरच मोडली गेली.

## गांधीजींचा असहयोगाचा मार्ग

आता विरोध करण्याची आवश्यकता निर्माण झाली. त्यासाठीं एखादी निःशस्त्र शक्ति पाहिजे होती. हिंदुस्थानात जर ही आवश्यकता निर्माण झाली नसती तर त्याला नेहमीं मानहानीनें रहावें लागलें असतें —— गुलाम रहावें लागलें असतें. अशा योग्य वेळीं म. गाधी तेथें आले. ते म्हणू लागले, ' आत्म्यामध्ये शक्ति आहे, शस्त्राची जरुरी नाहीं. सरकारला आम्हीं च डोक्यावर घेतले आहे आणि आम्हाला वाटेल तर आम्ही त्याला खालीं टाकू. प्रजेच्या सहकार्याशिवाय कोणत च सरकार आपली सत्ता चालू शकत नाहीं. म्हणून आम्ही सर्व एक होऊ आणि एक मागणी करु. आणि जर ती पूर्ण झाली नाहीं तर सत्तेशीं असहकार करु. ' ही सतपुरुषाची शक्ति होती. ते म्हणतात, ' आम्ही असहयोगासाठीं जितकें सहन करायला लागेल तितकें सहन करु. ही या प्रकारची शक्ति सतपुरुषामध्यें च असू शकते.

## गाधीजींनीं जीवनांत बदल केला

ज्या ठिकाणीं महापुरुषाच्या सदुपदेशामुळे लोकाची आवश्यकता पूर्ण होते तेथें ते सतपुरुष ' युगपुरुष ' होतात. ही गोष्ट महात्मा गाधींच्या बाबतींत अक्षरशः घडली. हिंदुस्थानच्या एका मोठ्या ऐतिहासिक गोष्टीची पूर्तता

करण्याकरिता एखादी शक्ति उत्पन्न व्हावयाला पाहिजे होती. मी पुष्कळ वेळा सांगतो की, जर म. गांधी नसते तर दुसरा कोणी हि एखादा महापुरुष निर्माण झाला असता. कारण ईश्वरी योजनेमध्ये इतका मोठा विशाल देश नेहमी दुसऱ्याचा गुलाम म्हणून राहील असे असणार नाही. म्हणून या शक्तीचा प्रकार होणे हें आवश्यक होतें. गीतेत भगवान् कृष्णानीं सांगितलें आहे, 'तू ही गोष्ट करायला निमित्त मात्र हो.' त्याप्रमाणें भगवंतानें म. गांधींना उत्पन्न केलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, मातींतून मनुष्य निर्माण झाला, आणि मनुष्यापासून देवताची निर्मिति झाली. तो पुरुष एकटा नव्हता. सर्वांना त्यानीं वाट दाखविली आणि त्यामुळें लहान लहान मुलें सुद्धा मोठ्या धैर्यानें स्वराज्याचा मंत्र म्हणू लागली. असा युगपुरुष जेव्हा उत्पन्न होतो तेव्हा तो आपल्या जीवनाला अत्यंत लाभदायक होतो. त्यामुळे आपल्या जीवनाचा विकास होतो.

पुष्कळ वेळा लोकाना आश्चर्य वाटतें कीं, म. गांधींनीं जीवनाच्या विशी विविध भागाना वेगवेगळ्या प्रकारची शिकवण दिलेली आहे. समाजशास्त्राच्या बाबतींत त्यानीं पुष्कळ सांगितलें आहे. राजनैतिक गोष्टींबाबत त्याना पुष्कळ सांगायचें होतें. नई तालीमचे बाबतींत ते पुष्कळ सांगत हि असत. ग्रामोद्योग मोडता कामा नयेत असें ते सांगत असत. राष्ट्रीय एकता आणि भाषेची एकता या बाबतींत ते बोलत असत. स्पृश्यास्पृश्य हा भेद मिटला पाहिजे असें त्याना सांगायचें होतें. अशा प्रकारें अनेक प्रकारची शिकवण जीवानाच्या वेगवेगळ्या भागात जिची आवश्यकता असते ती दिली. जगातील विविध ग्रंथ त्यानीं वाचले असावेत आणि त्यातून हे सर्व विचार निघालेले असतील अशातली गोष्ट नाहीं. ही विद्या पुस्तकात असत नाहीं जो आत्म्याचें स्वरूप समजू शकतो त्याच्याजवळ ही शक्ति असते त्याला हा विचार सहजासहजीं समजू शकतो.

### मार्गदर्शक आणि सेवक

शंकराचार्य महान् पुरुष होऊन गेले. रामकृष्णपरमहंस सुद्धा महान् पुरुष होते. त्यानीं जीवनातील सर्व तऱ्हेच्या गोष्टी लोकाना शिकवल्या आणि लोकांच्या जीवनात बदल घडवून आणला. ते सूर्याप्रमाणें लांब

राहून प्रकाश देत शंकराचार्य उच्च आकाशात आहेत असे वाटतें. रामकृष्ण सुद्धा एखाद्या तेजस्वी ताऱ्याप्रमाण आकाशात राहून प्रकाश देत आहेत. सूर्याचें किरणापासून आम्हाला आरोग्य मिळतें. परंतु शरीराच्या एखाद्या भागाला सूज आली आणि त्याला शेकायचे असेल तर सूर्यकिरणाचा उपयोग होणार नाहीं. त्यासाठीं अग्नीची जरुरी आहे, कीं जो आपली दासाप्रमाणें सेवा करेल. सूर्यनारायण तर आपला गुरु आहे, दास नाहीं. तो प्रकाश देईल आणि त्या प्रकाशात आपल्या बुद्धीनें आपण श्रम केले पाहिजे. तो आपला मार्गदर्शक होऊ शकतो, सेवक नाहीं. परंतु अग्नि हा आपला सेवक बनतो. तो आपल्या जवळ इतका येतो कीं मनुष्य अग्नीला उत्पन्न हि करू शकतो. पूर्वी लाकडें एकमेकावर घासून अग्नि उत्पन्न केला जात असे. सध्या आगपेटी ठेवली जाते आणि तेल टाकून विस्तव पेटवता येतो. जेव्हा आपल्याला पाहिजे तेव्हा अग्नि आपल्याजवळ येऊ शकतो. आपण काडेपेटी खिशात नेहमीं ठेवू शकतो. अग्नि आपला मित्र आहे आणि मार्गदर्शक हि आहे. आणि मार्गदर्शक असताना हि तो आपला सेवक होतो ही एक नेहमींच्या बोलण्यातली भाषा आहे. त्या च प्रमाणे सूर्य सुद्धा दूर दूर राहून आपली सेवा करतो.

जर सूर्यनारायण नसता तर अग्नींत जी शक्ति आहे ती हि राहिली नसती. त्या च प्रमाणें शंकराचार्यांसारखे युगपुरुष झाले नसते तर गांधीजीसारखे युगपुरुष झाले नसते. शंकराचार्य वगैरे पुरुष उदास राहून दुनियेची जी सेवा करताहेत त्याची किंमत कमी नसून फार मोठी आहे. मी सत्पुरुषाची तुलना करीत नाहीं कीं कोण मोठा कोण लहान हें सांगत नसून सत्पुरुषाचे प्रकार सांगत आहें. दोघांच्या आपापल्या वागण्याच्या पद्धती असतात.

### श्रीकृष्ण लोकविलक्षण महापुरुष

परंतु म. गांधींच्यामुळे कोणाला कसली भीति वाटत नव्हती. लहान मुलाना ते आपल्याप्रमाणें च एक लहान आहेत असें वाटे. म्हणून ते त्यांच्याबरोबर खेळत असत. बहिणींना वाटत असे कीं, ही आपली एक बहीण च आहे. म्हणून बहिणी बहिणी जशा एकमेकींत गोष्टी करतात तशा त्यांच्याशीं

करत असत. राजकारणी लोकाना वाटे कीं, ते एक राजकारणी आहेत म्हणून ते त्याच्याशीं चर्चा करीत. एखाद वेळीं वादविवाद करीत. कोर पुन्हा त्याच्याशीं झगडा करीत. गांधी त्याचें म्हणणें कधीं कधीं मान्य हि करीत. शास्त्रात असें सांगितलें आहे कीं, मुलांशीं अशी वागणूक ठेवावी कीं, त्याची मर्जी त्यामुळ जाणार नाहीं. ते त्या मुलांचें काम करीत होते. म्हणून लोकाना असें वाटत होतें कीं, ते आमच्यातले च एक आहेत त्यांच्यासारखी बुद्धि आणि त्याना मिळालेला अनुभव दुसऱ्या लोकाना नव्हता तरी पण लोक त्याच्याशीं वादविवाद, चर्चा करू शकत असत. त्यांची गोष्ट मानली च पाहिजे असें नव्हतें. त्यांच्यावर ते रागवत, रुसत. या प्रमाणे हा एक अगदीं आपल्या कुटुंबातला मनुष्य आहे असें लोकाना वाटत असे.

असा च एक पुरुष पाच हजार वर्षांपूर्वी येथें होऊन गेला. त्याचें नाव 'श्रीकृष्ण.' त्याच्यात सूर्याची आणि अग्नीची योग्यता होती. त्याला अर्जुन म्हणतो, 'अरे कृष्णा, लढाईची वेळ आहे. सारथ्यकर्म करणाराची जरूरी आहे.' कृष्णानें सांगितलें, 'मी तयार आहें. तुझा सारथी होईन.' घोड्याची चाकरी करायला सुद्धा ते तयार होते. म्हणजे च हा कोणीतरी वेगळा आहे असें अर्जुनाला माहीत नव्हतें. ही शक्ति कदाचित् म. गांधींच्यामध्य नसावी. म. गांधींना 'बापू, या ठिकाणीं घाण आहे, जरा झाडा' असं म्हणण्याची आमची हिंमत नव्हती. इतकें अतर तर राहणार च. जरी गांधींनीं भंगीकाम केलें आणि झाडूकाम केलें. झाडायचें आपलें काम आहे, गांधींना तें सांगता उपयोगी नाहीं, एवढें भान आपल्याला राहत असे. परंतु श्रीकृष्णासंबधीं हें हि भान विसरलें गेलें होतें म्हणून श्रीकृष्णासारखे श्रीकृष्ण च झाले. संपूर्ण हिंदुस्थानात त्याला 'गोपाळ च' म्हणतात म्हणजे आदरार्थी 'आपण' शब्द वापरीत नाहीं 'तू' वापरता. जणू वाटतें कीं, तो आपला दोस्त, मित्र च आहे. म्हणून त्याच्याबरोबर भाडणें होत. आपापसात लढाया होत. आणि त्याला एखाद्या साध्या नोकराला ज्या प्रमाणें हलकें काम देतों तसलें देत. ही नम्रतेची सीमा झाली. ज्या ठिकाणीं महापुरुषाच्या महापुरुषत्वाचा विचार

च राहत नाहीं अशी त्याची अवस्था त्या वेळीं झाली. शेवटीं अर्जुनानें भगवानाचें विश्वरूप पाहिलें तेव्हा तो घाबरला. तेव्हा त्याला ज्याच्याशीं आपण बोलत आहो तो कित्ती मोठा आहे याचें भान झालें. ज्याला अग्नि समजलों होतो तो अग्नि नसून सूर्यनारायण होता. आम्हीं याचा अपराध केला आहे. याला मित्र मानलें. तरी हि तो म्हणतो, 'तू इतका मोठा आहेस तरी सुद्धा मी तुला मित्र मानतों.' तो 'तू च' असे संबोधितो, 'आपण' असे नाहीं. गीतेंत आम्ही त्याला असे सांगताना पाहतों कीं 'मी गुन्हेगार आहे, मला माफ कर.'

'एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ।'

फक्त एक च वेळ तो 'को भवान्?' आपण कोण आहात? असें म्हणतो. आणि एक वेळ क्षमा मागितल्यानंतर तो पुन्हा 'तू' असे च संबोधितो. हा मोठेपणा भगवान् श्रीकृष्णांत च होता.

'भारतीयार'नें 'कडन्'वर एक काव्य लिहिलें आहे. तो कधीं आई बनून सेवा करतो, तर कधीं मुलगा, कधीं भाऊ, कधीं बाप, कधीं मित्र, कधीं गुरु तर कधीं शिष्य होतो आणि कधीं शत्रू हि होतो.

### कृष्णासारखे च गांधीजी

भारताचें हें महद्भाग्य आहे कीं या देशांत असे महापुरुष झाले. त्या भगवान् श्रीकृष्णाचे कोटींतले च महात्मा गांधी होते. म्हणजे त्यांच्याजवळ कोणाला हि संकोच वाटत नसे. त्याचा परिणाम असा झाला कीं लोक जीवनाच्या हरएक विषयांत त्यांना विचारीत असत. जेव्हां कधीं आश्रमवासी मनुष्याचें पोट दुखे तेव्हा तो जाऊन गांधीजींना विचारी. मी मित्रांना सांगत असें, 'अरे, तुम्ही कशीं माणसें आहात! साधी पोटदुखी आहे तर त्यासाठीं बापूजींना काय विचारतां?' परंतु ते ऐकत नसत. सर्व लहान-सहान गोष्टींसाठीं हि ते त्यांचे जवळ जात आणि ते सुद्धा आपलें सर्व काम सोडून एक दोन मिनिटें त्याच्यासाठीं खर्च करीत. आतां त्यांचीं मोठीं लांब-लचक पत्रें छापलीं जात आहेत. त्यांत हि आपण पहाल कीं 'हें औषध घेतलें कीं नाहीं, आजार कोणता आहे' या गोष्टी लिहिल्या आहेत. अशा

प्रकारें ते दुसऱ्याच्या जीवनाचे बाबतींत विचार करीत असत. हा त्यांचा गुण नाहीं तर लोकांचा गुण आहे कारण लोक च त्यांना निरनिराळे प्रश्न विचारीत असत. म्हणून बापूजींना विचार करणें भाग पडत असे. आम्हीं शंकराचार्यांना असें विचारलें असत का कीं माझें पोट दुखत आहे, मी काय करूं ? परंतु गांधीजींचें हें वैशिष्ट्य होतें.

## गांधीजींच्या शिकवणुकीचें चिंतन करा

असा एक महापुरुष भारतात झाला हें आमचें भाग्य आहे. त्यांना गेल्याला आज आठ वर्षें होत आहेत. आम्ही सर्व त्यांना कधीं हि विसरू शकत नाहीं त्यांनीं सर्व कांहीं आम्हाला दिलें. जर कोणत्या एखाद्या गोष्टीचा ते आग्रह धरीत तर ती गोष्ट ही कीं ' प्रत्येकानें आपल्या बुद्धीनें काम केलें पाहिजे, दुसऱ्याची गोष्ट प्रमाण मानून नव्हे. ' आज बापूजी आमच्यात हयात नाहींत. त्यांचे उपदेश च आमच्याजवळ आहेत. आमचें हें कर्तव्य आहे कीं त्यांनीं आम्हाला जो प्रकाश दिला त्यात आपल्या पावलांनीं आम्हीं चालावें. आज हिंदुस्थानासमोर हा प्रश्न आहे कीं त्या ' राष्ट्रपित्यानें ' आम्हाला जीवनाच्या सर्व प्रकाराविषयीं विचार आणि आदेश दिले आहेत. आम्ही त्यांचा तसा उपयोग करतो का ? हा प्रश्न नेहमीं च आमच्यापुढें उभा राहील यांचें उत्तर आम्हाला दिलें पाहिजे. आम्ही त्यांचें स्मरण करतों तेव्हा आम्ही स्वत वर च उपकार करतों. त्यांचे स्मरणानें च आमचें कार्य होईल असा च आम्हीं विचार केला पाहिजे. मी असें म्हणू इच्छितों कीं, हिंदुस्थानच्या पुढें आज असे कोणते हि प्रश्न नाहींत कीं ज्यांचीं उत्तरें महात्मा गांधींनीं दिलीं नाहींत. पुढें असे प्रश्न येतील परंतु आजपर्यंत आले नाहींत म्हणून त्यांनीं दिलेल्या आदेशाचें आम्हीं चिंतन केलें पाहिजे.

## गांधीजींचें कालदर्शन : नयी तालीम

स्वराज्यप्राप्तीनंतर काय काय अडचणी येतील याचा विचार ते दहा वर्षें आधीं करीत. स्वराज्यप्राप्तीच्या आधीं दहा वर्षें त्यांनीं ' नयी तालीम मूलोद्योगी शिक्षण देयाला दिलें आणि सांगितलें कीं ' हिंदुस्तानला ही

माझी शेवटची आणि सर्वश्रेष्ठ देणगी आहे.' स्वराज्य प्राप्त झाल्याला सात-आठ वर्षें झालीं तेव्हा ध्यानात येत आहे कीं देशाला या नव्या शिक्षणाचा उपयोग होईल. आता हें सुचण्याचें कारण कीं कॉलेज आणि हायस्कुलातील विद्यार्थी उद्धट झाले आहेत जेव्हा आम्हाला असें दिसलें कीं, ते ऐकत नाहींत, शिकत नाहींत, तर उच्छृंखल झाले आहेत आणि देशकार्याला अयोग्य ठरत आहेत, तेव्हा नयी तालीम आठवत आहे.

जेव्हा समोरील खाबावर तो आपटतो तेव्हा आधळ्याला कळतें. डोळसाला दुरून च खाब दिसतो. आम्ही असे आधळे आहोंत कीं एका डोळसाने आम्हाला सागितलें कीं मित्रा, इथें खाब आहे तरी आम्ही ते विसरलों आणि खाबावर आपटलो. १५ ऑगस्टचा दिवस. पहिला च स्वातंत्र्यदिन होता. एका सभेंत माझें व्याख्यान होतें मीं सागितलें कीं नव्या राज्यात जुनें निशाण एक क्षणभर हि चालणार नाहीं. जर नव्या राज्यात जुनें च निशाण राहील तर जुनें च राज्य चालू आहे असा त्याचा अर्थ होईल. जसें नव्या राज्यात जुनें निशाण चालणार नाहीं, त्याप्रमाणें च नवीन राज्यात जुनें शिक्षण चालणार नाहीं परतु आम्हीं तें च चालविलें आहे. आम्हाला आता कळू लागलें आहे कीं, त्या शिक्षणामुळें काहीं फायदा नाहीं.

### युगानुकूल सूत्रयज्ञ

दुसरें उदाहरण देतों. गाधीजींनीं अनेक वेळा सागितलें होतें कीं, ' देशाच्या उन्नतीसाठीं खादी आणि ग्रामोद्योग अत्यत आवश्यक आहेत. म्हणून प्रत्येकानें सूत कातलें पाहिजे. ' जसें इग्लडातील प्रत्येक विद्यार्थ्याला पोहावयास आलें पाहिजे, कारण त्या देशाभोंवतीं समुद्र आहे, त्या च प्रमाणें ज्या देशात जमीन थोडी आहे आणि लोकसख्या अधिक, त्या ठिकाणीं प्रत्येक मुलाला सूत कातण्यास शिकवलें पाहिजे. हे देशाचें सरक्षण आहे. परमेश्वर करो, विश्वयुद्ध न होवो आणि त्यातून हिंदुस्थान देश वाचो परतु समजा, विश्वयुद्ध झालें आणि एक बॉंब मुबईतील गिरण्यावर, दुसरा अहमदाबादच्या गिरण्यावर आणि तिसरा या शहरावर पडला तर सर्वच्या सर्व मजूर खेड्यात पळून जातील ते गावागावाहून पोट भरण्यासाठीं तिथें आले

आहेत मरण्यासाठीं नव्हे. तेव्हा भारताची काय अवस्था होईल? लोकांना नग्न रहावें लागेल. म्हणून सरकारला सर्वप्रथम आणि मोठें हें काम केलें पाहिजे कीं, मोठमोठ्या शहराच्या रक्षणार्थ शस्त्रशक्ति उभी केली पाहिजे. त्याकरिता इतका खर्च करावा लागेल कीं गरिबाची कांहीं हि सेवा होऊ शकणार नाहीं. म्हणून यात आम्हाला कोणता च फायदा दिसत नाहीं. याऐवजीं आपण प्रत्येक मुलाला सूत कातणें शिकवाल तर देश वाचेल. यज्ञ समजून हें केलें पाहिजे. प्राचीन काळीं जंगल जाळणें यज्ञ समजला जाई. परंतु आज जंगल वाढविलें पाहिजे. म्हणून वृक्ष लावणें यज्ञ होईल. या च दृष्टीनें मी म्हणतों कीं आपल्याला यज्ञ म्हणून कांहीं समिधा तोडल्या पाहिजेत. पूर्वी विद्यार्थी गुरूच्या घरीं समिधा तोडून नेत असे आणि म्हणत असे कीं मी आपल्या सेवेसाठीं आलों आहें. म्हणजे च जंगल कापणे एक सेवा मानली जात असे. अशा प्रकारे काळाबरोबर यज्ञाचे स्वरूप हि बदलतें. महात्मा गांधींनीं सांगितलें होतें कीं, देशाच्या रक्षणासाठीं प्रत्येकाला सूत कातणें यायास पाहिजे. आणि देशासमोर उदाहरण ठेवण्यासाठीं रोज न विसरता तें सूत कातीत असत. आणि परमेश्वराच्या कृपेने शेवटच्या दिवशीं हि त्यांनीं सूत कातलें. जर परमेश्वराची इच्छा असती तर त्याच्या मतात तो रात्र पाडू शकला असता. आणि सायंकाळीं पांच साडेपांचच्या ऐवजीं दोन तीन वाजताच त्यांना घेऊन गेला असता. परंतु ईश्वर भक्ताचा बाणा मोडू देत नाहीं. म्हणून च त्या दिवशीं त्यांचे हातून सूत कातलें गेलें. हें त्यांचें उदाहरण आम्हाला शक्ति देतें.

## भूदान यज्ञ गांधीजींच्या मार्गानेंच जात आहे

जिथें त्यांचा उपदेश उपयोगी पडणार नाहीं असे हि प्रश्न उत्पन्न होऊ शकतील असें मीं सांगितलेंच आहे. परंतु आजपर्यंत तस उत्पन्न झालेले नाहीत इतकेंच नव्हे तर जमिनीच्या बाबतींत त्यांनीं आपले विचार किशोरबरोबर झालेल्या चर्चेत अत्यंत स्पष्ट शब्दांत सांगितले आहेत. 'स्वराज्यानंतर जमिनीचें काय होईल?' हा प्रश्न त्यांना विचारला गेला असता त्यांनीं सांगितलें कीं, जमीन वाटली जाईल. नाहीं तर लोक ती आपल्या ताब्यात घेतील. त्यांनीं जी शिकवण दिली तिचा अगदीं सौम्य उपयोग

करून मीं काम सुरु केलें आहे. म्हणून च तो आपलें कर्तव्य करीत आहे. याचें बाबाला समाधान वाटत आहे.

जमिनीवर सर्वांचा समान अधिकार असावा या विषयीं मुळीं च संशय नाहीं. प्रत्येक खेड्यात कर्म आणि ज्ञान याचा संगम करणारें शिक्षण दिलें जावें यात हि शंका नाहीं. नाहीं तर काहीं लोक फक्त हातांनीं च काम करणारे आणि काहीं फक्त बुद्धीनें च काम करणारे असे दोन भाग होतील. जर परमेश्वराची अशी इच्छा असती तर त्यानें काहीं लोकांना हात च दिले असते आणि काहीं लोकांना डोकें च दिलें असतें. काहीं 'राहू' आणि काहीं 'केतु' च निर्माण झाले असते. परंतु प्रत्येक व्यक्तीला परमेश्वराने बुद्धि आणि हात दिले आहेत. म्हणून ज्ञान आणि कर्म याचा संयोग झाला पाहिजे. त्या शिवाय जीवन सफल होणार नाहीं. ज्ञान आणि कर्म याच्या शिक्षणाशिवाय देशाचा उद्धार होणार नाहीं. हिंसक साधना-विषयीं देशात प्रेम राहील तर नुकसान होईल. आम्हाला जर आमच्या देशातील कोणता हि प्रश्न सोडवावयाचा असेल तर प्रेमाशिवाय अन्य मार्ग स्वीकारता कामा नये, तेव्हा च देशाची प्रगति आणि उत्थान होईल. फक्त पुरुषाचा च विकास झाला आणि स्त्रियांचा विकास झाला नाहीं तर देश पंगू राहील यात शंका नाहीं. हिंदुस्थानात स्पृश्यास्पृश्यभेद राहिला तर हिंदुस्थानचे तुकडे तुकडे होतील. प्रत्येक मनुष्याला भारतीयाचे नात्यानें काम करायला शिकवलें पाहिजे. आम्हा सर्वांना आपल्या जीवनाची आखणी सत्य आणि अहिंसा यावर च केली पाहिजे हा च सर्व उपदेश महात्मा गांधींनीं आम्हाला दिला होता.

कोयम्बतूर
२–१०–'५६

औजारात सुधारणा व्हावी हें मला मान्य आहे. चांगलीं औजारें घरीं आलीं तर तें चांगले च. आज आम्ही दळतों तेव्हा तासाभरात एक शेर पीठ दळलें जातें. त्यामुळें अधिक श्रम होतात.

उद्या जर ज्यामुळे एका तासात दोन शेर गहूं दळले जातील असें जातें तयार झालें तर श्रम कमी होतील. आम्ही तें पसत करूं. औजारात सुधारणा व्हावी आणि मनुष्याला कमी श्रम पडावे असें आम्हाला वाटतें पण आमच्या हातातील औजार च हिसकावून घेतलें जावें आणि दुसऱ्याला दिलें जावें आणि नंतर आम्हाला त्या वस्तु खरेदी कराव्या लागाव्या, याला काय म्हणावें ?

## साधनहीनता धोक्याची आहे

जर कोणी म्हणाला कीं, 'तुझ्या हातात तल्वार आहे ही गोष्ट योग्य नाहीं. या दिवसात तल्वारीचें काम नाहीं. आता पिस्तुल पाहिजे ' तर तल्वारीपेक्षा पिस्तुल महत्त्वाचें आहे हें मी कबूल करीन परंतु त्यानें माझ्या हातची तल्वार घेऊन पिस्तुल हि दिलें नाहीं, तें आपल्या हातीं च ठेवलें, तर तें योग्य होईल काय ? मी मान्य करतों कीं, तल्वारीपेक्षा पिस्तुल अधिक उपयुक्त आहे. पण काय आमच्या हातातील तल्वारीपेक्षा तुमच्या हातातील पिस्तुल उपयुक्त आहे ? अशा च रीतीनें आज आमच्या हातात जो चरखा आहे त्याच्या जागीं दुसरा चांगला चरखा आमच्या हातीं आला तर ठीक आहे परंतु आमच्या हातातील चरखा काढून घेऊन दुसऱ्याच्या हातीं चांगलें औजार आलें तर त्याचा काय फायदा ?

असें सांगितलें जातें कीं, 'तुम्हाला आम्ही बेकार करणार नाहीं. तुम्हाला दुसरीं कितीतरी कामें देऊं उगीच च कापड का विणता ? भात का कांडता ? पीठ का दळता ? तेल का गाळता ? रस्ते बनवा हिंदुस्थानात रस्ते तयार करण्याचें केवढें काम पडलें आहे. तुमच्या हातून रस्ते तयार

झाले तर व्यापाऱ्याना एका गावाहून दुसऱ्या गावात जाण्याचा त्रास होणार नाहीं. रस्ते चागले झाले तर शहरातील डॉक्टर खेड्यात येईल आणि औषध देईल. त्याच्याबद्दल थोडेसे च पैसे घेईल. आपल्या खेड्यातील घरें हि किती निरुपयोगी झालीं आहेत. तीं चागलीं केलीं पाहिजेत. हे हि एक काम आहे. अशीं कितीतरी कामें आहेत आपल्या घराच्या भिंती पाहिजे तर आपण तयार करा पण त्यावरील कौले चागलीं नाहींत, म्हणून आम्हीं कारखान्यात तयार केलेलीं कौलें आणून देऊ. आपण उगीच च घराच्या छपरावर गवत पसरता. गवत काय छपरावर घालण्याची वस्तु आहे ? ती तर गाय बैलाची खाण्याची वस्तु आहे. आम्ही आपल्याला चागलीं घरें बाधून देऊ. त्याच्या भिंती हि उच असतील.' अशा प्रकारे खेड्यातील लोकाची समजूत घातली जाते. परतु आपणाला यावर विचार केला पाहिजे कीं काय ही वास्तविक आमच्या हिताची गोष्ट आहे ?

## गांवात च कच्च्यापासून पक्का माल व्हावा

कोणाच्या हि मनात हा भ्रम असू नये कीं, 'सर्वोदया'त मनुष्याला अधिक काम करावें लागेल. औजारात जितकी सुधारणा होऊ शक्ते तितकी करण्यास सर्वोदय तयार आहे. त्याना हे च सागावयाचें आहे कीं, साधने शेतकऱ्याचे च हातीं असावींत. चागलीं साधनें देण्याच्या निमित्तानें शेतकऱ्याचे हातातील साधनें काढून घेऊन दुसऱ्याच्या हातीं देणे चुकीचें आहे. आपणास रस्ते तयार करावयाचे आहेत. परतु एक्दा रस्ते तयार करू लागलों तर ५-७ वर्षात हिंदुस्थानात रस्ते तयार होतील. हें काय उत्पादनाचे कार्य आहे ? जे उत्पादक काम असतें ते मनुष्याच्याजवळ कायम रहातें. म्हणून लोकाच्या हातात धदे असावेत. गावात जो कचा माल तयार होतो त्याचा पक्का माल गावात च तयार होणे हा लोकाच्या दृष्टीनें फार मोठा उद्योग आहे ह्याच्या ऐवजीं गावातील कच्च्या मालाचा पका माल शहरातील कारखान्यात बनवाल तर गावातील लोकाना धदे च राहणार नाहींत. गावातील मुलाना लोणी मिळणार नाहीं. परिणाम असा होईल कीं, मुलं कमजोर होतील आणि पुढें शेती सुद्धा चागली होणार नाहीं त्यामुळे सारा देश कमजोर होईल. म्हणून आम्हाला जागरूक राहिलें पाहिजे.

सारांश, सर्वोदय ह्या विचाराला महत्त्व देतो कीं, गावातील औजारात सुधारणा व्हावी. जुनीं औजारें सतत आहेत तशीं च चालत रहावीं हे ठीक नाहीं. त्यात सुधारणा होणें जरूर आहे. पण ती सुधारणा गावात च व्हावी. गावातील कच्च्या मालाचा पक्का माल गावात च व्हावा आणि गाववाले ज्या वस्तूंचा उपयोग करतात त्या वस्तू सोडून बाकीच्या राहिलेल्या वस्तू च विकल्या जाव्यात. गावात दूध, लोणी, फळें, भाजी इत्यादि खूप पिकावें. गावात दोन वर्षें पुरेल इतकें धान्य असावें. गावातील सर्व उद्योग गावात च असावेत. हा सर्वोदयाचा प्रथम विचार आहे.

सर्वोदयाचा दुसरा विचार असा कीं, गावातील सर्व लोकाना भूमि मिळाली पाहिजे. नाहीं तर गावात हि दोन वर्ग होतील, आणि गावामध्यें शहराच्या विरुद्ध उभें रहाण्याचें सामर्थ्य रहाणार नाहीं. आपसात लढण्यात च सारी शक्ति खपेल. शहराचा गावावर हल्ला झाला तर त्याचा प्रतिकार करणें गावाना अशक्य होईल. गावात प्रेम न राहता भांडणें राहिलीं तर गाववाल्यांचें कल्याण होणार नाहीं. म्हणून जमिनीवर सर्वांचा अधिकार आहे असें मानून सर्वांना जमीन दिली पाहिजे.

सर्वोदयाचा तिसरा सिद्धान्त असा कीं गावातील प्रत्येक मुलास शिक्षण दिलें जावें. परंतु त्यात ज्ञान आणि कर्म वेगवेगळीं असतील असें तें शिक्षण नसावें. आज तर मुलाना लिहिता वाचता आलें कीं कामाबद्दल तिरस्कार वाटू लागतो. ह्याच्यात गावाला धोका आहे आणि देशाला हि. म्हणून गावात पराक्रमी शिक्षण मिळालें पाहिजे. असें शिक्षण असावें कीं त्यात विद्येच्या बरोबर च आम्ही उत्पादन वाढवू शकू. म्हणजे च देशातील लोक पराक्रमी आणि ज्ञानसंपन्न होतील.

सर्वोदयाचा चौथा सिद्धान्त असा कीं, गावात कोणत्या हि प्रकारचा जातिभेद नसावा. या जाती उत्पन्न झाल्या म्हणून कामाची विभागणी असावी. त्यात कोणत्या च प्रकारचा उच्चनीचभेद असता कामा नये.

प्रेमात उणीव असूं नये. कोणत्या हि सार्वजनिक कार्यांत जातीचा विचार असूं नये. सर्व लोक परमेश्वराचीं मुलें आहेत ह्या गोष्टीचें भान सतत राहिलें पाहिजे.

पीलमेडु (कोयम्बतूर)
३–१०–'५६

## मजुरांची शक्ति कशी वाढेल : ६ :

मीं मजुराचा च प्रश्न हातीं घेतला आहे आपल्यातील पुष्कळसे लोक मजूर आहेत. आम्हाला वाटते कीं आपण सुखी व्हावें, आपल्या जीवनात सुधारणा व्हावी. मालकात आणि आपल्यात प्रेमाचे संबंध असावेत. कोणीं कोणाचें शोषण करू नये आणि अधिकार गाजवूं नयेत. आज शेतात काम करणारे मजूर सर्वांत दुःखी आणि दलित आहेत. म्हणून मीं त्याचा प्रश्न आपल्या हातात घेतला आहे. परंतु माझी इच्छा आहे कीं, शहरातील मजुराचा प्रश्न सुद्धा सुटावा. जे सर्वांत दुःखी आहेत, त्यांचें दुःख नाहींसें झालें तर इतरांचें दुःख सुद्धा नाहींसें होईल. म्हणून मी म्हणतों कीं, 'आमची चळवळ मजुराची चळवळ आहे.'

### त्याग आणि प्रेमानें शक्ति वाढेल

आमची इच्छा आहे कीं मजुराची शक्ति वाढावी. परंतु प्रश्न असा आहे कीं ती कशी वाढेल? यासाठीं आपल्यात हिम्मत असली पाहिजे. आपण आपलें अंतःकरण आवरून पाहिलें पाहिजे. तुमच्यात ताकद आहे परंतु तुम्हास त्याची जाणीव नाहीं. हें तेव्हा च होईल कीं जेव्हा आपण परस्परांना मदत करणे सुरू कराल. गरीब च गरिबांची चिंता वहूं लागतील तर त्यामुळें नैतिक शक्ति वाढेल. त्या शक्तीनें आम्ही श्रीमंतावर प्रभाव पाडूं शकूं, त्यांना समजावूं शकूं व त्यांची उदारता जागृत करूं. हा च आमचा मार्ग

आहे. आपण या मार्गाने चालण्याची हिम्मत धराल अशी मला उमेद वाटते.

मजुराची शक्ति वाढावी हीच माझी इच्छा आहे. पण जोपर्यंत ते स्वतः त्याग करावयास शिकत नाहींत तोंपर्यंत ही शक्ति वाढणार नाहीं. ते समजतात कीं, गरीब काय त्याग करू शकणार? परंतु गरिबाना सुद्धा मुलें असतात. आणि ते त्यांच्यासाठीं त्याग करू शकतात. ते आपल्या जमातीसाठीं त्याग करू शकतील. गरिबांनीं फक्त याचना करणें च तेवढे शिकूं नये. त्यांच्यात हि दान करण्याची शक्ति आली पाहिजे. गरीब श्रम करतात, देशासाठीं ते श्रमदान देऊं शकतात. त्यांनीं गरिबांच्यासाठीं आपल्या श्रमाचा हिस्सा दिला तर एक मोठी पुण्यशक्ति निर्माण होईल. तिच्यासमोर कंजूष श्रीमान टिकणार नाहींत. सर्वच्या सर्व श्रीमंत कंजूष असतात असें नाहीं. त्यांतील जे उदार असतात ते लगेच येऊन आमच्यात सामील होतील. कंजूषावर त्याचा प्रभाव पडेल. जेव्हा गरीब जागृत होऊन एक दुसऱ्यासाठीं त्याग करूं लागतील त्या वेळीं त्यागाचें वातावरण पसरेल. आज गरिबाना मान नाहीं. त्यांचा त्याग प्रकट होत नाहीं. त्यांच्यात त्यागाची शक्ति आहे परंतु त्याना त्याची जाणीव नाहीं. गरीब आपसांत तंटे भांडणें करतात, व्यसनांत फसतात, एक दुसऱ्याची काळजी करीत नाहींत. म्हणून त्यांची नैतिक शक्ति वाढत नाहीं. ते जर पांच पांडवांप्रमाणें एक झाले तर त्यांची शक्ति वाढेल.

### मजुरांनीं आपला सन्मान राखावा

तुम्ही गरीब आहात, परंतु तुमच्याहून हि कोणीतरी गरीब आहे. आपण त्यांच्यासाठीं त्याग करावयाला शिका. येथील 'मजदूर सभा'नें संपत्तिदान देण्याचा निश्चय केला आहे हें ऐकून मला आनंद वाटतो. पांच हजार मजुरांनीं दरमहा संपत्तिदान देण्याचा निश्चय केला आहे. मी पैशाला महत्त्व देत नाहीं. त्यागी वृत्तीची आणि प्रेमाची किंमत मी अधिक समजतो. त्यानें च आपली शक्ति, अभिमान वाढेल आणि गरिबाना हि आपल्या प्रतिष्ठेची जाणीव होईल. आज गरीब हीनदिन झाले आहेत. ते स्वतःला लाचार समजतात. आपल्या शक्तीची त्याना जाणीव नाहीं.

आपसात लढण्यात च शक्ति खर्च करतात. त्याचा परिणाम असा होतो कीं, दुसऱ्याना सुद्धा त्याच्याबद्दल आदर वाटत नाहीं. परंतु आता गरीब जागृत होत आहेत. त्याच्याबद्दल आदर वाटत आहे. त्याचा चागला उपयोग केला पाहिजे. त्याच्यात ज्ञात अग्नि प्रकट केला पाहिजे. तो कोणाला हि जाळणार नाहीं. सर्वांना पवित्र करील. सर्वांचे दोष जाळून टाकील. असा धार्मिक नैतिक अग्नि निर्माण केला पाहिजे. त्यात गरिबाचे दोष भस्म होतील. श्रीमताचे दोष हि जळून जातील.

गरीब समजतात कीं जे काहीं दोष आहेत ते सर्व श्रीमतात आहेत. ते शोषण करणारे आहेत, भरडणारे आहेत. त्रास देणारे आहेत, निर्दय आहेत, स्वार्थी आहेत. श्रीमत समजतात सारे दोष गरिबात आहेत ते पूर्ण काम करीत नाहींत, अप्रामाणिक आहेत, व्यसनाधीन आहेत, आपसात भाडतात, बुद्धि-हीन आहेत अशा प्रकारें हे त्याना हीन समजतात आणि ते ह्याना. दोघात परस्पराविषयीं हीन भाव ठेवण्याची स्पर्धा चालू आहे. जेथें समाजातील आदर नष्ट होतो तेथे शक्ति कशी निर्माण होणार? पहिली गोष्ट ही आहे कीं मनुष्याला स्वत बद्दल आदर असला पाहिजे, आपल्या शक्तीची जाणीव असली पाहिजे

## हृदय व बुद्धि यापैकीं एक तरी श्रीमंतांना असावें

भूदान यज्ञात पाच लाख लोकानीं दान दिलें आहे. त्यातले साडेचार लाख गरीब लोक आहेत जेव्हा साडेचार लाख गरिबानीं दान दिलें, तेव्हा पन्नास हजार श्रीमताना दान देणें भाग पडलें. कारण त्यामुळें एक शक्ति निर्माण झाली श्रीमत दोन प्रकारचे असतात. एक सहृदय आणि दुसरे बुद्धिवान सहृदय लोकाचेवर तात्कालीक परिणाम होतो बुद्धिमान श्रीमताना जेव्हा दिसेल कीं गरिबात इतकी नैतिक शक्ति निर्माण झाली आहे, कीं त्याचेसमोर आम्ही टिकू शकत नाहीं, त्या वेळीं ते सुद्धा यात सामील होतील. श्रीमतात काहीं लोक हृदयहीन दिसतील परतु ते हृदयहीन आहेत असें म्हणू नका. ते बुद्धिवान आहेत असें समजा जे सहृदय आहेत ते तात्कालीक तुमच्याबरोबर येतील. आपण इथें सुद्धा पाहता कीं दहा-वीस श्रीमंत लोक हि

भूदानाचे कामास लागले आहेत कारण ते सहृदय आहेत. ज्यांच्याजवळ हृदय नाहीं त्यांचेजवळ बुद्धि असेल. आमचें काम असें असलें पाहिजे कीं ज्यांच्याजवळ बुद्धि आहे त्यांच्या बुद्धीवर व जे सहृदय आहेत त्यांच्या मनावर परिणाम झाला पाहिजे. इंग्रज लोक एकदम भारत सोडून गेले. आपण असें समजतां का कीं ते एकदम सहृदय झाले? अशी गोष्ट नाहीं. परंतु ते बुद्धिवान् होते. त्यांना समजलें कीं आपण येथें राहू शकत नाहीं. राहण्याचा प्रयत्न करूं तर मार खाऊं, पराभूत होऊं. ते शहाणपणानें निघून गेले. म्हणून त्यांच्याबद्दल आदर हि राहिला. हिंदुस्थानांत राजे रजवाडे नाहींसे झाले. त्यांनीं भांडण केलें नाहीं आणि राज्य सोडून दिलें. म्हणून त्यांना संपत्ति हि मिळाली आणि कांहीं 'राजप्रमुख' हि बनविले गेले. आतां तें 'राजप्रमुख' पद च नष्ट होऊं लागलें आहे. परंतु त्यांनीं भांडण केलें नाहीं. कारण त्यांच्यांत जे कांहीं थोडे सहृदय होते, ते अंतःकरणानें समजूं शकले आणि बुद्धिवाले बुद्धीनें समजू शकले कीं यांच्यापुढें आपला टिकाव नाहीं. सारा प्रवाह राज्याच्या विरुद्ध आहे इतकें ते समजले. ज्यांच्या हातांत सत्ता आणि संपत्ति असते ते सहृदय तरी असतात किंवा बुद्धिवान्. सहृदय नाहीं आणि बुद्धिवान् हि नाहीं असा त्यांच्यांत कोणी नसेल. कारण दोन्हींपैकीं एक हि नसेल तर त्यांच्याजवळ सत्ता या संपत्ति येणार नाहीं. म्हणून मी कोणा हि श्रीमंत मनुष्याला हृदयहीन म्हणत नाहीं. मी म्हणतों कीं तो हृदयहीन दिसेल, परंतु बुद्धिवान् असेल.

### गरिबांनीं हृदय बुद्धीचें कार्य करावें

भूदान आणि संपत्तिदान यांतून नैतिक शक्ति निर्माण होईल तर सहृदय श्रीमंत बरोबर येतील आणि बाकीचे श्रीमंत हळुहळू मागे येतील. कांहीं लोक विचारतात कीं, 'आपण सर्व श्रीमंतांचें हृदय परिवर्तन कसें करणार? कांहीं लोक असें म्हणतात कीं, त्यांना हृदय च नसतें, तर आपण त्यांचें हृदयपरिवर्तन कसें करणार?' मी उत्तर देतों कीं, ज्यांना हृदय नाहीं त्यांना बुद्धि तरी असते च. म्हणून आम्ही त्यांच्या बुद्धीचें परिवर्तन करूं. म्हणजे भूदान कार्य हृदयाचें आणि बुद्धीचें कार्य आहे. हें प्रेमाचें कार्य आहे. म्हणून त्यांत सहृदय लोक येतील. आणि हें अर्ग हि कार्य आहे

कीं त्याच्या शिवाय श्रीमंत वाचूं शकत नाहींत. त्याना कळले आहे कीं, काळ बाबाचे बरोबर आहे. जर आम्ही काळाला अनुकूल असे वागलो, तर च वाचूं, नाहीं तर कदापि वांचणार नाहीं. म्हणून बाबाचा पूर्ण विश्वास आहे कीं, श्रीमंताची चिंता करण्याचें कारण नाहीं. चिंता करावयाची असेल तर ती गरिबाची केली पाहिजे. त्याच्यात त्याग व प्रेम निर्माण व्हावें, त्यांची हृदय-शुद्धि व्हावी, त्यानीं एकमेकाला मदत करुन बलवान् व्हावे, श्रीमंताचे पुढें दीन बनूं नये, तर छाती पुढे करुन उभं रहावें आणि त्याचे दुर्गुण नष्ट करावेत. जर हें शुद्धि कार्य गरिबात होईल तर त्याची ताकत वाढेल.

## मजुरांचें दान वट-बीज आहे

येथील मजूर आम्हाला संपत्तिदान देतील. ते कोट्यवधि रुपयाचा ढीग करणार नाहींत. थोडी थोडी संपत्ति देतील. परंतु हें थोडेसें वटबीज आहे. वडाचें बीं पेरलें गेले तर त्यांतून प्रचंड वृक्ष निर्माण होतो. तुम्ही मजूर लोक जें थोडेंसें धन द्याल ते बाबा पेरील. त्याचा उपयोग भूमिहीन आणि गरिबाच्या करिता केला जाईल. नंतर बाबा तुमची शक्ति घेऊन श्रीमंताचे जवळ जाईल आणि त्याना विचारील, 'पहा, गरिबानीं इतकें धन दिलें, म्हणून तुम्ही हि द्या. त्यानीं रुपयातील दोन पैसे दिले आहेत. तर तुम्ही हि तितके च देणार काय?' तेव्हा श्रीमंताना कळेल आणि ते प्रेमानें दान देण्यासाठीं पुढे येतील. प्रेमानें आले नाहींत तर लाजेनें येतील.

एका अमेरिकन मित्रानें मला विचारलें, "बाबा, तुम्हांला सर्व लोक प्रेमानें दान देतात का? कोणी लाजेनें देत नाहीं?" मीं उत्तर दिलें कीं, लाजेनें दिलें तरी तें ज्ञानपूर्वक देतात. लहान मूल नागवें असेल तर त्याला लाज वाटत नाहीं. कारण कीं त्याला त्याचें ज्ञान नसतें. जर ज्ञान असतें तर लाज वाटली असती; म्हणून त्याला सांगावें लागतें. जो लाजेनें दान देतो त्याला ज्ञान झालें आहे कीं देणें हा धर्म आहे. म्हणून जे लोक मला प्रेमानें देतात त्याचें दान मला मंजूर आहे आणि जे लोक लाजेनें देतात त्याचें हि दान मला मंजूर आहे. कारण कीं एकानें हृदयापासून दिलें तर दुसऱ्यानें बुद्धीनें. शास्त्रांत सांगितलें आहे कीं,

**" श्रद्धया देयम्, अश्रद्धया अदेयम्, ह्रिया देयम्, भिया देयम्। "**
श्रद्धेने द्या, अश्रद्धेने देऊ नका. लाजेनें द्या, भीतीनें द्या. ही शास्त्राची आज्ञा आहे. ' आम्हीं जर दिले नाहीं तर आमचें कल्याण होणार नाहीं. ' याला च भय म्हणतात. हे सुद्धा ज्ञान च आहे. आम्हीं दिलें नाहीं तर लोक तिरस्कार करतील, याला च लाज म्हणतात आणि हें हि एक प्रकारचें ज्ञान च आहे. जे लाजेनें, भयानें वा प्रेमानें देतात ते ज्ञानपूर्वक च देतात. म्हणून मला प्रथम तुम्हा गरिबाची च चिंता करावयाची आहे.

येथील एका हि मजुरानें, एका हि गरिबाने दान दिल्यावांचून राहू नये. तुम्हाला जर अर्धपोटीं जेवण मिळालें तर एक च तुकडा द्या. ती तपश्चर्या होईल. तपश्चर्येनें च शक्ति निर्माण होते.

सिंगनल्लुर
३–१०–'५६

## आत्मज्ञानाची खोली आणि विज्ञानाचा विस्तार : ७ :

आमच्यासमोर विविध प्रकारच्या जीवनाचें दर्शन होत आहे. एक दर्शन प्राणी पशु पक्षी यांच्या जीवनाचें आहे. दुसरें पामर मनुष्यांच्या जीवनाचें. तिसरें दर्शन ज्ञानी लोकांच्या जीवनाचें. जीवनाचे हे तीन प्रकार स्पष्ट आहेत. यातून हि आणखी अनेक प्रकार निघतील.

### वरील कांचेमुळें विविध दर्शन

इतक्या साऱ्या विविध प्रकारात चैतन्याचा प्रकाश आहे. कांच स्वच्छ असेल तर प्रकाश स्वच्छ राहील आणि अस्वच्छ असेल तर प्रकाश अशुद्ध होईल. कांच फुटकी असेल तर तिसऱ्या च प्रकारचा प्रकाश पडेल. जेव्हा मी कांच म्हणतों तेव्हा माझा आशय दिव्याची कांच असा आहे. आरसा जरी असला तरी स्वच्छ आरशाचें दर्शन वेगळें होईल आणि अस्वच्छ

आरशाचें वेगळे. आरसा जर फुटका असेल तर विचित्र प्रकारचें दर्शन होईल. अशा मुद्धा कांचा असतात कीं ज्यात चेहरा वेगळा च दिसतो. त्याला इंग्रजीमध्यें 'लार्फिंग ग्लास' (हसरा आरसा) म्हणतात. त्या आरशात लांबट चेहरा असला तर रुंद दिसेल आणि रुंद असेल तर लांबट दिसेल. शिवाय अशी हि काच असते कीं जींतून पाहिलें असतां सृष्टि लाल, निळी, पिवळी दिसते.

## देह बुद्धीच्या दोन गांठी

हे जें सारें विविध दर्शन घडते तें वरील काचेचा च नमुना होय. परंतु आतील रूप एक च असते ही गोष्ट शिकण्यासारखी आहे. आम्हाला जितकीं माणसें दिसतात त्यात विविध प्रकारचीं रूपे दिसतात. कोणी कोणाला लुटतो, फसवितो तर कोणी दुसऱ्याला त्रास देऊन जीवन चालवितो. काहीं लोक असे असतात कीं जे दुसऱ्याचे कल्याण करण्यांत च जीवन खर्चे करतात. अशा तीन प्रकारचे लोक स्पष्टपणें दिसतात. जनावरें आपल्या शरीरापुरता च विचार करताना दिसतात. तीं शरीराच्या पीडेनें भयभीत होतात. दगड उचलता च पळून जातात आणि हिरवें गवत इ० दाखवतां च आपणाजवळ येतात. हें केवळ देहाचें आकर्षण आहे. ते आपल्या देहाला च आपलें रूप समजतात आणि दुसऱ्याला आपल्यापेक्षा भिन्न मानतात. हें जनावराचें जीवन आहे. देह हें च सर्वस्व आहे असें ते समजतात आणि त्यात च आपलें सर्वस्व मानतात. अशा दोन गोष्टी आहेत. पहिली ही कीं ते देहाच्या आंतील वस्तु जाणत नाहींत, देहाला फक्त ओळखतात. आणि दुसरी ही कीं ते आपणांला देह मानतात. जेव्हा गाठ दुहेरी असते तेव्हां ती पक्की बसते. सारांश, पशुजीवनात देहबुद्धीची च दुहेरी गाठ असते. पहिली गाठ 'मी देह आहें' ही आणि दुसरी 'हा देह मी आहें' ही.

## पशूच्या जीवनाची एक गांठ थोडीशी सुटते

या दोन गाठी जेव्हा सुटतात तेव्हा हृदयग्रंथी मोकळी होते. परंतु पशुजीवनांत यातील एक च गाठ थोडीशी सुटते. 'मी देहरूप आहें' ही






गाठ सुटत नाहीं कारण ते देहाला च ओळखतात परतु ' हा देह मी आहे ' ही गाठ जराशी सुटते. गाय आपल्या वासराला आपलें रूप मानते. कुत्री सुद्धा असं च मानते. म्हणून ती थोडस प्रेम दाखविते. ही एक गाठ सुटते परतु ता गाठ सुद्धा पूर्णत सुटत नाहीं कारण जगात जितने देह आहेत ते सर्व माझीं च रूपे आहेत असें ती मानत नाहीं.

## खोली वाढविण्याची प्रक्रिया

एक देशभक्त आहे. तो या देशात रहाणारे सर्व माझीं च रूपें आहेत असें समजतो. परतु दुसऱ्या देशातील देहाना तो आपलें रूप मानत नाहीं, आपल्यापासून भिन्न मानतो. म्हणजे तो देहाला व्यापक समजतो, परतु फार व्यापक नाहीं. देशभक्ताला वाटत कीं, माझ्या देशात पुष्कळ उत्पन्न वाढाय. अशा प्रकारें त्याची पहिली गाठ सुटते. पण ती पुरी सुटत नाहीं कारण तो असें मानत नाहीं कीं, दुसऱ्या देशातील लोक हि माझें रूप आहेत. जग माझें च रूप आहे असें जर तो समजेल तर ही गाठ सुटेल तरी सुद्धा एक गाठ राहील च. कारण जग म्हणजे जगाचे बाह्य रूप असें तो समजतो. आतील रूपाचा तो विचार च करीत नाहीं. एखादी विहीर पाच फूट खोल आहे. तिला मी दहा फूट खोल करतों. नतर पन्नास फूट आणि त्यानतर शभर फूट खोल खणतों. तेव्हा च आतील झरे सुरु होतात. अशा प्रकारें खोल खोल खोदीत गेलें पाहिजे. ' मी देह नाहीं, मी इद्रियरूप आहे ' हें पाच फूट खोल झालें. ' मी इद्रियरूप नाहीं, मी मनरूप आहें ' हे दहा फूट खोल झालें. ' मी मनरूप नाहीं, बुद्धिरूप आहें ' हें पन्नास फूट खोल झालें. ' मी बुद्धिरूप नाहीं, आनदस्वरूप आत्मा आहें ' हें शभर फूट खोल झालें. या ठिकाणीं झरे हि वाहू लागले. ही ज्ञानाची प्रक्रिया आहे

## रुंदी वाढविण्याची प्रक्रिया

एक खड्डा पाच फूट खोल आहे. त्यात आतून झऱ्याचें पाणी येत नाहीं. बाहेरून पावसाचे पाण्यानें भरतो. एका व्यक्तीनें विचार केला कीं, इतकें पाणी पुरेसें नाहीं. त्यानें खड्डा १५ फूट रुद केला. अशा प्रकारें

करता करता शेवटीं तो खड्डा शभर फूट रुंद केला. आता त्यात पावसाचें पाणी इतकें भरू लागलें कीं, आटून झरे वाहण्याची काहीं गरज राहिली नाहीं. व्यापक होण्याचा हा एक प्रकार आहे. जे लोक घराचें उत्पादन वाढविण्याचा विचार करतात तेथें खड्डा पाच फूट रुंद असतो. जे गावाचें उत्पादन वाढविण्याचा विचार करतात ते त्या खड्ड्याला पन्नास फूट रुंद करतात. जे सर्व तामीळनाडचें उत्पादन वाढविण्याचा विचार करतात ते तो खड्डा शभर फूट रुंद करतात. आणि जो साऱ्या भारताचें उत्पादन वाढविण्याचा विचार करतो, सर्वांना चांगलें खाण्यापिण्यास मिळावें असा विचार करतो, तो, तो खड्डा हजार फूट रुंद करतो. परंतु हें सुद्धां पुरेसें नाहीं. सर्व जगाचें उत्पादन वाढावें असा ज्यानें विचार केला त्यानें तो खड्डा लाखों फूट रुंद केला. सारांश, देशभक्ताची खोली पाच फूट आहे आणि लांबीरुंदी जरा कमीजास्त असेल.

## खोली आणि विस्तार

आम्हाला हें समजून घ्यावयाचें आहे कीं, आत्म्याचा विकास दोन बाजूनीं होतो. (१) आम्हाला इतकें खोल खणलें पाहिजे कीं आटून झरे वाहणें सुरु व्हावें, आणि (२) खड्डा इतका लांब रुंद खोदला पाहिजे कीं सर्व जगाचें रूप त्यात मिळावें. एकाला आत्मज्ञानाची खोली म्हणतात आणि दुसऱ्याला विज्ञानाचा विस्तार. जेव्हा देशात आत्मज्ञानाची खोली आणि विज्ञानाचा विस्तार असतो, त्या ठिकाणीं सर्व प्रकारची समृद्धि होईल. जगात दोन प्रकारचे लोक दिसतात. काहीं लोक देशभक्त होतात— रुंदी वाढवितात, खोली नव्हे. तर काहीं लोक आत्मनिष्ठा वाढवितात — खोली वाढवितात, परंतु रुंदी नाहीं. परंतु कोणत्या हि एकानें जगाचें कार्य चालणार नाहीं. खोली आणि विस्तार दोन्ही पाहिजेत.

## योजना-समिति रुंदी वाढविण्याचें कार्य करते

योजना समितीचें कार्य लांबीरुंदी वाढविण्याचें कार्य आहे. तेथें विचार होतो कीं लोकांना जें पाहिजे तें पुरविलें पाहिजे. लोकांना अन्न हवें असेल तर अन्न दिलें पाहिजे. कापड हवें असेल तर प्रत्येकाला चाळीस वार मिळावें

स्वस्त कापड पुरविले पाहिजे. लोकांना विडी सिगारेट हवी तर आपल्या देशात त्याचे कारखाने काढले पाहिजेत. लोकांच संरक्षणासाठीं सैन्य पाहिजे म्हणून सैन्य वाढविलें जावें. कारखान्यात थकले भागलेल्याना सिनेमा पाहिजे तर त्याची व्यवस्था केली जावी. अर्थ हा कीं, हे लोक खोल खणत नाहींत यात लांबीचा च फक्त विचार आहे. यावर सुद्धा काहीं लोक म्हणतात इतकी लांबी नको. आपल्या तामिलनाडचे छोटेसें राज्य चांगले चाललें म्हणजे पुरें.

## आत्मज्ञान आणि विज्ञानाच्या समन्वयानें क्रान्ति

आमच्या देशात प्राचीन काळापासून एक संस्कृति चालत आली आहे. पाश्चिमात्य लोकांना लांब – रुंद करण्याची सवय झाली आहे. परंतु बाबा म्हणतो कीं, खोली पूर्ण झाली पाहिजे. विज्ञानाचा विस्तार जितका होऊ शकेल तितका करा परंतु खोलींत थोडीशी सुद्धा उणीव असू नये. त्या-शिवाय स्वच्छ पाणी मिळणार नाहीं. कारण ही आपल्या भारतीय संस्कृतीची गोष्ट आहे म्हणून खोली शक्य हि होईल. मग त्याबरोबर रुंदी जितकी वाढेल तितकी वाढो देशापर्यंत, नंतर संपूर्ण पसरली पाहिजे याला च ' आत्मज्ञान आणि विज्ञान याचा संयोग ' म्हणतात, आणि ही च क्रान्ति होय जोंपर्यंत आत्मज्ञान आणि विज्ञान याचा समन्वय होणार नाहीं तोंपर्यंत क्रान्ति होणार नाहीं.

आपण पंचवर्षीय योजना आखली. उद्या दशवर्षीय योजना हि निघेल. आपण उत्पादन वाढविण्याच्या गोष्टी बोलतों. चीन, रशिया आणि अमेरिकेंत हें च काम चालू आहे. ते पुढें पुढें चालले आहेत. आपण त्यांच्या माग जाऊन त्यांचें अनुकरण करू तर ज्या दु खात आज ते पडले आहेत त्यात आपण हि पडूं.

## खोली व रुंदी दोन्ही पाहिजेत

रशिया, अमेरिका, चीन तिन्ही देश निर्भय झाले नाहींत. तेथें खाणें-पिणें इ० गोष्टी चांगल्या मिळत असतील आणि मिळतात हि. परंतु गाढवाला चांगल्या प्रकारें खाऊ पिऊ घातलें तर त्याला अक्कल हि येते

असे नाहीं. हिंदुस्थानात खाण्यापिण्याला चांगले मिळत नाहीं म्हणून आम्हाला या देशाचे आकर्षण वाटते. हिंदुस्थानात खाण्यापिण्याला कमी मिळते, ते वाढविले पाहिजे यात काहीं शंका नाहीं. परंतु आम्हीं इतर देशाचे अनुकरण करता कामा नये. त्यात भले ( खोली ) नाहीं, रुंदी आहे. त्यात पुष्कळ खोदलें पाहिजे. म्हणून आम्हाला आपल्या देशात खोली कायम ठेवून च रुंदीचा विचार केला पाहिजे. सर्वोदयाचा हा च प्रयत्न आहे. भूदानाचा हा च मार्ग आहे.

लोक विचारतात कीं बाबा जमीन मागत अशा प्रकारें गावोगाव का भटकतो ? सरकारवर दाब आणून कायद्याने जमीन काढून घेतली जाईल तर चांगलें होईल. किंवा आम्ही जमीन काढून हिसकावून हि घेऊ. इतकें असताना बाबा पाच वर्षे अशा प्रकारे का भटकत आहे ? बाबाला काय रोग झाला आहे ? परंतु हे तर त्याने आता च तुम्हाला समजावून सांगितले आहे. त्याला एवढा च रोग जडला आहे कीं, त्याला खोली-बरोबर च रुंदी वाढवावयाची आहे आणि रुंदीबरोबर खोली, म्हणजे च दोन्ही गाठी सोडवायच्या आहेत.

### दोन्ही गाठी सोडवल्या पाहिजेत

'मी देह आहे' ही गाठ सोडवली पाहिजे. 'मी देहरूप नाहीं, आत्मरूप आहें' ही खोली होईल. 'मी या शरिरात नाहीं' म्हणून 'जगात जितकीं शरीरें आहेत तीं सर्व माझीं च रूपें आहेत' असें झालें तर दुसरी गाठ सुटेल. दोन्ही गाठी सुटल्याशिवाय मानवतेचा विकास व समाधान त्या च प्रमाणें शांतीची स्थापना होणार नाहीं.

### पशुतेकडून मानवतेकडे

मनुष्याची स्थिति जनावराहून वेगळी आहे. तो थोडा अधिक व्यापक होतो. त्याने प्रेम परिवारापर्यंत पैलावलें. तो समाजाला आपलें रूप मानतो आणि थोडा गोल हि जातो. तसें पाहिलें तर मानवाचा पहिला जन्म पशू-सारखा च असतो. परंतु नंतर त्यावर संस्कार होतात, आई-वडिलांचेकडून त्याला कर्तव्याची जाणीव मिळते. नंतर तो गुरुसेवेने महत्त्व जाणू लागतो.

नंतर गुरु त्याला विद्यादान करतो. तो सांगतो कीं, 'मी देहापासून वेगळा आहे. केवळ शरीरभरण करणे धर्म नाहीं. शरीरासाठीं धर्म नाहीं. तर धर्मासाठीं शरीराचा त्याग करणें जरूर असेल तर तो केला जावा. रोज जेवणें आवश्यक आहे. पण एक दिवस तरी एकादशी करणे जरूर आहे. एकादशी असें शिकविते कीं, मी शरीरापासून भिन्न आहें. आम्हाला आपल्या शरीराचे गुलाम व्हावयाचे नाहीं. धर्म शिकवितो कीं, शरीरबल आपलं बल नव्हे आपलें बल म्हणजे धर्म आणि त्यासाठीं संयम अत्यंत आवश्यक आहे.' अशा प्रकारें मूल ज्या वेळीं संयम शिकतें तेव्हा तें 'मनुष्य' होतें आणि त्याचा दुसरा जन्म होतो. पहिल्या जन्मात तर तो पशूसारखा च असतो.

परंतु आजच्या पित्याची अशी इच्छा असते कीं आपल्या मुलाला कमी कष्टात विद्या मिळावी. वसतिगृहात त्याला सर्व तऱ्हेच्या सुखसोयी असाव्यात आणि त्याचें जीवन हि कमींत कमी कष्टाचें असावें. त्याला कमींत कमी कष्ट कराचे लागावे. आता तुम्ही च सांगा कीं, हें पहिल्या प्रकारचें जीवन आहे कीं दुसऱ्या प्रकारचें? कारण गाढवाला सुद्धा वाटतें कीं, कमींत कमी कष्ट करून खावयास मिळावें. हें कोणत्या प्रकारचे शिक्षण आहे? हें सर्व युनिव्हर्सिटीचें शिक्षण पहिल्या जन्मातील आहे. त्यामुळें विकसित गाढव निर्माण होईल, विकसित मानव निर्माण होणार नाहीं.

## जीव जंतूंमध्यें हि सहयोगाची भावना असते

जोंपर्यंत मानवप्राणी आपण होऊन दुसऱ्यापर्यंत जात नाहीं व दुसऱ्याचा आपल्यात समावेश करून घेत नाहीं तोंपर्यंत मानव हा खरा मानव होऊ शकत नाहीं. लंब्याचौड्या गोष्टी बोलणें फक्त मनुष्य च जाणतो असें हि नाहीं आणि फक्त देशभक्त जाणतो असें हि नाहीं. वाळवीचे किडे अशा प्रकारें काम करतात. लाखों किडे एकत्र येऊन काम करतात. त्यांच्यात नेते असतात, राण्यासुद्धा असतात. त्यांच्या मागें मागें सर्व किडे जातात. आपणाला व्यापक बनविण्याची युक्ति त्यांच्यात हि आहे. सुप्रसिद्ध विद्वान् मेटरलिंग यानें त्यांच्यावर एक पुस्तक लिहिलें आहे. त्यात तो लिहितो कीं,

'मनुष्यसमाजाला वाळवीच्या किड्याच्या जीवनापासून पुष्कळ च शिकण्यासारखे आहे.' मधाच्या माशासुद्धा पुष्कळ संख्येंत एकत्र येऊन काम करतात. त्याचा समाज सहयोगाने काम करतो. सारांश, दुसरे प्राणी ही गोष्ट जाणतात आणि व्यापक होणें समजतात. म्हणून असें समजूं नका कीं, फक्त मनुष्य च ही गोष्ट जाणतो. म्हणून जोंपर्यंत मानव व्यापक आणि खोल होत नाहीं तोंपर्यंत मानवाचा विकास होणार नाहीं.

## मानवाचे विकासासाठीं कठोर तपश्चर्या

बाबा गावोगाव का भटकतो ? यांचेकडून जमीन माग, त्यांचेकडून संपत्तिदान माग; यांची समजूत कर, त्यांना विचार पटवून दे; असा कठशोष का करतो ? कायद्याचे आधारें जमीन का काढून घेत नाहीं ? याचें कारण असें कीं बाबाला हृदयाचा विकास करण्याची इच्छा आहे, फक्त जमिनीचें वाटप नव्हे. म्हणून च ही कठोर तपश्चर्या चालू आहे. याला 'क्रान्ति' म्हणतात. ज्या ठिकाणीं मनुष्याचा विकास होईल तेथे च तो खोल आणि व्यापक झालेला दिसेल.

नंजुंडापुरम (कोयम्बतूर)
४-१०-'५६.

## सद्गति कशी मिळेल ? : ८ :

### जीवनाचा अखंड प्रवाह

आज एक मित्र भेटायला आला होता. त्यानं एक महत्त्वाचा प्रश्न विचारला. 'आम्हाला सद्गति कशी मिळेल ?' असा प्रश्न भारतात च विचारला जातो. हा आपल्या देशाची फार मोठी संपत्ति आहे. कारण येथील लोक या जगातील जीवनाला अंतिम जीवन समजत नाहींत. ते समजतात कीं, हें जीवन आपल्या अखंड जीवनातील एक छोटासा भाग आहे. आम्हीं जन्म घेण्यापूर्वीं हि जीवन होतें आणि हें शरीर नष्ट झाल्या-वर हि तें चालू च राहील. हा एक अखंड प्रवाह आहे. आम्ही मरण पावलों आणि जीवन संपलें असें नाहीं. जगात कोठें हि पहा. अनंत पसरलेली सृष्टि च दिसून येईल. सृष्टीचा कोठें अन्त हि दिसत नाहीं तर जीवनाचा अंत कसा होईल ? म्हणून मरणानंतर हि जीवन आहे च, त्याची काहीं ना काहीं तरी आठवण लोक ठेवतात च. तरी हि जशी पाहिजे तशी आठवण ठेवत नाहींत, फार च कमी ठेवतात. 'आमचं हं जीवन तर ल्हानसें च आहे, पुढे खूप मोठें जीवन पडलें आहे ! ' असा विचार करतील तर जीवनाचं स्वरूप च बदलेल. नूह पैगंबराची गोष्ट आहे. त्यांना परमे-श्वरानें वीस हजार वर्षांचे आयुष्य दिलें होतें आणि ही गोष्ट त्यांना हि माहीत होती. त एका ल्हानशा झोंपडींत रहात असत. एकदा लोकांनीं त्यांना विचारलें कीं, आपण चांगलें घर का बांधत नाहीं ? त्यांनीं उत्तर दिलें, 'वीस हजार वर्षं च रहावयाचें आहे तर मोठें घर कशासाठीं बांधावयाचें ?' सारांश, वीस हजार वर्षांच्या जीवनासाठीं हि नूह पैगंबर मोठें घर बांधण्यास तयार नव्हते. कारण ते जाणत होते कीं, अनंत कालात वीस हजार वर्षें काहीं च नाहींत त्याच्या जीवनाच्या मानानें आमचें जीवन किती छोटें आहे तर इतक्या ल्हान जीवनासाठीं आम्हीं सर्वांना का लुटावें ? सर्वांचा द्वेष का संपादन करावा ? संपत्ति, जमीन व मुलांचा मोह का धरावा ?

## धर्मासाठीं च मनुष्य जन्माला आला आहे

जीवन म्हणजे एक लहानसा तुकडा आहे. मोठा तुकडा तर शिल्लक च आहे. त्याला हें भान आहे, तो च सर्वांची सेवा करू शकेल. तो भोगात आसक्त राहू शकणार नाहीं तो असा विचार करील कीं, मी जीवनाचा एक हि क्षण सेवेखेरीज घालवणार नाहीं. आम्हाला मानवाचें रूप देऊन परमेश्वराने आम्हाला येथें सर्वांची सेवा करण्यासाठीं पाठविले आहे., गाढव सर्वांची सेवा करतें का ? सिंह व लांडगे सेवा करतात का ? परमेश्वरानें आम्हाला गाढव नाहीं, बैल नाहीं, सिंह नाहीं व लांडगा हि केलें नाहीं. तर मनुष्य बनविले आहे तें अशासाठीं कीं, आम्हीं सेवा करून मुक्त व्हावें. हा मानवदेह सेवेसाठीं आहे. 'स हि धर्मार्थमुत्पन्नः ।' मनुष्य कशासाठीं जन्माला आला ? धर्मासाठीं. भोगासाठीं नाहीं देहानें कामे करावयाचीं असतात म्हणून घोड्याला खावयास घालावें लागतें तसें त्यास खावयास द्यावें लागतें चरख्यास सूत कातावयाचें असतें म्हणून आपण त्याला तेल देतों. तर हा काहीं भोग आहे का ? अशा प्रकारें देहाचा उपयोग समाज-सेवेसाठीं करावयाचा आहे. समाजसेवेचा, दु:खिताना मदत करण्याचा छंद आहे. परंतु या च शरीरापासून काम करवून घ्यावयाचें आहे. म्हणून त्याला खावयास द्यावं लागतें तर तें थोडें च देऊ. परंतु भोगासाठीं खाणार नाहीं. सारांश, जी व्यक्ति जाणते कीं, आमचें जीवन प्रचंड आहे आणि त्याचा एक छोटासा हिस्सा हें मनुष्य जीवन आहे, ती व्यक्ति आपलें जीवन फक्त सेवेंत च घालवील.

कीं, ' बाभळीचें बीज पेरले आहेस, तुला बाभळ च मिळेल. यात माझ्या मर्जीचा नव्हे तर तुझ्या करणीचा ( कर्माचा ) प्रश्न आहे. जर तुला आंबे हवे असतील तर तुला आंब्याची कोय लावली पाहिजे ' जर तूं आंब्याची कोय लावशील तर परमेश्वर तुला कधीं हि बाभळ देणार नाहीं. एका मित्राचा पाय विस्तवावर पडून भाजला. त्यानें अग्निदेवाला प्रार्थना केली कीं, ' हे अग्निदेवा ! माझा पाय भाजूं देऊं नको.' तेव्हा अग्निदेव त्याला म्हणाला, ' तू पुन्हा मजवर पाय ठेवू नकोस, म्हणजे मी तुझा पाय भाजणार नाहीं हे तुझ्या च हातीं आहे ' थंडीच्या दिवसात एक मनुष्य अग्नीपाशीं बसला. त्याला उष्णता मिळाली दुसरा मनुष्य अग्नीपासून दूर बसला. त्याला उष्णता मिळाली नाहीं. त्यानीं अग्निदेवाला प्रार्थना केली कीं, ' हे अग्निदेवा ! तू पक्षपात करतोस. तू तर देव आहेस ना ? देव सर्वांशीं सारखा वागतो तर तू त्याला उष्णता देतोस आणि मला का नाहीं देत ? ' अग्निदेवानें त्याला उत्तर दिले कीं, ' जर तुला उष्णता हवी असेल तर माझ्याजवळ बस, दूर राहिलास तर तुला उष्णता मिळणार नाहीं. एखाद्याला उष्णता मिळते, आणि एखाद्याला नाहीं, यात माझी नव्हे तर त्याची च जबाबदारी आहे. '

### या च जीवनात ओळख

ईश्वर निमित्तमात्र आहे. पाऊस पडतो. आपण मिरच्या लावल्या असतील तर पावसाने मिरच्या पिकतील, केळी लावल्या असतील तर केळीं येतील. आपण मिरची लावली असेल तर पाऊस केळी वाढवणार नाहीं. सारांश, सद्‌गति व दुर्गति ईश्वराच्या मर्जीवर अवलंबून नाहीं. त्याला स्वत:ची अशी मर्जी नसते तो तटस्थ असतो. तो निमित्त असतो आणि आपल्याला गति देतो. आपण जे तिकीट घेतलें असेल त्या प्रमाणें च गाडींत बसले पाहिजे. गाडी मोकळी आहे. आपणास हवें असेल तें तिकीट घ्या. बाबा कोणाला हि सद्‌गति देऊं शकत नाहीं. तो विचार समजावून सांगू शकतो. ज्याला मरणापूर्वीं सद्‌गति मिळाली असेल त्याला ती मरणानंतर हि मिळेल. मरणानंतर सद्‌गति मिळेल किंवा नाहीं याची कल्पना इथे च होईल. आपल्या मनात काम, क्रोध, लोभ, मत्सर भरला असेल

तर आपणास सद्गति मिळणार नाहीं. मनाने शांत आणि निर्विकार होणें ही च सद्गति आहे. जर मन प्रेमाने भरलेलें असेल, शांत असेल, तर आज च सद्गति मिळेल. मग मरणानतर मला सद्गति मिळेल कीं नाही याची काळजी करण्याची जरूरी नाहीं. जर आपण कलकत्याचें तिकीट काढलें असेल तर तुम्ही कलकत्त्यास च जाल. मग मी कलकत्त्यास जाईन किंवा नाहीं याची काळजी करण्याचे कारण नाहीं. जर तुम्हीं कलकत्त्याचें तिकीट काढलें नसेल तर कलकत्त्यास पोचणार नाहीं.

### भूदानामुळें दोन्हीं लोकीं कल्याण होईल

सद्गति आणि दुर्गति याची किल्ली आमचे हातीं च आहे. जर आम्ही सर्वांवर प्रेम करू तर आम्हाला परमेश्वराचे प्रेम प्राप्त होईल. भूदान यज्ञ त्याची च वाट दाखवतो. हे असे अद्भुत कार्य आहे कीं यात आध्यात्मिक हि कार्य होतं आणि व्यावहारिक हि कार्य होते. म्हणून मी सांगतों कीं, भूदान यज्ञात जो जमीन देईल त्याचें कल्याण होईल आणि जो जमीन घेईल त्याचें हि कल्याण होईल. आपण एखाद्या तहानेलेल्याला अथवा भुकेलेल्याला पाणी पाजलें, जेवू घातलें, तर त्याचा दाह शांत होईल, त्याची तृप्ति होईल, त्याला संतोष होईल. मला असें सांगावयाचें आहे कीं, त्याला जितका संतोष होईल त्यापेक्षा अधिक संतोष तुम्हास होईल. हा अनुभवाची गोष्ट आहे. यामुळें इहलोकीं हि कल्याण होईल आणि परलोकात हि कल्याण होईल. अशा कार्याला 'भक्तिकार्य' म्हणतात. भूदान यज्ञ भक्तीचें कार्य आहे.

कड्डा पालेयम्
५-१०-'५६

### शुद्ध बुद्धीच्या जपाचा परिणाम

आपण पाहता कीं बाबा रोज फिरत आहे. तो लोकांचे जवळ जमीन मागण्यासाठीं जात नाहीं. ते काम तर दुसरे लोक करतात. तर मग बाबा काय करतो ? तो जप करतो. शुद्ध बुद्धीनें जो जप केला जातो त्यात पुष्कळ शक्ति असते. लोक त्याचा महिमा जाणत नाहींत. जपानें सारें वातावरण च बदलून जातें. सर्व भारतात जोरदार जप सुरु झाला होता कीं " हिंदुस्थानला स्वराज्य पाहिजे, इंग्रजानीं येथून निघून जावें. " तो शुद्ध बुद्धीचा जप होता आणि व्यापक हि होता. इंग्रज सामर्थ्यवान् होते. शस्त्रास्त्रानी सुसज्ज होते. त्यानीं जर्मनीचा हि पराभव केला. परतु इंग्रजाच्या विरुद्ध आम्हीं काय केलें ? फक्त जप केला आणि त्याच्या तुरुगात जाऊन पडून राहिलो. शत्रूच्या तुरुगात जाऊन पडणे हा शत्रूला जिंकण्याचा मार्ग आहे काय ? असें कोणी हि विचारील. आतापर्यंत ज्या लढाया झाल्या त्यात शत्रूच्या हातीं न पडणे हे च वैशिष्ट्य होतें. जर आम्हा लोकाना शत्रूने पकडून तुरुगात टाकलें तर तो आमचा पराभव झाला असे मानलें जात होतें. परतु आम्ही शत्रूच्या तुरुगात गेलो तरी स्वतंत्र झालों. हे शुद्ध बुद्धीच्या जपामुळे च झालें. आता बाबा असा जप करीत आहे कीं, " जमीन सर्वांची होवो. जशी हवा, पाणी आणि सूर्यप्रकाशावर सर्वांची सत्ता असते, तशी च जमिनिवर हि सर्वांची सत्ता आहे. " जर बाबाच्या बरोबर आपण सर्व जण हा जप सुरु कराल कीं " जमिनीची मालकी कोणाची हि नाहीं; फक्त परमेश्वराची च मालकी असू शकते. जमिनीवर मेहनत करण्याचा सर्वांना अधिकार आहे आणि हें सर्वांचें कर्तव्य हि आहे. कोणाला हि भूमिहीन ठेवणें पाप आहे " तर तो जप हि सफल होईल.

### जमिनीची वांटणी आपल्या मर्जीवर राहील

लोक बाबाला विचारतात कीं, " तुम्हास चाळीस लाख एकर जमीन

मिळाली हें फार चागलें काम समजले जाईल. परतु आपण म्हणता कीं, पाच कोट एकर जमीन पाहिजे. सर्व जमीन वाटली गेली पाहिजे. जमिनीची मालकी नष्ट झाली पाहिजे. हें सर्व कसें होईल? त्याकरिता किती वेळ लागेल?" मी उत्तर देतों कीं, "तुम्ही लावाल तितका वेळ लागेल. तुम्हाला वाटलें कीं हे काम ह्या वर्षी व्हावें तर तें या च वर्षी होऊ शकेल. आपली इच्छा असेल कीं शभर वर्षांत हि होऊ नये तर शभर वर्षांत हि तें होणार नाहीं. हें काम तुमच्या व माझ्या मर्जीवर अवलबून आहे. जर आमची अशी इच्छा असेल कीं सर्व जमिनीची वाटणी व्हावी तर तशी वाटणी होईल च. जमिनीची वाटणी कोण करील? भूदानसमिति करेल काय? ही समिति तर दहा वीस हजार एकराची वाटणी करू शकेल. परतु गावोगावच्या सर्व जमिनीची वाटणी 'भूदान समिति' करू शकेल का? घरोघरीं लग्नें होतात. त्याच्यासाठीं एखादी 'विवाह-समिति' आली आहे का? प्रत्येक घरातील लोक आपली स्वतःची व्यवस्था करतात. सर्व तामिलनाडभर 'पोंगल' सण होतो. त्याच्यासाठी एखादी 'पोंगल समिति' आहे काय? मलबारमध्यें 'ओणम्' सण होतो. हिंदुस्थानभर एका च दिवशीं दिवाळी होते.

अशा तऱ्हेनें सर्व हिंदुस्थानात एका च दिवसात वाटणी होऊं शकेल. ह्यासाठीं आम्हा सर्वांना भावना निर्माण केली पाहिजे. आम्हीं म्हटलें कीं, इग्रजानीं हिंदुस्थान सोडला पाहिजे, तेव्हा इग्रजानीं एक दिवस ठरविला आणि त्या दिवशीं भारत सोडला. त्याची तयारी करण्यासाठीं त्याना एक दोन वर्षे लागलीं पण काम झालें एका च दिवसात.

मनुष्य मरतो त्याला किती दिवस लागतात? तो एका क्षणात मरतो. त्याच्या तयारींत कदाचित् शभर वर्षे निघून जातील. एखाद्या गुहेत दहा हजार वर्षांपासून अधःकार असेल. त्या ठिकाणीं आपण दिवा घेऊन गेलो तर तो अंधार दूर होण्यास किती वर्षे लागतील? त्यास कीं दोनशें वर्षें लागतील काय? जेथें प्रकाश पोहोंचतो तेथें अधार एका क्षणात दूर होतो.

## कचरा काढण्याचें काम

एक माणूस सूर्यावर रहात होता. तो रात्रीच्या वेळीं पृथ्वीवर पडला. त्याने पाहिलें कीं, येथे तर जेथें पहावें तेथे कचरा च कचरा पडलेला आहे. तो सूर्यावरचा मनुष्य होता. त्याला अंधार ठाऊक नव्हता. त्याला वाटलें कीं चोहो बाजूला काळा काळा कचरा च पडला आहे. त्यानें कुदळ घेऊन खणायला सुरुवात केली. कुदळीनें खणून खणून टोपल्या भरत होता व फेकत होता. त्याला वाटलें कसे आहेत हे पृथ्वीवरील लोक ! कचऱ्यात च राहतात. त्यामुळे शेजारचे लोक जागे झाले आणि दिवा घेऊन रात्रीच्या वेळीं कोण खणते आहे हे पाहण्यासाठीं बाहेर आले. दिवा पाहून सूर्यावरील मनुष्याच्या मनात आले की, मी एक तासभर कचरा खणून खणून फेकत होतो परंतु तो संपत नव्हता. आता एका क्षणात तो कसा नाहींसा झाला ? ... तो कचरा नव्हता च. तो तर अंधार होता. खोदून नव्हे तर प्रकाशाने दूर होणारा अंधार होता.

भूदानाने आम्हीं खोदणें सुरू केले आहे. दानपत्र लिहून घेतों, परंतु अशा तऱ्हेने खोदून खोदून भूदान केव्हा पुरें होईल ? जेव्हा विचाराचा प्रकाश पसरेल तेव्हा दानपत्र लिहिलें जाणार नाहीं व दिले हि जाणार नाहीं. लोक जाहीर करतील कीं, आम्हास जमिनीची वाटणी च करावयाची आहे आणि सर्व जमीन वाटली जाईल. त्याना फक्त विचाराचा प्रकाश मिळाला पाहिजे बाबा काय करीत आहे ? हा प्रकाश पसरवीत आहे. लोकाच्यापर्यंत हा विचार पोहोचवीत आहे कीं बघूनो, जमीन सर्व लोकाच्या हातीं याल तर हिंदुस्थानचे भलें होईल. जमीन ईश्वराची संपत्ति आहे, जशी हवा आणि पाणी सर्वांना खुलीं आहेत. तशी च जमीन हि सर्वांना खुली असली पाहिजे. हे च विचार समजावून सागण्यासाठीं बाबा हिंडत आहे आणि ह्याचा च जप करीत आहे. तसा सध्या कचरा खोदून काढून टाकण्याचें काम चालू आहे. कोईमतूर जिल्ह्यात किती कचरा फेंकला असें विचारतात. उत्तर मिळतें— ' दहा हजार एकर. ' लोक विचार करतात कीं, नितीतरी कचरा उरला आहे. तो केव्हा फेंकला जाईल ! तो कचरा नाहीं, अंधार आहे, ही गोष्ट जेव्हा लोकाच्या ध्यानात येईल तेव्हा हे

लोक काय करीत आहेत हें त्यांना समजेल. ते आपला दिवा घेऊन येतील तेव्हां एका क्षणांत प्रकाश पसरेल.

## शस्त्रांचे नांगर बनतील

बाबा जप करील आणि तुम्ही काम कराल. तुमचें काम बाबा करील का? तुमचें खाणें बाबा खाईल का? तुमची झोप बाबा घेईल का? तुम्हाला तुमचें खाणें स्वतः च खाल्लें पाहिजे, आपली झोंप आपण च घेतली पाहिजे. हिंदुस्थानचा प्रश्न हिंदुस्थान च सोडवील. बाबानें आपला प्रश्न सोडविला आहे. त्यानें आपली मालकी ठेविली नाहीं. जसा साप दुसऱ्याच्या घरांत जाऊन राहतो तसा बाबा हि दुसऱ्याच्या घरात जाऊन राहतो. बाबानें सापाचें जीवन अंगीकारलें आहे. तो आपलें घर बनवीत नाहीं. भागवतात अवधूत मुनींनीं म्हटलें आहे कीं, "मीं सापापासून हा बोध घेतों." त्या च प्रमाणें बाबानें सापापासून हा बोध घेतला आहे आणि आपली मालकी सोडली आहे. तो आपल्या देहाची हि मालकी मानीत नाहीं. तो असें मानतो कीं, हा देह समाजाच्या सेवेसाठीं आहे. त्यानें स्वतःसाठी कोणती हि इच्छा ठेविली नाहीं. तेव्हा बाबाचा प्रश्न सुटला आहे. त्यामुळें बाबाला कोणता हि बिकट प्रश्न सोडवायचा राहिलेला नाहीं. जो सर्व देशाचा प्रश्न आहे तो सर्व देश च सोडवील.

आज जगात लोक मोठाले बॉंब तयार करीत आहेत. परंतु हीं सारीं शस्त्रास्त्रें नाहींशीं होतील. त्याचा कोण नाश करील? ज्या हातानीं त्याना बनविलें ते च हात त्याचा नाश करतील. ह्या सर्व तलवारी, बंदुका, लोखंडाच्या कारखान्यात परत येतील. तेथें त्याचा रस तयार करून त्यातून नांगर तयार केले जातील. सर्व शस्त्रें वितळविण्यासाठीं येणार आहेत. येथें त्यापासून चांगलीं औजारें तयार होतील. कापण्यासाठीं कोयते, शेतीसाठीं नांगर आणि सूत कातण्यासाठीं टकळ्या तयार होतील. हें कोण तयार करील? ज्या लोकांनीं शस्त्रें तयार केलीं ते च लोक हीं तयार करतील. केव्हां? जेव्हां विचार बदलतील तेव्हां. विचार बदलले तर सर्व सृष्टीचा नाश होतो आणि नवीन सृष्टि निर्माण होते. सूर्याचीं किरणें पसरलीं कीं सर्व लोक आपलीं अंथरुणें गुंडाळतात. त्यांनीं अंथरुणें घातलीं होतीं से 'प'

लोक तीं गुंडाळतात. त्या च प्रमाणें ज्यानीं शस्त्रास्त्रें तयार केलीं आहेत त्या लोकाच्या जेव्हा असें लक्षात येईल कीं ह्यानीं प्रश्न सुटणार नाहींत तेव्हा ते च शस्त्राचा नाश करतील. लोक विचारतात, एवढ्या मोठ्या योजना ढासळून पडतील का? जेवढी मोठी इमारत असेल तेवढी भूकंपामुळें त्वकर पडते. छोटीं घरें टिकतात. त्यासाठीं काय करावें? विचार पसरवावे लागतील आणि तें च कार्य बाबा करीत आहे.

मुलूर (कोइमतूर)
६–१०–'५६

## आपल्या कामांची जबाबदारी आपण च घ्यावी : १० :

(सभेंत प्रवचनापूर्वी माणिक्यवाचकर याचें एक भजन म्हटलें गेलें.)

आता च आपण एक सुंदर भजन ऐकलें. त्यात भक्त म्हणतो कीं, "चागलें वाईट जें काहीं करावयाचें तें तू च करतोस. मी त्यास जबाबदार नाहीं."

### सर्व जबाबदारी ईश्वरावर टाकणें कठिण

माझ्या हातून जं काहीं चागलें वाईट होतें त्यास मी जबाबदार नाहीं हें म्हणणें ही फार मोठी गोष्ट होते. अशा प्रकारचीं भजनें ऐकण्याची सवय आम्हास झाली आहे. पण त्याचा अर्थ किती खोल आहे हें आम्ही जाणत नाहीं. माझ्या हातून काहीं चागलें काम झालें तर त्याचा आनंद, हर्ष वा गर्व होता कामा नये. ही गोष्ट थोड्याशा प्रयत्नानें लक्षात येऊ शकते. परतु माझे हातून काहीं वाईट काम झालं तर त्याची जबाबदारी मजवर नाहीं. त्यामुळें काहीं दुःख हि होत नाहीं. याचा अनुभव कठीण आहे. अधिक खालें, म्हणजे च वाईट काम झालें, तर त्याचें फळ मिळेल च. पोट जोरात दुखूं लागेल. भक्त म्हणेल कीं, अधिक खालें यास मी जबाबदार नाहीं. त्यामुळें पोट दुखत आहे त्यास हि मी जबाबदार नाहीं. परतु बोलणें अवघड

आहे आणि त्याचा अनुभव घेणे त्याहून हि अवघड आहे. यासाठीं आपल्या कामाची जबाबदारी आपण च घ्यावी हे योग्य.

## चुकीची वांटणी

काहीं लोकानीं एक मधला च मार्ग काढला आहे. कोणतें हि चागलें काम केलें आणि त्याचें चागले फल मिळालें तर म्हणतात कीं, हें आम्हीं केलें आणि काहीं वाईट काम केलें तर म्हणतात कीं, हे परमेश्वराने करविलें. आम्ही काय करणार? डॉक्टर असे च करतात. त्यानीं शभर रोग्याना औषध दिलें. त्यातून ऐशीं बरे झाले तर ते त्याच्या औषधानें बरे झाले आणि वीस मरण पावले तर ते ईश्वरानें मारले. जर ऐशीं लोकाना तुम्हीं बरें केलें तर वीस लोकाना तुम्हीं च मारलें असे म्हणा. चागले काहीं झालें तर तें आमच्या हातून झालें, त्यास आम्हीं जबाबदार आहोंत, आणि काहीं वाईट झालें तर ते ईश्वरानें केले, त्यात आमची काहीं जबाबदारी नाहीं, अशी वाटणी करणें योग्य नव्हे. एक तर चागलें व वाईट या दोन्हींची जबाबदारी स्वत:वर घ्या किंवा दोन्हींची जबाबदारी परमेश्वरावर सोंपवा.

## जबाबदारी आम्हीं स्वतः च घ्यावी

चागलें या वाईट याची जबाबदारी टाळणे सोपे असतें. आमच्या समाजात अशा प्रकारची भाषा फार वापरली जाते. हिंदुस्तानात असें बोलण्याची सवय च जडली आहे कीं, परमेश्वर सर्व काहीं करवितो, आमच्या हातीं काहीं च नाहीं. असे बोलणे सोपे आहे पण त्याचा अनुभव घेणें सोपे नाहीं. अनुभव घेण्याचा अर्थ असा कीं, विंचू चावला तर रडावयाचें नाहीं व गोड आंबा मिळाला तर आनंदी हि व्हावयाचें नाहीं. यातील गोड आंबा मिळाला असता आनंदी न होणें शक्य आहे पण विंचू चावला असता न रडणें कठीण आहे. सर्व जबाबदारी परमेश्वरावर सोंपवण्याची भाषा माणिक्य-प्रभूंच्या तोंडी शोभत असे; काहीं प्रसिद्ध लोकांच्या च तोंडी शोभते, कारण ते या अवस्थेस पोंचले होते. विंचू चावला असता हि ते शांत रहात असत. म्हणून असें बोलणें त्याना च शोभून दिसतें. परंतु आम्हाला असें च बोलणें शोभेल कीं आम्हीं चागले-वाईटाची जबाबदारी स्वतःवर च घ्यावी आणि विचार करून चागलें करावें आणि वाईट

टाळावें. ईश्वर मग काहीं करेल असें म्हणू नका. ईश्वरानें आम्हाला विवेक-बुद्धि दिली आहे. तिचा उपयोग करून जे वाईट आहे ते टाळावें. आमचे हातून हातें असे म्हणता कामा नये, तर आम्हीं केलें असें च म्हटल पाहिजे. आम्हीं वाईट केल तर त्याचें वाईट फळ आम्हाला मिळेल. ते भोगलें पाहिजे. त्यासाठीं रडणें योग्य नाहीं व ईश्वराची प्रार्थना करणं हि योग्य नाहीं.

## सासारिक काम आपल्या बुद्धीनें, पारमार्थिक ईश्वराच्या बुद्धीनें

जेव्हा आम्ही लोकाना विचारतो कीं, भूदान दिलं पाहिजे ना? सर्वांना जमीन मिळाली पाहिजे ना? तेव्हा ते 'होय' असं म्हणतात आणि जेव्हा आम्ही विचारतो कीं, 'हवा, पाणी आणि जमीन याची मालकी होउ शकते का?' तेव्हा ते नाहीं असं म्हणतात. यावर आम्ही म्हणतों कीं, 'मग तुम्हीं दान दिल पाहिजे.' मग मात्र जेव्हां दान देण्याची गोष्ट निघते तेव्हा ते टाळा-टाळ करूं लागतात, आणि म्हणतात कीं, 'परमेश्वर बुद्धि देईल तेव्हा आम्ही दान देऊ.' म्हणजे च जेव्हा आपल्या हातून दान देण्याचा प्रश्न येतो तेव्हा परमेश्वर बुद्धि देईल त्या वेळीं होईल असें सागतात. परतु जेव्हा मुलीचें लग्न करावयाचें असेल तेव्हा पचास ठिकाणीं शोध करण्यास का जाता? असं का म्हणत नाहीं कीं परमेश्वराची इच्छा असेल तेव्हा लग्न होईल? भूक लागली असता मनुष्य उठतो, चूल पेटवितो, घरात तादूळ नसतील तर कुठून तरी मागून आणतो, मागून मिळाले नाहींत तर चोरून आणतो व अन्न शिजवून खातो. त्या वेळीं तो असें का म्हणत नाहीं कीं ईश्वराची इच्छा असेल त्या वेळीं होईल? याचा अर्थ असा च कीं, ससाराचें सर्व काम आम्ही आपल्या इच्छेनें व बुद्धीनें करणार पण जेव्हा परमार्थाचे काम करावयाचें आहे तेव्हा ईश्वर करील तेव्हा होईल. म्हणजे च स्वार्थाचें कार्य आम्ही आपल्या प्रयत्नानें करणार व पुण्यकार्य, धर्मकार्य ईश्वर करवील तेव्हा च होणार. बोलताना तर पाप पुण्याची जबाबदारी आम्ही ईश्वरावर टाकतों परतु फळ भोगण्याची वेळ आली कीं पुण्याची जबाबदारी आपण स्वीकारतों आणि पापाची जबाबदारी ईश्वरावर टाकतों मग पापाचें फळ मिळताना का रडतां? पापाची जबाबदारी ईश्वरावर आहे तर रडू द्या ईश्वराला. तुम्ही का रडता? तरी हि मनुष्य रडतो. तरी हि त्याला कळत नाहीं कीं ही सर्व आपली च जबाबदारी आहे.

## भक्तिमार्गी साहित्यामुळें भ्रम

अशा प्रकारच्या भक्तिमार्गी साहित्यामुळे हिंदुस्थानच्या लोकांच्या बुद्धीत हा भ्रम निर्माण झाला आहे. वास्तविक गोष्ट काय आहे? आपली स्थिति काय आहे? हे ते जाणत नाहींत. आपल्या स्थितीप्रमाणे ईश्वराचे स्वरुप बदलत असतें. जर आपणास सुख दुःखाची काळजी आहे तर पाप पुण्याची जबाबदारी आपणावर च आहे. ती जबाबदारी आपण परमेश्वरावर सोंपवू शकत नाहीं. आपण विचारपूर्वक पुण्य केलें पाहिजे आणि त्याचें फळ भोगण्यास तयार असलें पाहिजे. आम्हीं विचार करुन पाप टाळले पाहिजे आणि त्याच्या फलापासून दूर राहिलें पाहिजे. जेव्हा आम्हीं सुख दु:खाच्या पार होऊं तेव्हा च माणिक्यवाचकरांचें तें वाक्य उपयोगी पडेल. तोंपर्यंत आम्हास सत्कार्यरत राहिलें पाहिजे. वाईट गोष्टी दूर ठेवल्या पाहिजेत. सर्व समाजावर प्रेम केले पाहिजे आणि मिळूनमिसळून राहिले पाहिजे. जें सुख आम्हास हवे आहे तें दुसऱ्याना दिलें पाहिजे दुसऱ्याना सुखी केल्याने च आम्ही सुखी होऊं शकू, दु:खी करण्याने नव्हे. म्हणून आम्ही परोपकार-रत राहिले पाहिजे. आसपासच्या लोकाची निरंतर सेवा केली पाहिजे. तेव्हा च आम्हाला सुख मिळेल, मानसिक समाधान मिळेल. असें होता होता शेवटीं ही सुखाची वासना हि नष्ट होईल. आणि त्या च वेळीं माणिक्यवाचकर यांचें हें वाक्य उपयोगी पडेल.

केथनुर (कोईमतूर)
२१–१०–'५६

## स्त्रिया आणि संन्यास



मला असे वाटतें कीं, हिंदु धर्मानें स्त्रियावर अन्याय केला आहे. स्त्रियाना पारमार्थिक कार्यांत प्रवेश दिल्यानें धोका निर्माण होईल अशी पुरुषाना भीति वाटे.

### बुद्धांनीं धोका पत्करला.

भगवान् बुद्ध हि सुरुवातीला स्त्रियाना दीक्षा देत नसत. एकदा त्यांचा शिष्य आनद एका स्त्रीला घेऊन आला आणि बुद्धाना म्हणू लागला, 'या स्त्रीला दीक्षा द्या. ही स्त्री दीक्षा देण्यास अत्यत योग्य आहे. कदाचित् आमच्यापेक्षा हि अधिक योग्य. तेव्हा भगवान् बुद्धानीं त्या स्त्रीला दीक्षा देण्याचे मान्य केलें. तरी हि ते त्या वेळीं आनदाला म्हणाले, ' आनद, मी एक धोका पत्करीत आहे.'

### महावीरांचा निर्भीडपणा.

महावीर स्वामी भगवान् बुद्धाच्या पूर्वी सुमारे ३०-४० वर्षे झाले. ते इतके निर्भय होते कीं त्याचे इतकी दुसरी निर्भय व्यक्ति क्वचित् च आढळेल. स्त्रिया व पुरुषाना समान अधिकार आहेत ही गोष्ट ते अक्षरशः सत्य मानीत असत ते मानात असत कीं, सन्यास, ब्रह्मचर्य आणि मोक्ष याचा अधिकार स्त्री व पुरुष दोघाना हि आहे. ते अत्यत निर्विकार होते. ते नग्नावस्थेत फिरत असत

जैन लोकात पुरुषाप्रमाणें च शेकडो सन्यासी स्त्रिया हि त्याग करीत असत. त्याच्यात दोन प्रकार असत. ( १ ) श्रमण व ( २ ) श्रावक श्रमण म्हणजे सन्यासी आणि श्रावक म्हणजे गृहस्थाश्रमात राहून धर्मकार्य करणारा. त्याच्यात जितके श्रमण होते त्याच्यापेक्षा अधिक श्रमण स्त्रिया होत्या. आज हि जैन सन्यासी स्त्रिया धर्म प्रचाराचे कार्य करतात. स्त्रियाना दीक्षा देण्याचे बाबतींत भगवान् बुद्धाना जी भीति वाटत होती ती महावीर स्वामींना वाटत नव्हती.

### रामकृष्ण परमहंसांना हि संकोच वाटे

ही जुनी गोष्ट झाली. जरी रामकृष्ण परमहंसाचे आश्रमात शारदादेवी पहिल्यापासून होत्या तरी सुद्धा स्त्रियाना आजपर्यंत दीक्षा दिली जात नसे. आता गेल्या वर्षापासून स्त्रियाना दीक्षा देणे सुरु झाले आहे. याचा अर्थ असा कीं, त्याना हि हें कार्य (स्त्रीदीक्षा) आरंभ करण्यास इतका वेळ लागला.

### गांधीजींचा नवा मार्ग

गांधीजींना यात अडचण वाटली नाहीं. कारण जरी ते असे मानत होते कीं सन्यासाचा अधिकार सर्वांना आहे तरी सुद्धा ते कोणाला दीक्षा देत नसत. दीक्षा देण्याची गोष्ट जेथें असते तेथें अत्यंत दृढता आवश्यक आहे. थोडासा सुद्धा दोष असेल तर त्यामुळ संस्था कलुषित होते. दीक्षा देण्याची जरुरी गांधीजींना वाटली नाहीं दीक्षेशिवाय शुद्ध रहाण्याचा मार्ग त्यानीं दाखविला. त्यानीं एक नवा विचार मांडला तो असा कीं 'गृहस्था'ला च 'वानप्रस्थ' झालें पाहिजे. म्हणजे थोडे दिवस संसारात राहून पति पत्नींनीं वानप्रस्थ होऊन राहिलें पाहिजे आणि गृहस्थाश्रमात संयम असला पाहिजे. यात ढोंग असू शकत नाहीं. आणि साधकाच्या साधनेचे पूर्ण रूप दिसत. गांधीजींनीं स्त्री पुरुष दोघाना हि समान अधिकार दिले. परंतु स्त्रियाना दीक्षा देणाऱ्याना दीक्षा देण्यात भय वाटत असे.

### मीराबाईचा गोड फटकारा

मीराबाईची गोष्ट आहे एकदा ती मथुरा वृंदावनाला गेली. तेथे एक सन्यासी रहात असत मीराबाईनें त्याच्या दर्शनाची इच्छा दर्शविली. परंतु त्याच्या शिष्यांनीं सांगितलं कीं, आमचे गुरु स्त्रियाना दर्शन देत नाहींत. यावर मीराबाईनें गुजराथीत एक भजन रचलें.

'हुं तो जाणती हती जे व्रजमा पुरुष छे एक।
व्रज मा वसीने तमे पुरुष रहा छो तेमां भला तमारो विवेक।'

'मी समजत होतें कीं व्रजभूमध्ये फक्त एक पुरुष आहे आणि बाकी सर्व गोपी आहेत. व्रजभूमीमध्यें राहून हि तुम्ही पुरुष राहिलात तर आपल्या विवेकबुद्धीला काय म्हणावें?' जेव्हा शिष्यांनीं गुरूना हें सांगितलें

तेव्हा गुरुला असे वाटले कीं हिला दर्शन देणें जरूर आहे. आणि म्हणून त्यांनी तिला दर्शन दिलें.

## कलियुगात संन्यास न घेण्यावर शंकराचार्यांचा प्रहार

संन्यास, ब्रह्मचर्य, परिव्रज्या घेण्याची परवानगी असली तरी हि हजारो स्त्रिया संन्यासिनी होतील अशी गोष्ट नाहीं. आज पुरुषाना परवानगी असली तरी हजारो पुरुष थोडे च संन्यासी होतात? परंतु परवानगी नसणें, अपात्रता असणें, प्रगतीच्या दृष्टीनें आडकाठी निर्माण करते. हिंदु धर्मात पूर्वी असे नव्हतें. परंतु मध्यंतरीच्या काळात असे मानलें गेलें कीं, कलियुगात संन्यास वर्ज्य आहे. या विचारावर शंकरसंप्रदायाने प्रहार केला. शंकराचार्यांचे गुरु संन्यासी होते. आधीं ते गृहस्थाश्रमी होते व नंतर त्यांनीं संन्यास घेतला. ब्रह्मचर्यातून च संन्यासी होण्याची इच्छा शंकराचार्यांनीं प्रकट केली. त्यांनीं आपल्या आईजवळ संन्यास घेण्याची परवानगी मागितली. आई परवानगी देत नव्हती. पण शेवटीं तिला ती द्यावी लागली. आज आम्ही शंकराचार्यांचा अत्यंत मोठा गौरव करतो. भगवान् श्रीकृष्णानंतर हिंदुधर्मावर जर फार मोठा परिणाम कोणाचा झाला असेल तर तो शंकराचार्यांचा च. त्यांचीं भाष्यें, स्तोत्रें इत्यादि सर्व देशात पसरलीं आहेत. परंतु ते जिवंत असताना जी स्थिति होती त्याची कल्पना हि आम्ही करू शकत नाहीं.

## शेवटपर्यंत माफी मागितली नाहीं

शंकराचार्यांनीं संन्यास घेतल्यानंतर ते उत्तरेकडे फिरत होते. त्याना आईची आठवण येऊ लागली. त्यांनीं विचार केला कीं आठवण आली याचा अर्थ हा च कीं आई मला बोलावत आहे. म्हणून ते दक्षिणेकडे परत फिरले. घरीं पोंचले तेव्हा त्यांची माता मरणोन्मुख होती. आईला ईश्वरदर्शन झालें पाहिजे यावरिता त्यांनीं कृष्णाष्टक रचलें आणि आईच्या मुखातून त्याचें उच्चारण करवून घेतलें. त्याची शेवटची ओळ उच्चारून होता च आईला परमेश्वराचें दर्शन झालें अशी कथा आहे. आईनें आपल्या मुलाला संन्यास घेण्यास परवानगी दिली होती आणि कलियुगात तर संन्यास वर्ज्य मानला गेला होता. म्हणून नंबुद्री ब्राह्मण

समाजानें त्याच्यावर बहिष्कार टाकला होता. तसा च पोपनें टॉलस्टॉयवर बहिष्कार टाकला होता व गांधींजींना हिंदुधर्माचा वैरी मानून मारण्यात आलें. बहिष्कारामुळें आईच्या स्मशानयात्रेला एक हि ब्राह्मण मनुष्य जाला नाहीं. जातिभेद असल्याने दुसऱ्या जातींतील लोक हि येऊ शकले नाहींत. मृत देह उचलण्यास कोणी आले नाहीं. तेव्हा शंकराचार्यांनीं तलवारीनें त्या मृत देहाचे तीन तुकडे केले आणि एक एक तुकडा नेऊन अग्नि दिला. ते अत्यंत प्रखर ज्ञानी होते. अशा वेळीं सुद्धा ते द्रवले नाहींत. जर ते माफी मागते तर स्मशानयात्रेसाठीं ब्राह्मण आले असते. परंतु त्यांनीं माफी मागितली नाहीं.

## अधिकार मिळविण्याचा हा च मार्ग

आज शंकराचार्यांच्याबद्दल इतका आदर आहे कीं, नंबुद्री ब्राह्मणात त्याची आठवण म्हणून अग्नि देण्यापूर्वी मृत देहावर तीन रेषा ओढतात. परंतु त्या काळीं समाज इतका कठोर होता कीं, आईचें प्रेत उचलण्यासाठीं कोणी हि आलें नाहीं. तरी हि शंकराचार्यांनीं समाजावर आक्षेप घेतला नाहीं. त्यांच्या ग्रंथात कटुता कोठें च नाहीं. उत्तम सुधारकाचें हे च लक्षण आहे. शंकराचार्यांना संन्यासाचा अधिकार मिळविण्यासाठीं इतकें करावें लागलें. अशा प्रकारें एक एक अधिकार मिळवावा लागतो.

## स्त्री पुरुष समानतेचा अधिकार कसा मिळेल ?

स्त्री पुरुष समानतेचा अधिकार हि असा च मिळविला पाहिजे. स्त्रिया जर पुरुषांच्या बरोबरीनें विडी ओढू लागतील तर तो अधिकार त्यांना सहज मिळेल. परंतु जर त्या संन्यास, ब्रह्मचर्य, परिव्रज्या अथवा मोक्षाच्या अधिकाराची अपेक्षा करतील तर एखादी ज्ञानवान, प्रखर वैराग्यसंपन्न स्त्री निघाली तर च तो अधिकार मिळवू शकेल. गांधींजींच्या देण्यानें अथवा दुसऱ्या कोणाच्या देण्यामुळें त्यांना हा अधिकार मिळणार नाहीं. जेव्हा शंकराचार्यांच्या कोटींतली एखादी स्त्री निघेल तेव्हा च त्यांना हा अधिकार प्राप्त होईल.

पट्टमपालेयम्
११-१०-'५६

## ज्ञान-विज्ञानमय युग

आता च आपण एक फार सुंदर भजन ऐकले. त्यात भक्तशिरोमणि ' आंदाल ' भगवान् श्रीकृष्णाना आपलें सर्वस्व समर्पण करीत आहे. तिनें स्वत साठीं कांहीं च ठेवले नाहीं तर आपले सारे जीवन कृष्णमय केलें होते. ती या अवस्थेला पोंचली होती कीं, कृष्ण भगवानाना घालण्याची माला ती चांगली दिसते कीं नाहीं हे प्रथम आपण घालून पाही. आंदाल स्वत घालून बघे ती च माला श्रीकृष्णाला अधिक प्रिय वाटत असे याचा अर्थ हा च कीं, तिने आपला स्वत चा भोग हि परमेश्वरार्पण केला होता. आम्ही स्वत साठीं कांहीं ठेवतों आणि बाकीचें ईश्वराला देतों, समाज सेवेत खर्च करतो, तेव्हा तो परोपकार होतो, परंतु जेव्हा आम्ही स्वत साठीं कांहीं हि ठेवीत नाहीं, सर्व समाजाचें च समजतो — आपल्या शरीराचे भोग सुद्धा एक सामाजिक कार्य समजतो, त्या वेळीं तें संपूर्णपणे कृष्णार्पण होतें. त्या वेळीं त्या व्यक्तीसाठीं परोपकार अशी कांहीं वेगळी गोष्ट राहात नाहीं. कारण ' स्व ' व ' पर ' यातील भेदभाव च नष्ट होतो. मग तो ' सर्वोपकार ' होतो. मीं ' कुरल 'मध्यें एक फार सुंदर मंत्र वाचला तो असा कीं, ' ज्याचें हृदय प्रेमानें ओतप्रोत भरलें आहे, जो उदार आणि बुद्धिमान् आहे, तो असें समजतो कीं, माझीं हाडें हीं माझीं नाहींत तर समाजाचीं आहेत या उलट जो संकुचित — कमी बुद्धीचा आहे तो सर्व जग आपल्या च मालकीचें समजतो. '

पुराणात दधीचि ऋषींची सुंदर गोष्ट आहे. ते महान् तपस्वी होते. ते ईश्वराचे भक्तींत तन्मय होत. त्याच्या शरीरात फार मांस नव्हतें. फक्त हाडे च शिल्लक होतीं. समाजातील लोक त्याचेजवळ आले व म्हणाले, ' आम्हास वृत्रासुराचा त्रास होतो. आणि असे बोललें जातें कीं दधीचि ऋषींच्या हाडापासून तयार केलेल्या वज्रानें च त्याचा पराभव होऊं शकेल. म्हणून आपण कृपावंत होउन आपल्या अस्थि द्या. ' दधीचि ऋषींनीं अत्यंत आनंदानें आपल्या अस्थि समाजाला अर्पण केल्या आणि स्वत मरून गेले.

## धर्म-विचाराशिवाय मानव क्षणभर हि जगूं शकणार नाहीं

आपलें सर्वस्व समाजाला अर्पण केलें पाहिजे अशा गोष्टी ऐकण्याची सवय आमच्या समाजाला झाली आहे. सवय झाल्याकारणानें त्याचा फार परिणाम हि मनावर होत नाहीं. काहीं लोकांना वाटतें कीं हा सारा धर्म विचार परलोकासाठीं आहे, इहलोकासाठीं नाहीं. काहीं लोकांना वाटतें कीं पुढें जो आदर्श समाज निर्माण होईल त्यात अशा प्रकारची नीति चालेल. पण आजच्या समाजात नाहीं. म्हणून ' येशू खिस्ताचे अनुयायी ' म्हणविणारे लोक सुद्धा आज आपला शस्त्रभार वाटविण्याच्या तयारींत गर्क आहेत. ते रविवारीं चर्चमध्ये जाऊन प्रार्थना प्रवचनें ऐकतात. त्याच्या सैन्यातील प्रत्येक सैनिकाचे खिशात बायबल असतें. त्याना असें वाटतें कीं व्यक्तिगत कल्याणासाठीं अहिंसा चागली आहे परंतु समाजकल्याणासाठीं हिंसेची गरज राहाणार च. लोकाना वाटतं कीं त्यागी पुरुषाच्या कथा, भक्तकथा, धर्मप्रवचनें, अहिंसेच्या गोष्टी महापुरुषासाठीं च आहेत, आपल्यासाठीं नाहींत. पण ही कल्पना चुकीची आहे. धर्माची जर खरी गरज केव्हा असेल तर ती आज च आहे, या च क्षणीं आहे. आम्हाला हवेची या च क्षणीं गरज आहे. जर पुढल्या क्षणासाठीं आम्हीं ती राखून ठेवली तर या क्षणीं आम्हाला मरावें लागेल. हवा सुद्धा अडविली जाऊ शकते. दहा पधरा मिनिटें हवे-शिवाय चालू शकेल परंतु धर्मविचार व प्रेमाशिवाय मनुष्य एक क्षण-भर हि जगू शकणार नाहीं. प्रश्न असा विचारतात कीं मग आज कसा जगला आहे ? आज सुद्धा प्रेमाचा अश अधिक असल्यानें तो जगला आहे. कोठें भाडण, द्वेष अथवा वाईट गाष्ट असेल तर ती माणसाच्या डोळ्याना दिसते आणि बोंचते. एखाद्या मातेनें आपल्या मुलावर प्रेम केल तर ती बातमी वर्तमानपत्रात येत नाहीं. पण जर कुठें खून झाला तर त्याची माहिती अनेक दिवस वर्तमानपत्रात येते. सर्व इतिहास लढायानीं भरलेला आहे. म्हणून कदाचित् असा गैरसमज होत असेल कीं मनुष्यस्वभावात भाडणें, द्वेष इ० गोष्टी च आहेत. परंतु वस्तुस्थिति याच्या उलट आहे. स्वच्छ, निर्मळ शुभ्र खादीच्या कपड्यावर जर लहानसा च डाग असला तर तो एकदम दिसतो. तो सहन होऊ शकत नाहीं दुधात थोडासा हि कचरा पडला तर तो

सहन होत नाहीं. मानव-हृदय, शुद्ध-निर्मल असल्यानें त्याला वाईट गोष्ट सहन होत नाहीं. म्हणून जी वाईट गोष्ट दिसते ती तावडतोब वर्तमानपत्रात व इतिहासात येते

भूदान यज्ञात हजारो लोक जमीन देतात. आजपर्यंत साडेपाच लाख लोकांनीं जमीन दिली. जमिनीसाठीं भावाभावात भांडणें होतात, कोर्टात खटले चालतात. शेतकऱ्याला जमीन प्राणासारखी प्रिय असते. परंतु आम्हीं जेथे जेथे जमीन मागितली तेथें तेथे लोकांनीं ती प्रेमानें दिली. काहीं ठिकाणीं ती कमी अधिक मिळते, कारण मोह असतो.

## नदी समुद्राला भीत नाहीं

सर्वच्या सर्व जमिनीचें दान या अशी मागणी करणें हें सुद्धा कलियुगात वाडवाचें समजलें जाईल. तरी हि या युगात ही गोष्ट बोलली जाते. म्हणून च मी म्हणतों कीं हें कलियुग नाहीं तर ' नारायणपरायणते 'चे युग आहे. आज आपलें सर्वस्व समाजासाठीं अर्पण करण्याची गोष्ट योग्य वाटते. जर एखाद्या व्यक्तीसाठीं जमीन मागितली गेली तर ती देणें योग्य आहे कीं अयोग्य आहे ? तो त्याचा उपयोग कसा करील ? इ० प्रश्न निर्माण होतात. परंतु जेथे समाजाला अर्पण करण्याची गोष्ट आहे तेथें पैसे बँकेंत ठेवण्यासारखें च आहे. लोकांना हें समजतें कीं मनुष्यासाठीं सर्वात सुरक्षित जर कोणती बँक असेल तर ती म्हणजे समाज आहे. तेथें आपले पैसे सुरक्षित राहतील आणि त्याचें इतकें व्याज मिळेल कीं तें आम्ही आपल्या दोन हातानीं हि घेऊ शकणार नाहीं. कोणती हि नदी किती का मोठी असेना, समुद्रात जाण्यास भीत नाहीं. कावेरी नदी हि आपलें पाणी समुद्रात नेऊन ओततें आणि छोटासा ओढा हि तें च करतो. मोठी गंगानदी सुद्धा गंगासागराला मिळते कारण कीं सर्वांचें गंतव्य स्थान—शेवटीं जाण्याचें ठिकाण—समुद्र च आहे आणि समुद्रापासून च सर्वांना पाणी मिळतें. म्हणून जेथें समाजाला देण्याची गोष्ट आहे तेथें लोकांना ती समजणें कठीण होत नाहीं.

## ज्ञान विज्ञानमय युग

आजचें युग विज्ञानाचे युग असल्यानें हें सर्व घडत आहे. मागचें युग ज्ञानयुग होतें. ते लोक आत्मज्ञानानें समजत आणि आत्मज्ञानानें मागत

असत. आत्मज्ञानाचें ग्रहण सर्वांना सहजपणें होऊं शकत नाहीं, म्हणून काहीं लोक त्याच्या गोष्टी ऐकत, काहीं ऐकत नसत. आज या युगात जी गोष्ट बोलली जाते ती आत्मज्ञान हि आहे आणि विज्ञान हि. आत्मज्ञान सांगतें कीं, 'तू आपलें सर्व काहीं दिलेंस तर तें श्रेय होईल.' पूर्वी तो हें च बोलत असे आणि आज हि तें च बोलतो. 'तेन त्यक्तेन भुंजीथाः।' आम्ही हि आत्मज्ञानाची मागणी करतों आणि त्या च बरोबर विज्ञानाची हि. आम्ही असें समजावून सांगतों कीं, या विज्ञानयुगात विभक्त रहाल तर जगूं शकणार नाहीं, एक व्हाल तर जगाल. आपलें श्रेय व कल्याण संघटित होण्यात च आहे हें प्राचीन काळीं हि होतें आणि आज हि आहे. यानें आपलें ऐहिक जीवन हि सुधारेल असें विज्ञान सांगतें. आज व्यक्तीच्या मालकीरूपी असुरावर एका बाजूनें आत्मज्ञानाचा प्रहार होत आहे आणि दुसरीकडून विज्ञानाचा. या दोन प्रहारामध्यें हा असुर टिकू शकणार नाहीं.

## बुद्ध व आईनस्टीनचें शस्त्र

हें कलियुग आहे अशा घोटाळ्यात राहू नका. भागवताच्या भाषेत 'हें नारायणसेवेचें युग' आहे. आजच्या भाषेत बोलावयाचें म्हणजे 'ज्ञान विज्ञानाचें युग'. भगवान् बुद्धाचा उपदेश आत्मकल्याण जाणणारे लोक च जाणत असत, परंतु बाबाचा उपदेश आत्मकल्याण, व्यक्तिगत कल्याण व समाज कल्याण ओळखणारे हि ऐकतात. सर्वांपासून वेगळें राहून या युगात आम्ही जगू शकणार नाहीं ही गोष्ट बाबाच्या सांगण्यानें आपसीन च चांगल्या तऱ्हेनें लक्षात येते. भगवान् बुद्धाचें शस्त्र बाबाचे जवळ आहे. दुसरें विज्ञानाचें — आइनस्टीनचें — शस्त्र सुद्धा बाबाजवळ आहे. त्याचे जवळ दोन शस्त्रें आहेत. म्हणून च लोक संपत्तिदान आणि भूदान देत आहेत. हें होण्याचें कारण आत्मज्ञान आणि विज्ञान दोघें हि जोर करीत आहेत. म्हणून जी शक्ति या जगात यापूर्वी कधीं हि निर्माण झाली नव्हती ती आज होत आहे.

## स्वार्थासाठीं च सर्वस्व अर्पण करा

लोक विचारतात, गेलीं पाच-साडेपाच वर्षें सतत बाबा फिरत आहे.

तो दमत नाही का ? मी म्हणतो कीं, प्रभु रामचंद्रासारख्या महापुरुषाला रावणासारख्या साध्या असुराला नष्ट करण्यासाठीं चौदा वर्षें भटकावें लागलें. मग बाबाला मोहासुराला नष्ट करण्यासाठीं साडेपाच वर्षें फिरावे लागले तर काय झालें ? रावणाला दहा शिरें होतीं; परंतु मोहासुराला हजारो शिरें आहेत. बाबाला साडेपाच वर्षें फिरण्याने थकवा आला नाहीं तर उलट उत्साह वाटला. कारण या कामात धर्म आणि अर्थ दोन्ही एकत्रित झाले आहेत. आपणास परार्थ पाहिजे असेल तर आपण भूदान व संपत्तिदान यात भाग घ्या. जर आपणास स्वार्थ हवा असेल तरी हि ह्यात भाग घेतला पाहिजे. परार्थ पाहिजे असेल तर थोड्याशा दानानें भागेल; पण स्वार्थ पाहिजे असेल तर जसे आदालनें आपले सर्वस्व परमेश्वराला अर्पण केलें होतें तसें सर्वस्व अर्पण करा. अशा तऱ्हेनें धर्म आणि अर्थ, स्वार्थ आणि परार्थ दोन्ही एकत्र होत आहेत. जरा पाश्चिमात्य देशाकडे पाहा. तिकडे किती सामूहिक कार्य होत आहे ! तें सर्व नाशासाठीं केलें जात आहे तरी सुद्धा त्यात समूह-भावना, सहयोग आहे च. तें कवढें प्रचंड सामूहिक कार्य आहे ! आजच्या काळात जर आम्ही आमचें वेगळें घर, वेगळी इस्टेट, इत्यादि गोष्टी ठेवू तर आम्ही कसे टिकू ? म्हणून आजच्या काळाची मागणी ही आहे कीं, आम्हीं सर्वांनीं व्यापक झालें पाहिजे.

काटुपालैयम् (कोयम्बतूर)
१४-१०-'५६.

सेवा आणि धर्म याचे रूप दिवसेंदिवस बदलत आहे. ते ओळखले पाहिजे. प्रत्येक युगाचा वेगळा धर्म असतो. तरी पण काहीं समान धर्म हि असतात. सत्य, प्रेम आणि करुणा सर्व जगभर म्हणजे च सर्व ठिकाणीं आणि सर्व काळीं समान असणारा असा धर्म आहे. परमेश्वराच्या असंख्य गुणातून मीं हे तीन गुण निवडले आणि त्याचें निरंतर स्मरण करीत असतों. परमेश्वराचें रूप ह्या च तीन गुणात पहातों. सर्व शास्त्रे, सत्पुरुषाचे अनुभव आणि इतिहास यातून गाळून सत्य, प्रेम आणि करुणा हे तीन गुण मीं निवडले आहेत हे गुण च अनादि कालापासून आजपर्यंत सान्या जगाची उन्नति करण्याचे काम करीत आले आहेत आणि त्या त्या समाजाला जसें रूप पाहिजे तसें ते धारण करतात.

## जुना समाज श्रद्धाप्रधान होता, आजचा ज्ञानप्रधान आहे

प्राचीन कालापासून आजपर्यंत समाजात सत्य, प्रेम आणि करुणा ही त्रिमूर्ति काम करीत आहे. पूर्वीच्या समाजात त्याचें एक प्रकारचें रूप होतें. मध्यतरीच्या समाजात दुसरें रूप होतें, व आज तिसरें रूप आहे. पूर्वीचा समाज श्रद्धाप्रधान होता तर आजचा समाज ज्ञानप्रधान आहे. हें अपरिहार्य आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं पूर्वीच्या समाजात ज्ञानाची किंमत नव्हती आणि आजच्या समाजात श्रद्धेला किंमत नाहीं. परंतु जेथें सृष्टीचें रहस्य आणि विज्ञान मनुष्याच्या समोर खुलें होतें तेथें मनुष्याची स्थिति दुसऱ्या प्रकारची होते. जुन्या काळीं मोठमोठ्या राजनीतिज्ञ लोकांना व सम्राटांना भूगोलाचें जें ज्ञान नव्हतें ते आज दहा वर्षांच्या मुलाला आहे. अकबरासारख्या मोठ्या बादशहाला किंवा श्रीहर्षासारख्या मोठ्या सम्राटाला जगात किती देश आहेत हें कोठें माहीत होतें ? परंतु आज आम्ही पहातों कीं, सुएझ कालव्याच्या बाबतींत काहीं घटना घडल्या त्या वेळीं जगात असा एक हि देश नव्हता कीं ज्यामधील

मुलाना त्याचें ज्ञान झालें नव्हतें. जगांतील सर्व वर्तमानपत्रांत त्या बातमीला महत्त्वाचें स्थान दिलें जात होतें. लोक ती बातमी वाचत होते आणि त्या बाबतींत विचार हि करीत होते. वादविवादमंडळात योग्य-अयोग्य चर्चा हि चालत होती. हिंदुस्थानचें च उदाहरण घ्या. गेल्या च वर्षी सीमासमितीचा रिपोर्ट प्रकाशित झाला आणि त्याच्यावर सर्व देशभर पुष्कळ च चर्चा झाली. त्यात मुलांनीं आणि विद्यार्थ्यांनीं हि आवड दाखविली. ही गोष्ट दु:खकारक नाहीं तर आनंददायक आहे.

### आज हि श्रद्धेला स्थान आहे

मीं हीं उदाहरणें देण्याचें कारण असें आहे कीं, यापुढील समाज ज्ञान-प्रधान रहाणार. याचा अर्थ असा नव्हे कीं श्रद्धेचें क्षेत्र कमी होईल. माझ्या डोळ्याना चष्मा लागला तेव्हां माझे डोळे पहिल्यापेक्षां अधिक दूरचें पाहूं लागले. माझ्या डोळ्याचें क्षेत्र वाढलें. म्हणून कानाचें क्षेत्र कमी होण्याचें कारण नाहीं. कारण तें क्षेत्र च भिन्न आहे. श्रद्धेचें क्षेत्र पूर्वी हि होतें आणि आज हि आहे. परंतु पूर्वी ज्या गोष्टीवर अकारण श्रद्धा ठेवत होते त्या गोष्टीवर आज त्याची श्रद्धा रहाणार नाहीं. आज तेथे बुद्धि काम करील. त्याविषयीं स्पष्ट ज्ञान असतें तेथें श्रद्धेचा प्रश्न च येत नाहीं. परंतु जेव्हा ज्ञान वाढतें तेव्हा अज्ञान हि वाढतें. ज्यांच्याजवळ ज्ञान नव्हतें त्याच्याजवळ अज्ञान हि थोडें च होतें. पूर्वी लोकाना या जगाबद्दल जितकें ज्ञान होतें त्यापेक्षा अधिक ज्ञान आज आहे. आणि पूर्वी या जगाच्या बाबतींत जितकें अज्ञान होतें त्यापेक्षा अधिक अज्ञान आज आहे. खरे ज्ञानी खरे अज्ञानी हि असतात. म्हणून ते नम्र असतात. परंतु अज्ञानी मनुष्याला थोडेंसें ज्ञान मिळालें तर त्याला असें वाटतें कीं, मला सर्व ज्ञान प्राप्त झालें आहे; आतां माझ्याजवळ अज्ञान राहिलें नाहीं. परंतु ज्ञानी मनुष्याला कळतें कीं, अजून हि प्राप्त करण्यासारखें किती तरी ज्ञान राहिलें आहे. म्हणून आज हि श्रद्धेला स्थान आहे. परंतु ज्या बाबतींत श्रद्धेची जरुरी नाहीं त्या गोष्टीवर लोक अकारण श्रद्धा ठेवणार नाहींत.

### करुणेचें युगानुकूल नवें स्वरूप

जुन्या काळचीं मूल्यें आजच्या समाजात जशींच्या तशीं उपयोगी पडणार

नाहींत, आज नवीं मूल्यें निर्माण होतील. त्याना भिण्याचें काहींच कारण नाहीं. तें करुणेचे नवें रूप आहे. लहान मुलाना आज्ञा करणे करुणेचें एक रूप आहे. परतु मुलाना सल्ला देणें, आज्ञा न करणें, हे प्रौढ पित्याच्या करुणेचे खरें रूप आहे. आपल्या प्रौढ मुलाला विचारून सल्ला देण अथवा त्याच्या आज्ञेत रहाणें हे वृद्ध पित्याच्या करुणेचे खरे रुप आहे. एखादा बाप म्हातारा झाला असताना म्हणू लागला कीं वीस वर्षांपूर्वी माझा अधिकार चालत होता पण आज चालत नाहीं. हे असें का झालें ? तर असल्या पित्यामध्यें ज्ञान च नाहीं एवढें च नाहीं तर करुणा हि नाहीं.

## पूर्वींचे लोक ओळखणार नाहींत

आज आम्ही भूदान-यज्ञाच्या बाबतींत जोर करत असता जुन्या विचारसरणीच्या लोकाना त्याचें एकदम आकलन झालें नाहीं तर त्यात आश्चर्य नाहीं. नारायणाचा एक अवतार राम होता आणि त्याचा च दुसरा अवतार होता परशुराम. पण परशुरामाने रामाला ओळखलें नाहीं. परशुराम काहीं मूर्ख नव्हता, तर महाज्ञानी व ईश्वराचा च अवतार तो होता. तरी सुद्धा ईश्वराचा जुना अवतार नव्या अवताराला ओळखू शकला नाहीं. परतु जेव्हा परशुरामाने रामचद्राचें कार्य पाहिले तेव्हा त्याने ओळखलें आणि जाणलें कीं मला याच्यासमोर नम्र व्हाले पाहिजे.

पाच वर्षांपासून भूदान यज्ञाचें काम एका पाऊलवाटेनें चाललें आहे. दोन्ही कडेचीं आक्रमणे टाळून पुढे जावे असा प्रयत्न आहे. जुने लोक विचारतात कीं, बाबा, तुम्ही जे सागता तें गाधीजी सागत नव्हते बापूजी मोठमोठे फड जमा करीत आणि त्याचें व्याज गोळा करीत पैसा योग्य ठिकाणीं ठेवला आहे ना ? त्यावें योग्य व्याज मिळत आहे ना ? या गोष्टींकडे नीट लक्ष देत असत असा प्रकारें एका बाजूने असा आक्षेप घेतला जातो आणि दुसऱ्या बाजूने असा आक्षेप घेतला जातो कीं, तुम्ही जन समाजाला प्रेमानें जिंकण्याची इच्छा करता, ज्या गोष्टाला जितके महत्त्व देणे योग्य नाहीं त्या गोष्टीला फार महत्त्व देता काहीं लोक याचे उलट म्हणतात कीं, ज्याना जितकें महत्त्व द्यावयास पाहिजे तितकें तुम्ही देत नाहीं एक मित्र म्हणाला कीं, गाधीजींनीं काँग्रेसला इतकें महत्त्व दिलें, मग तुम्ही का देत

नाहीं ? दुसरीकडून लोक म्हणतात कीं, आपण कॉंग्रेसवाल्यांमध्यें मिळून-मिसळून काम करता. कॉंग्रेसचे लोक च भूदानाचें अधिक काम करतात. यामुळें उगीच च कॉंग्रेसचें महत्त्व का वाढवितां ? कांहीं लोक म्हणतात कीं, तुम्ही भयकर काम करीत आहां कारण मालकी हक्क नष्ट होत आहे. तर दुसरीकडे लोक विचारतात कीं, तुम्ही भूदान मागत फिरता तर सत्याग्रह कधीं करणार ? त्याची सत्याग्रहाबद्दल कांहीं वेगळी च कल्पना आहे.

**नवीन विचारांसाठीं नवीन वाहन**

अशा प्रकारें लोक दोन्ही बाजूंनी विचारतात. त्याचें मला आश्चर्य वाटत नाहीं, दुःख हि वाटत नाही; उलट आनंद च होतो. नवीन युग येत आहे, करुणेचें नवे रूप प्रकट होत आहे. करुणेचें जुनें रूप या नव्या रूपाला ओळखत नाहीं. मी आमच्या कार्यकर्त्यांना सागतों कीं, जुन्या लोकांचे जितके आशीर्वाद मिळतील तितके घ्या पण नवीन विचारासाठीं नव्या वाहनाची जरुरी आहे हें लक्षांत ठेवा आणि आत्मनिष्ठेने काम करीत रहा. आमच्या वाणींत नम्रता असावी. प्रत्येका-बरोबर प्रेमाचें आचरण असावें. विचारांतील भेद नीट समजून घ्या. चुकीचे विचार मान्य करू नयेत तरी सुद्धा सर्वांचा आदर राखावा. आम्ही अशा रीतीनें काम करीत राहिलो तर काम पुष्कळ वाढेल.

**वजाजनगर** (वीरपांटी)
१५–१०–'५६

: १४ :

## एक जुना भ्रामक तत्त्व-विचार

फार पुरातन कालापासून एक भ्रामक कल्पना चालत आली आहे. तिच्या मुळाशीं एक तत्त्वविचार हि आहे. कांहीं तत्त्वज्ञानी माणसानीं असें मानलें आहे कीं, आत्मतत्त्व एक नाहीं तर दोन आहेत स्त्रीतत्त्व आणि पुंतत्त्व म्हणजे च प्रकृति आणि पुरुष. प्रकृति जड व पुरुष चेतन असतो. यावर कांहीं लोक असें हि म्हणूं लागले कीं, 'स्त्रियांना मोक्ष आणि वेदा-

ध्ययनाचा अधिकार नाहीं, कारण त्या जडतत्त्वरूप आहेत. त्या या जन्मात श्रद्धा, भक्ति करून पुढच्या जन्मीं पुरुष होऊन मोक्ष प्राप्त करतील. परतु स्त्रीजन्मात च मोक्ष मिळू शकत नाहीं.'

ही सर्व चुकीची कल्पना या प्रकृति पुरुष रूपकामुळे आहे. व्याकरणात 'प्रकृति' शब्द स्त्रीलिंगी व 'पुरुष' शब्द पुल्लिंगी आहे. परतु वास्तविक-पणें प्रकृति म्हणजे जड-अश आणि पुरुष म्हणजे चेतन-अश. स्त्री आणि पुरुष दोघात जड-अश व चेतन अश असतो. शरीर जड आहे तर आत्मा चेतन. म्हणून दोघात दोन्ही अश समान आहेत. स्त्रीच्या शरीरात आत्माश कमी व शरीराश अधिक व पुरुषाचे शरीरात आत्माश अधिक व शरीराश कमी असतो असें नाहीं. तरी हि हा भ्रामक विचार चालत आला आहे.

वजाजनगर (वीरपांडी)
१५-१० '५६

## स्वदेशी धर्म

: १५ :

आता च वैकुठभाई मेहता यानीं आपल्या भाषणात सागितलें कीं, गेल्या ५०-६० वर्षात स्वदेशीचीं दोन आदोलनें झालीं तरी स्वदेशीचा विचार आमच्या मनात स्थिर झाला नाहीं गोष्ट खरी आहे. पण त्याच्या कारणाचा विचार आम्हास केला पाहिजे.

### पूर्वीचा सदोष स्वदेशी विचार

प्रथम जो स्वदेशी विचार झाला तो स्वदेशप्रेमामुळे नव्हे तर विदेशी राज्य नष्ट करण्याचें साधन म्हणून निर्माण झाला. म्हणजे च त्याचें स्वरूप भावात्मक ( Positive ) नसून अभावात्मक ( Negative ) होतें. याचा अर्थ असा नव्हे कीं, त्या चळवळींत स्वदेशप्रेमाचा अश नव्हता. या वेळीं आम्हाला इग्रजाच्या गुलामगिरींतून मुक्त व्हावयाचें होतें. आणि दुसरीं साधनें मिळत नव्हतीं. म्हणून आर्थिक बहिष्काराचा एक शस्त्र म्हणून उपयोग करावा ही च आमची दृष्टि होती. म्हणून त्याचें प्रथम स्वरूप असें

होते कीं आम्हीं वाटल्यास दुसऱ्या देशाचा माल खरेदी करावा परंतु इंग्लंडचा माल खरेदी करू नये. त्या दिवसात जपानने रशियावर विजय मिळविला. आशियायी या नात्याने आमच्या मनात जपानबद्दल प्रेम आणि आदर निर्माण झाला. याचा परिणाम जपानचा माल येथे पुष्कळ येऊ लागला आणि आमच्या स्वदेशी चळवळीनें जपानला फायदा झाला. त्यानंतर ब्रिटिश मालाच्या बहिष्काराच्या जागीं विदेशी कापडाच्या बहिष्काराची गोष्ट आली. यामुळे येथील गिरण्याना उत्तेजन मिळालें. सर्व च गोष्टी बाहेरून घेऊ नयेत हे शक्य नव्हतें. त्यासाठीं आम्हीं कापडासारखी एक वस्तु निवडली आणि ती बाहेरून न घेण्याचा निश्चय केला याचा परिणाम असा झाला कीं येथील गिरण्यानीं खूप नफा मिळाविला आणि देशाला चागलें च फसविलें. आम्हाला हें कबूल करावें लागेल कीं, ज्या लोकानीं अशा तऱ्हेनें नफा मिळविला त्या लोकानीं आमच्या चळवळीला काहीं मदत केली मी हें अशासाठीं सागत नाहीं कीं, त्या लोकाच्याबद्दल आपल्या मनात तिरस्कार निर्माण व्हावा. पण मी आपल्यापुढें फक्त इतिहास ठेवीत आहें. साराश, त्या चळवळींत येथील जनतेची शक्ति वाढण्याचा प्रयत्न झाला नाहीं कारण ती चळवळ मुख्यत मध्यम वर्ग व उच्चवर्गीयासाठीं होती. अशा रीतीनें तो स्वदेशी विचार सदोष होता, त्यात सखोल विचार नव्हता.

## स्वराज्यप्राप्तीच्या विचारानें च चरख्याचा स्वीकार

त्यानतर गाधीजींचे वेळीं दुसरी स्वदेशीची चळवळ झाली. गाधीजींनीं जुन्या स्वदेशी चळवळीचे दोष पाहिले होते. म्हणून त्यानीं ग्रामोद्योगावर जोर देऊन सागितलें कीं, ग्रामोद्योग शभर टक्के स्वदेशी आहे. याचा अर्थ असा झाला कीं, जेव्हा ग्रामोद्योगाऐवजीं आम्ही येथील गिरण्याच्या वस्तु विकत घेतों तेव्हा ती गोष्ट काहीं टक्के च स्वदेशी होते. म्हणून त्याचा पूर्ण निषेध नाहीं. नतर त्याचा पुष्कळ च निषेध झाला आणि नवीन चळवळींत जुन्या स्वदेशीचा दोष राहिला नाहीं. परंतु यात हि एक दोष आला अनेक वेळा गुणदोषाचें मिश्रण होतें. या चळवळींत स्वदेशीची गोष्ट देशस्वातंत्र्याशीं निगडित होती. हा गुण होता. केवळ ग्रामोत्थानाच्या दृष्टीनें च नव्हे तर

देशाच्या स्वातन्त्र्याच्या दृष्टीनें हि ती गोष्ट लोकासमोर ठेविली गेली हा त्यातील सर्वांत मोठा गुण होता आणि आकर्षण हि होतें म्हणून स्वातन्त्र्याच्या चळवळीबरोबर हा विचार व्यापक झाला. परतु त्यात हि एक दोष असा निर्माण झाला कीं, ज्या लोकानीं ही गोष्ट स्वीकृत केली त्यानीं ती गोष्ट आर्थिक मूलभूत अश मानून तिचा स्वीकार केला नाहीं. गाधीजी मात्र त्या आर्थिक विचारावर जोर देत असत. त्याचे हातीं साधन म्हणून कॉंग्रेस ही मुख्य सस्था होती. ती इग्रज सरकारशीं झगडत असे. परतु कॉंग्रेसचे नेते त्याना वारवार विचारत असत कीं, चरख्याचा स्वातन्त्र्याशीं काय सबध आहे? सूत कातण्याने स्वराज्य मिळेल का? हा काय एखादा मत्र आहे? तलवारीने स्वराज्य मिळत नाहीं ही गोष्ट पटणें कठीण होत. परतु त्या वेळीं आमच्या हातात तलवार नव्हती. म्हणून आम्हीं ती गोष्ट मान्य केली. परतु सूत काढून स्वराज्य मिळेल ही गोष्ट ग्रहण करण्यास फार अवघड होती. परतु पुष्कळ लोकानीं यामुळें जनसपर्क होईल म्हणून ती गोष्ट मान्य केली. स्वराज्याच्या चळवळीसाठीं जनसपर्काची फार जरूरी आहे.

त्यात आणखी एक अशी गोष्ट होती कीं, त्यामुळ इग्रजी राज्याचे बाबतींत लोकाचे मनात असतोष निर्माण होत असे. देशाचे दारिद्र्य इ० सर्व गोष्टी लोकाचे समोर ठेवण्याची सधि यामुळ मिळत असे. ह्या सर्व गोष्टी योग्य होत्या. दारिद्र्य इ० गोष्टींची जबाबदारी इग्रजाची च होती. परतु चरख्यामुळें आम्ही इग्रजाविरुद्ध काहीं तरी भावना निर्माण करू शकू ह्या विचारामुळें दोष निर्माण झाले. याचा परिणाम असा झाला कीं, जेव्हा स्वराज्य आलें त्या वेळीं ज्या लोकानीं त्याच्याकडे अशा दृष्टीनें पाहिलें होतें त्यानीं म्हटलें कीं, स्वराज्यप्राप्तीनतर चरख्याचें काम सपले. आता त्याची गरज काय?

### स्वदेशी एक धर्म आहे

बापूजींनीं आम्हाला शिकविलें कीं, ज्याप्रमाणें सत्य एक धर्म आहे, अहिंसा एक धर्म आहे, त्या च प्रमाणें आसपासच्या लोकानीं तयार केलेला माल प्रेमानें घेणें हा आमचा धर्म च आहे. जर आम्ही जवळची वस्तु सोडून दूरची विकत घेऊ तर ती करुणा न होता लाभप्राप्ति होईल. जर

करुणेची दृष्टि असेल तर आसपासच्या लोकांचें दुःख दूर करणें आम्ही आपलें कर्तव्य समजू. यात दूरचे लोकाचा द्वेष असणार नाहीं. दूरच्या लोकांचें हि हें च कर्तव्य ठरेल कीं, त्यानीं हि आपल्या वस्तु वापराव्यात. स्वदेशी हा जीवनाचा एक धर्म आहे ही गोष्ट बापूजींनीं आमच्यासमोर ठेवण्याचा प्रयत्न केला. अन्यथा त्या वेळीं स्वदेशीला राजनैतिक बहिष्काराचें एक साधन मानलें गेलें होतें. यामुळें काहींना त्याचें आकर्षण होतें आणि काहींचा त्याला विरोध होता. ते समजत कीं, हा स्वदेशीचा प्रचार फार च संकुचित आहे. जग एक च आहे म्हणून आम्ही कोठून हि माल विकत घेऊ शकतों. आम्हीं अमुक देशाचा माल घ्यावा व अमुक देशाचा घेऊ नये असें म्हणणे अयोग्य आहे. त्या वेळीं स्वदेशीचा विचार मूलतः संकुचित भावनेने निर्माण झाला होता. म्हणून जसें काहीं लोकाना त्याचें आकर्षण होते तसा च काहीं लोकाचा त्याला विरोध हि होता.

म्हणून स्वदेशीला एक जीवन विचार म्हणून समजणें अजून बाकी आहे. स्वराज्य प्राप्तीनंतर हिंदुस्थानात कोणतें दृश्य दिसतें ? स्वदेशीचा विचार च नाहींसा झाला आहे. तो इतका कीं, परदेशाहून धिवून झालेले कपडे येथें येतात आणि काहीं तर तेथील लोकांनीं वापरलेले हि असतात. परंतु ते स्वस्त मिळतात. काहीं लोक याला हि सेवा मानतात कारण त्यामुळें गरिबाना स्वस्त कपडे मिळतात.

## मूल विचार नीट समजून घ्या

मी कोणाचा दोष दाखवीत नाहीं. येथें व्यक्तीचा दोष नाहीं जेव्हा विचार च नीट लक्षात येत नाहीं तेव्हा दोष निर्माण होतात. जेव्हा आम्ही अहिंसक समाज रचना करण्याची इच्छा करतों तेव्हा काहीं गोष्टी मूलत. समजावून घेतल्या पाहिजेत जर ते विचार नीट घेतले गेले नाहींत तर अहिंसेच्या नावाखालीं, विश्वशांतीची इच्छा असताना हि, आमच्या कामानें हिंसा वाढेल. वैकुंठभाईंनीं आपल्या भाषणात अहिंसेच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक असणाऱ्या दोन गोष्टींचा उल्लेख केला. अहिंसेसाठीं आणखी काहीं गोष्टींची आवश्यकता आहे. परंतु त्या सर्वांचें विवेचन करण्याचा हा प्रसंग नाहीं. त्यानीं सांगितलेल्या दोन गोष्टींपैकीं एक गोष्ट

अशी कीं, ज्या त्या ठिकाणच्या लोकांनीं आपला भार दुसऱ्यावर टाकूं नये. तो स्वतः च उचलावा. याला च आम्ही स्वावलंबनाचा सिद्धान्त म्हणतों. दुसरी गोष्ट ही कीं, आर्थिक समत्वाची गरज आहे. या बाबतींत आम्हीं आपला विचार स्पष्ट केला पाहिजे. ज्या लोकांना आमचे विचार पटत नाहींत, त्यांनीं त्याप्रमाणें आचरण केलें नाहीं तर आम्ही तो त्यांचा दोष आहे असें मानणार नाहीं.

## समर्थ लोकांचें च परस्परावलंबन

सर्वोदयांतले आम्ही लोक स्वावलंबन नव्हे तर परस्परावलंबनाचा सिद्धान्त मानतों. पण परस्परावलंबन दोन प्रकारचें असतें. एक समर्थांचें आणि दुसरें असमर्थांचें. तुम्हाला हात, पाय, डोळे सर्व कांहीं आहे आणि मला हि ते आहेत. तुम्ही एक पूर्ण पुरुष आहां आणि मी हि एक पूर्ण पुरुष आहे. तुम्ही समर्थ आहांत आणि मी हि समर्थ आहे. जर आपण दोघांनीं हातांत हात घालून काम केलें, परस्परसहयोग केला, तर तो समर्थांचा सहयोग होईल. समजा, परमेश्वरानें तुम्हाला चार डोळे दिले असते आणि कान दिले च नसते आणि मला चार कान दिले असते आणि डोळे च दिले नसते आणि मग जर ईश्वरानें सांगितलें असतें कीं, तुम्हीं परस्परावलंबन करा. ऐकण्याची गरज असेल तेव्हां कानवाला ऐकेल, पहाण्याची गरज पडेल तेव्हां डोळेवाला पाहील. दोघांनीं मिळून ऐकणें व पहाण्याचीं कामें होतील. अशा च प्रकारचें परस्परावलंबन आज चालू आहे. याला च सांख्यशास्त्रांत ' अंधपंगुन्याय ' म्हणतात.

रचनेंत प्राणिमात्राला बुद्धि दिली आहे. आजच्या योजनेसारखें जर त्यानें बुद्धीचें भांडार एखाद्या बँकेत ठेवलें असतें तर काय मजा झाली असती ? मग ज्याला अक्कलेची गरज पडेल तो परमेश्वराला तार पाठवूं लागला असता कीं अक्कल पाठवा. हल्लीं आमची व्यवस्था करणाऱ्यांना विमानातून किती भटकावें लागतें ! तर परमेश्वराला किती धावपळ करावी लागेल ! पण परमेश्वराची काय स्थिति आहे पहा. तो क्षीरसागरात झोपा गेला आहे आणि इतका शांत कीं कांहीं लोकांचे मनात शंका निर्माण होते कीं परमेश्वर आहे किंवा नाहीं. याचें कारण त्याची व्यवस्था इतकी सुव्यवस्थित आहे कीं मधून मधून पाहणी करण्याची हि त्याला जरुरी पडत नाहीं. सारांश, त्यानें चांगल्या रीतीनें विकेंद्रित योजना आखली आहे व सर्वांना च बुद्धि दिली आहे.

### स्वावलंबनाचा अर्थ

आम्ही हि परस्परसहयोगाची इच्छा करतों. जेथें चांगला गहूं निर्माण होत नाहीं तेथें तो पिकवणार नाहीं. रोज गहूं खाण्याचा आग्रह धरणार नाहीं. आमच्या जमिनींत ज्वारी आणि तांदूळ पिकत असेल तर आम्ही रोज तें च अन्न खाऊं. कधीं तरी गहूं खाण्याची इच्छा झाली च तर गहूं खाणें मोठें पाप आहे असें म्हणणार नाहीं. त्याकरिता थोडा गहूं बाहेरून विकत घेऊं. पण ज्या वस्तूची रोजच्या रोज गरज आहे, ज्याचेवाचून एक क्षण हि चालणार नाहीं, अशा गोष्टींचा भार दुसऱ्यावर टाकता कामा नये. याचें च नाव अहिंसेची रचना आणि याला च ' स्वदेशी ' म्हणतात.

स्वदेशीमध्यें बाहेरच्या लोकाशीं व्यापार व्यवहार चालणार नाहीं अशी गोष्ट नाहीं. स्वदेशीमध्यें परस्परव्यवहारासाठीं भरपूर वाव आहे. पण जें काम आम्ही चांगल्या रीतीनें करूं शकतों, त्याचा भार दुसऱ्यावर टाकणें चुकीचें आहे. ज्या गोष्टी आम्ही खेड्यात चांगल्या प्रकारें बनवूं शकतों त्या तिथें न करता दुसऱ्याच्या गोष्टी विकत घेतों याचा अर्थ काय ? कापड शहरातील गिरण्यात तयार होतें. कापूस कोठें होतो ? जर कापूस शहरात पिकता तर आम्हीं खेड्यात खादीचा आग्रह धरला नसता. खेड्यातील लोकांना मीं हें च सांगितलें असतें कीं, तुमच्या इथें कापूस पिकत नाहीं.

लोकांनीं च करावी. अन्यथान्य, कापड व रोजच्या गरजेच्या गोष्टी आपल्या च गावात अथवा दहा पाच गावें मिळून तयार करतील आणि त्या रोजच्या गरजेच्या वस्तु नसतील त्या जिथे त्या तयार होतात तेथून विकत घेतल्या जातील तर ती फार छान रचना होईल. मला हा हि विचार मान्य नाहीं कीं अतिशय प्रयत्न करून उगीचच्या उगीच आम्हीं हिंदुस्थानात घड्याळ करावीं. तीं स्विझरलंड चांगलीं बनवितें. मी इतकी अपेक्षा करीन कीं लोकांनीं उगीच च घड्याळ वापरू नये. हल्लीं प्रत्येकाचे हातात घड्याळ दिसत. त्याचा उपयोग असा होतो कीं आपला किती वेळ आळसात गेला याचा पत्ता लागावा. त्या बरोबर च कोणतीं हि दोन घड्याळें बरोबर नसतात. कोणाचें घड्याळ दहा मिनिटें पुढें तर कोणाचें दहा मिनिटे मागें असतें

## शुद्ध वस्तु मिळत नाहींत

हल्लीं तरुण लोकांच्या डोक्यावर एक छप्पर दिसतें. ते सौंदर्यासाठीं केंस राखतात आणि त्याला शहरातील तेल लावतात. तें तेल वाईट असतें. कारण त्यात दुसऱ्या वाईट गोष्टी मिसळलेल्या असतात. त्यामुळें केंस पिकतात. म्हणजे च जें सौंदर्यासाठीं केलें जातें त्यामुळें लोक कुरूप बनतात. गावातील स्वच्छ, शुद्ध तेल लावावें इतकी साधी अक्कल लोकांना का नसावी ?

आज जगात एक मोठा प्रश्न निर्माण झाला आहे कीं कोठें हि शुद्ध वस्तु मिळत नाहीं. इतकें च काय पण औषध हि शुद्ध मिळत नाहीं ही भयानक अवस्था आहे. यात मनुष्याच्या निष्ठुरपणाला सीमा च राहिली नाहीं. हे सर्व मिश्रण लोक स्वदेशी धर्म ओळखत नाहींत म्हणून होतें. म्हणून आम्हीं आपलें काम स्वतः च केलें पाहिजे. जितकें होईल तितकें करून नतर जें होऊ शकत नाहीं त्याचा भार दुसऱ्यावर टाकावा. दुसरे लोक हि जें काम करू शकणार नाहींत त्याची जबाबदारी आम्हीं घेतली पाहिजे.

अशा रीतीनें एक दुसऱ्याला मदत करण्यात पाप वा संकोच नाहीं. ती मदत म्हणजे 'परोपकार' असला पाहिजे. 'उपकार' शब्दात हि एक खुबी

आहे. थोड्याशा मदतीला उपकार म्हणतात. आपलें मुख्य कार्य आपण स्वत. च करावे आणि काहीं थोड्याशा गोष्टी ज्या आम्ही करु शक्त नसू तर दुसऱ्याकडून घ्याव्या. इतका त्याचा उपकार घ्यावा व तितका च त्याच्यावर करावा. जर एखादा पागळा असेल तर त्याला साधार घ्यावे. ते प्रेमाचें कर्तव्य होईल. प्रेम व करुणा काय सागतात असा प्रश्न आहे. आपल्याजवळच्या मनुष्यानें जी वस्तु तयार केली, ती विकत न घेता दूर जगातील वस्तु विकत घेणें हें सकुचित स्वार्थ व निष्ठुरता याचें लक्षण आहे.

## विचार व्यापक असावेत

स्वदेशींत कोणत्या हि प्रकारचा मानसिक सकुचितपणा नाहीं. जेव्हा तुकारामाला विचारलें गेलें कीं, "तुमचा स्वदेश कोणता? तुम्ही कोठें राहाता?" त्यानीं उत्तर दिलें, "आमुचा स्वदेश भुवनत्रयामधे वास." माझा स्वदेश हा च कीं मी तिन्ही भुवनात वास करतों तुकाराम तर एका खेड्यात रहाणारा मनुष्य होता. तो वेगवेगळ्या भाषा शिकला नव्हता. फक्त आपली मातृभाषा मराठी जाणत होता त्यानें आपलें सारे आयुष्य एका खेड्यात घालविलें होतें परतु जेव्हा त्याला विचारण्यात आलें कीं तुम्हीं कोठें रहाता, तेव्हा त्यानें सागितलें कीं, मी तिन्ही भुवनात रहातों. अशा च प्रकारे आम्हाला हि विचाराच्या दृष्टीने व्यापक झालें पाहिजे आम्हीं असा विचार केला पाहिजे कीं जगात जितके मानवप्राणी आहेत ते सर्व माझे बाधव आहेत पण आम्हीं आपल्या भावाला हि सागितलें पाहिजे कीं, 'तू पगू नाहींस. तुला तुझें काम केले पाहिजे मी हि पगू नाहीं. मला हि माझे काम केलें पाहिजे मग फार तर आम्ही एकमेकाला थोडीशी मदत करू.' आमचे विचार सकुचित स्वावलबनाचे नाहींत, दया व करुणेचे विचार आहेत जर आमच्यात करुणा असल तर स्वदेशीच्या बाबतींत आम्हाला असा च विचार केला पाहिजे. स्वदेशीच्या जुन्या चळवळी यशस्वी झाल्या नाहींत याचें कारण शुद्ध विचार लोकापर्यंत पोचवला गेला नाहीं हें च होतें त्याला अत्यत शुद्ध स्वरूपात कोणीं माडलें असेल तर तें गाधीजींनीं च. त्यानीं कोणत्या च प्रकारचा सकुचितपणा ठेवला नाहीं.

## स्वदेशीचें शुद्ध दर्शन

ऋग्वेदात अग्नीचें वर्णन आहे कीं 'दूरेदृशं गृहपतिमथर्युम्।' अग्नि दूरचें पहातो आणि आपल्या घराचा सांभाळ करतो इथें अग्नि ठेवला असेल तर तो दूरून च दिसेल पण त्याची उष्णता जवळच्या लोकांना च मिळेल. अशा तऱ्हेनें आम्हीं चोंहीकडे प्रेम करावें. पण जी प्रत्यक्ष सेवा करावयाची ती आसपासच्या लोकांची च करावी. सेवा हातानीं केली जाते व प्रेम हृदयानें. विचार बुद्धीनें केला जातो. प्रेम आणि विचार अत्यंत व्यापक असू शकतात. पण हात नव्हेत. हात जवळची च सेवा करू शकतात.

वेदात अग्नीचें जसें वर्णन आहे तसें च वर्णन 'वर्डस्वर्थ' च्या एका सुंदर कवितेंत आहे. "The type of the wise who soar but never roam True to the kindred points of Heaven and Home अर्थात् स्कायलार्क पक्षी आकाशात उंच उडतो पण तरी हि त्याची दृष्टि आपल्या घरट्यावर असते. त्याच्यात उंच उडण्याची शक्ति आहे. पण तें घरटें हि दिसू नये इतका उंच तो उडत नाहीं. तो पक्षी स्वर्गाकडे हि पहातो आणि घरट्याकडे हि. तो आकाशांत उंच भटकत राहील किंवा आपल्या घरट्यात च बसून राहील व जवळपास च नाचेल, असें तो पक्षी करीत नाहीं. हा स्वदेशी धर्म झाला. आम्हाला सर्व जगावर प्रेम करावयाचें आहे. मनात कोणत्या हि प्रकारचा भेदभाव ठेवावयाचा नाहीं. आम्ही सर्व विश्वाचे नागरिक आहोंत पण सेवा जवळच्या च क्षेत्रात करू. आज स्वाइट्झर आफ्रिकेंत सेवा करीत आहे. त्याला सर्व जगाबद्दल प्रेम आहे. पण आपल्या मलबारसाठीं तो काय करतो? काहीं हि करू शकत नाहीं, कारण हात-पायाची एक सीमा असते.

अशा रीतीनें सेवेसाठीं जवळचें क्षेत्र व प्रेम आणि चिंतनासाठीं सर्व जगाकडे लक्ष याचें च नाव आहे 'स्वदेशी धर्म.' म्हणून स्वदेशी धर्मात जाती, गाव, प्रांत, देश वा धर्म याचा अभिमान इ० गोष्टी येत नाहींत.

या सर्वांना स्वदेशी धर्मांतून काढून टाकलें पाहिजे. कारण जर या गोष्टी राहिल्या तर स्वदेशी धर्म उरणार नाहीं. ज्याची दृष्टि उदार असेल ते च स्वदेशी धर्म समजू शकतील. स्वदेशीचें हें च शुद्ध दर्शन आम्हाला झालें पाहिजे. आज वैकुंठभाईंनीं इकडे लक्ष वेधलें. ते सूत्रवत् थोडक्यात बोलले म्हणून मला वाटलें कीं आपण त्यावर भाष्य करावें.

गांधीनगर-तिरुपुर (मद्रास)
१७-१०-'५६

## निवडणुकीचा खेळ खेळा : १६ :

भूदानाचे कामात आम्हाला हसण्याची कला शिकली पाहिजे. जेव्हा आम्ही लोकांचेजवळ जाऊन आपले म्हणणें मांडू तेव्हा कधीं अनुकूल उत्तर मिळेल, कधीं प्रतिकूल. पण दोन्ही वेळा लोकांनीं आम्हाला हसतमुख पहावें. तर च भूदान कार्य प्रगति करील. जर अनुकूल उत्तर मिळाल्यावर आम्ही हसू आणि प्रतिकूल मिळालें असता चिडू, तर भूदान कार्याची प्रगति होणार नाहीं. म्हणून च आमचे हें कार्य हसत हसत करण्याचें कार्य आहे.

हल्लीं अनेक लोकांना प्रत्येक गोष्टींत 'फाइट' (झगडा) करण्याची सवय झाली आहे. असें बोललें जातें कीं, पुढील वर्षी १९५७ च्या निवडणुकींत 'फाइट' (झगडा) होईल. मीं कितीतरी वेळा सांगितलें आहे कीं, तुम्ही निवडणूक का लढविता? निवडणूक खेळासारखी खेळली पाहिजे. कुस्ती खेळता कीं नाहीं? दोन माणसांशिवाय कुस्ती होणार नाहीं. म्हणून कॉंग्रेसचे लोकांना या वेळीं अडचण वाटू लागली आहे. त्यांना अशी काळजी वाटते कीं समोर कुस्तीसाठीं मल्ल दिसत नाहीं विरोधी पक्षाशिवाय लोकशाहीचा कारभार चांगला चालणार नाहीं असा आम्हीं

सिद्धान्त च बनविला आहे आपणास जर विरोधी पक्ष हवा असेल तर निवडणुकीचा खेळ खेळला पाहिजे, रडता कामा नये. कुस्तींत जो जिंकतो त्याला बक्षिस मिळतें च पण जो हरतो त्याला हि सन्मानानें नारळ देतात. कारण जर तो हरला नसता तर दुसऱ्याला ५०० रुपयाचं बक्षिस मिळालें नसतें म्हणून जर निवडणूक एक खेळ समजून खेळली गेली तर त्यात ज्या चांईट गोष्ट आहेत त्या होणार नाहींत. ज्यांनीं निवडणूक जिंकली त्यांना राज्यकारभार चालविण्याचं बक्षिस मिळाल च जे हरले त्यांना सार्वजनिक सेवा करण्याचा नारळ दोघांना दोन्हींकडून फायदा च आहे त्यात आपलें काय बिघडल ? ते हरले तरी त्यांचा जय होतो.

## पक्षभेदामुळें प्रेम कमी होऊं नये

निवडणुकींत आम्हाला खेळासारखी वृत्ति ठेवली पाहिजे त्यात असें झाल पाहिजे कीं आम्ही दोन बंधु आहोत एका च आश्रमांत वा घरात राहतों प्रेमानें मिळूनमिसळून काम करतो बरोबर च खातों पितो आपली मिळकत हि दोघे जण वाटून घेतो त्यात एक सोशॅलिस्ट पक्षाचा आहे तर दुसरा कॉंग्रेस पक्षाचा तरी हि दोघ एकमेकांवर अत्यंत प्रेम करतात. निवडणुकींत जर हे दोघे सामील झाले तर एक सांगेल कीं दुसऱ्याला मत देऊं नका कारण तो चांगला कारभार चालवूं शकणार नाहीं, कारण त्याच्या कल्पना चांगल्या नाहींत दुसरा हि असं सांगेल कीं तो हि चांगली लोकशाही चालवूं शकणार नाहीं कारण त्याचे विचार योग्य नाहींत अशा प्रकारें ते एक दुसऱ्याविरुद्ध प्रचार करतील. कोणी हि जिंको व कोणी हि हरो पण घरीं जाऊन दोघे एकत्र खातील पितील आणि प्रेमानें राहतील. अशा प्रकारच्या आनंदात आणि मनरंजनात निवडणूक झाली पाहिजे. अशा वेळीं आम्हा दोघांपैकीं कोणी हि हरला तर काहीं बिघडणार नाहीं.

बिहारमध्यें मीं हें सर्व पाहिलें. बिहारमधील कित्येक कुटुंबात एक कॉंग्रेसचा, दुसरा कम्युनिस्ट, तिसरा सोशॅलिस्ट तर चौथा सर्वोदयवादी असतो बाप जर कॉंग्रेसचा असेल तर मुलगा अवश्य कम्युनिस्ट असेल. परंतु ते लोक म्हणतात कीं, कोणत्या हि पक्षाचें राज्य असू दे, आपल्या

कुटुंबाचें नुकसान होणार नाहीं; कारण कुटुंबात प्रत्येक पक्षाचे लोक असतात. हा च आनंद प्राचीन काळीं हिंदुस्थानात दिसत असे. बाप हिंदु असे तर मुलगा बौद्ध आणि त्याचा एक भाऊ जैन असे. सर्व जण एकाच परिवारात प्रेमानें राहात असत आणि आपल्या वेगवेगळ्या धर्मांवर विश्वास ठेवीत असत. धर्मश्रद्धा वेगळी आहे म्हणून प्रेम तोडून टाकण्याची गरज नाहीं. अशा च प्रकारे राजनैतिक पद्धति वेगळी आहे म्हणून प्रेमसंबंध तोडण्याची गरज नाहीं. म्हणून निवडणूक लढविण्याची वृत्ति ' टु फाइट इलेक्शन ' हा शब्दप्रयोग वाईट आहे. हा शब्दप्रयोग इंग्रजी भाषेतून इथें आला आहे. आपल्या देशात निवडणूक खेळ झाला पाहिजे.

## घर्षणांत तेल घाला

ही एक निरुपयोगी गोष्ट मीं सांगितली. कारण कीं, आम्ही निवडणुकींत भाग घेणार नाहीं असा ठराव तुम्हीं पास केला आहे, म्हणून ही गोष्ट आपल्याला लागू नाहीं. निवडणुकींत जे भाग घेतील त्याना ही गोष्ट समजावून द्या. दोघांपैकीं कोणी हि दुर्मुखलेलें असू नये, क्रोधी राहू नये. ही च आपली जबाबदारी राहील. जरी आम्हीं एवढें केले तरी तें पुष्कळ आहे यंत्रात 'घर्षण' असतें च. 'घर्षणा'शिवाय यंत्र बनविलीं तर तीं काम च करणार नाहींत. घर्षणाशिवाय यंत्र ढिलें पडेल. त्यात गति येणार नाहीं. म्हणून कितीं हि हसत हसत निवडणूक खेळलात तरी सुद्धा त्यात थोडेंसे घर्षण होणार च. अशा वेळीं तुम्ही तेलाचा डबा घेऊन तयार राहा. घर्षणाची स्थिति दिसता च त्यात तेल घाला. जर तुम्हाला ही कला साधली तर लोक अशी तक्रार करणार नाहींत कीं तुम्ही निवडणुकीपासून अलिप्त राहिलात. याउलट लोक असें च म्हणतील कीं, जर असे थोडे लोक अलिप्त राहिले नसते तर तेल कोणीं घातलें असतें ?

## भूदानकार्याची पद्धति

जर निवडणूक हसत हसत खेळायची तर भूदानाचें कार्य चिडून करायचें नाहीं हें वेगळें सांगणें नको च. लोकांना वाटतें कीं ही इस्टेट (भूमि आदि) आमची आहे, तेव्हा आम्हीं हि सांगितलें पाहिजे कीं आम्हीं आपली च

मुले आहोत. तो तीस वर्षांचा तरुण असेल आणि आम्ही साठ वर्षांचे असू, तर तो हें नातें कसें कबूल करील ? तो म्हणेल कीं तुम्ही माझे वडील आणि मी आपला मुलगा आहे, म्हणून मी च तुमच्या इस्टेटीचा मालक आहें. तरी सुद्धा तुम्ही माझी इस्टेट कशी मागता ? मी सांगेन कीं आपली इस्टेट मला मिळाली पाहिजे. सारांश, जर त्याच्याकडून आपल्याला इस्टेट मागावयाची आहे तर प्रेमानें, समजुतीनें च काम केलें पाहिजे. जर त्यानें मान्य केलें तर इस्टेटीचा हक्क देईल, नाहीं तर दान तरी देईल. हक्क नाहीं तर दान तरी मिळेल च.

जर तो दान हि देणार नाहीं तर बाबा म्हणेल कीं, या माझणाची लाज राखणार कीं नाहीं ? आम्हाला कोणत्या ना कोणत्या प्रकारें त्याच्याशीं लगट करावयाची आहे. आम्ही विचारू कीं जमीन जर नाहीं तरी वाचण्यासाठीं पुस्तकें तरी घेणार नाहीं का ? तो लगेच म्हणेल, 'हो, जरूर घेईन' बस्, आमचें काम झालें. त्याच्या घरीं आमचें पुस्तक पोहोंचलें कीं त्याचें नाव काळ्या यादींत ( Black list ) गेलें कीं अमुक मनुष्याला 'गीता प्रवचन' दिलें आहे.

पधरा दिवसानीं पुन्हा भेटल्यावर आम्ही त्याला विचारू कीं, 'हे बधू, 'गीता प्रवचनें' वाचलेंस कीं नाहीं ?' तो म्हणेल, 'वाचावयाचें आहे. पण वेळ च मिळत नाहीं.' मी म्हणेन, 'ठीक. तुमच्या घरीं आलों आहे तेव्हां जेवायला घालाल ना ?' जर जमीन मागणारा भोजनावर खुश होईल आणि भोजनामुळें जमीन देणें टळेल तर तें कोण देणार नाहीं ? भोजनाचे वेळीं जवळ बसून मी चर्चा सुरू करीन आणि सांगेन कीं, 'गीता प्रवचनें' काय आहे, भूदान काय आहे, इत्यादि. तेव्हां तो म्हणेल कीं, 'आता माझ्या लक्षांत आलें जर असें असेल तर मी 'गीता प्रवचनें' अवश्य वाचेन.' बस. आमचें काम झालें. सारांश, एखाद्याच्या भूदान देण्यानें च आमचें काम होत असं नाहीं. आम्हाला त्याच्याकडून अनेक गोष्टी करून घ्यावयाच्या आहेत — साहित्य वाचून घेणें, खादी वापरणें, सूत कातून घेणें, आमच्या पद्धतीचे संडास बनविणें इत्यादि सर्व गोष्टी करून घ्यावयाच्या आहेत. आणि त्या सर्व प्रेमानें च करून घ्यावयाच्या आहेत.

## गूळ खावयास देणारा महात्मा

जुने ऋषि लोकांना कडू खावयास देत. ते सांगत कीं, लिंबाचीं पानें खा. परंतु गांधीजींनीं गूळ खावयास देण्याचा सल्ला दिला. मध्यंतरीं त्यांनीं हि लिंबाचीं पानें खावयास देणें सुरू केलें होतें. या कामांत त्यांना दहा बारा च शिष्य मिळाले, अधिक मिळाले नाहींत. तेव्हां त्यांनीं ओळखलें कीं, लिंबाचीं पानें खावयास देण्याचा कार्यक्रम लोकप्रिय होऊं शकत नाहीं, गूळ खावयास देण्याचा कार्यक्रम च लोकप्रिय होईल.

गुळ खावयास देण्याचा आमचा एक कार्यक्रम हि आहे. आम्हीं लोकांना विचारलें पाहिजे कीं साखर का खाता ? गूळ का खात नाहीं ? ते सांगतील कीं साखर श्वेत गोरी दिसते. तेव्हां आम्हीं सांगितलें पाहिजे कीं ती गोरी दिसते म्हणून च गोऱ्या लोकांच्या प्रमाणें आहे. तुम्हीं गोऱ्या लोकांना येथून पळवून लावलें मग गोरी साखर का ठेवतां ? गुळाचा रंग आपल्या देशाच्या रंगासारखा आहे आणि साखरेचा गोऱ्या लोकांच्या देशासारखा आहे. ती दिसण्यांत श्वेत दिसते परंतु तिच्यामध्यें व्हिटॅमिन्स–जीवनसत्त्वें नाहींत. आपल्याला जीवनतत्त्वावर एक व्याख्यान दिलें पाहिजे. आज स्वच्छ, शुद्ध व निर्मल गूळ मिळत नाहीं हें खरें आहे. महात्माजींनीं अशा गुळाचा प्रचार करण्यास सांगितलं नव्हतें. त्यांनीं शुद्ध, स्वच्छ व निर्मळ गुळाचा प्रचार करण्यास सांगितलें होतं कीं ज्याला पाहून लोकांनीं म्हणावें कीं 'काय ? गूळ इतका चांगला असतो काय ?' अशा प्रकारें भूदानाचा नाहीं तर गुळाचा प्रचार होतो.

आम्ही तर मासे पकडणारे लोक आहोंत. गांधीजींनीं आम्हांला मासे पकडायची विद्या शिकविली. त्यांनीं आमच्या हातीं निरनिराळीं जाळीं दिलीं. एखादा मासा एका जाळ्यांत आला नाहीं तर दुसऱ्यांत येईल. जर भूदानाच्या जाळ्यांत आला नाहीं तर तो खादीच्या जाळ्यांत येईल. जर त्यांत हि आला नाहीं तर शेवटीं तो गुळाच्या जाळ्यांत तरी येईल ना ? म्हणून या जगांत आम्ही अपराजित आहोंत. आमचा कधीं पराभव होऊं शकत नाहीं. आम्ही जेथें जातो तेथें आमचा विजय च होतो. याचें कारण महात्माजींनीं त्याला

अहिंसा नाव दिले तो गूळ आमच्याजवळ आहे. आम्ही लोकांना अहिंसारूपी गूळ खावयास दिला तर आमचे पुष्कळ काम होईल. म्हणून आपण भूदान कामासाठी जाताना एक च अग नव्हे तर सर्व च अगें घेऊन जा.

ही अष्टभुजा देवी आहे. तिच्या एका हातात एक शस्त्र आहे तर दुसऱ्या हातात दुसरे. आमचे देव हि कसे आहेत पहा. त्याच्या एका हातात गदा असते तर दुसऱ्या हातात फूल. सर्व हातात गदा च असतील, तर कोणी भक्त जवळ येणार नाहीत म्हणून आमच्या देवाच्या दुसऱ्या हातात कमळ आहे. म्हणून आपल हें भूदान ही च गदा आणि गूळ हें च आमचे फूल आहे. शख चक्र गदा पद्मधारी असे आम्ही विष्णु भगवान् आहोत. म्हणून आमची इच्छा नसताना ही लक्ष्मी आमच्याजवळ येईल. लोकांचे हातून जमीन सुटत आहे यात काही शंका नाही. म्हणून जर आम्ही प्रेमानें लोकांजवळ जाऊ तर अत्यंत सहजपणें ती लक्ष्मी आमच्याजवळ येईल.

### परीक्षक जनता

हिंदुस्थानातील लोक मोठे परीक्षक आहेत गाडीवान कसा आहे हें बैल बरोबर ओळखतो. त्याला चटकन् कळतें कीं गाडी चालविणारा शिक्षित आहे का अशिक्षित आम्ही म्हणतों की जनता मूर्ख आहे पण ती बुद्धिवान आहे ती आमच्या लोकाची अचूक परीक्षा करते हिंदुस्थानातील गरीब लोकांची सेवा सतांनी केली आहे म्हणून तिला जेव्हा समजतें कीं आम्ही सेवक आहोत तेव्हा ती सताच्या कसोटीस उतरेल अशी परीक्षा घेते. लोकाचें जीवनमान खालावल आहे पण विचाराची पातळी उचावली आहे. म्हणून च कार्यकर्ते आणि सेवक याच्या लहान लहान गोष्टी लोक पाहतात म्हणून च आमचें व्यक्तिगत आचरण जितकें निर्मळ आणि स्वच्छ असेल, तितकं लवकर आमच कार्य होईल

गाधीनगर
१८–१०–'५६

मला विचारलें जातें कीं, "तुम्ही राज्यावर विश्वास ठेवीत नाहीं व म्हणता कीं, फौज, पोलिस इ० चीं गरज नाहीं अशा स्थितींत जर आपल्या देशावर बाहेरच आक्रमण झालें तर देशाचें रक्षण कसें करावें?" मी म्हणतों कीं, दुसरा देश आमच्यावर हल्ला च का करील? आमच्या देशात जमीन पुष्कळ आहे व दुसऱ्या देशाजवळ कमी आहे, म्हणून जर तो देश हल्ला करणार असेल तर त्याला प्रेमाने जमीन देऊ आस्ट्रेलियात जमीन पुष्कळ आहे आणि ते दुसऱ्याना तेथें येऊं देत नाहींत, म्हणून त्याचेवर हल्ला होईल, पण हिंदुस्थावर हल्ला होऊ शकत नाहीं कारण आमचेजवळ जमीन थोडी आहे.

खरी गोष्ट अशी आहे कीं, हिंदुस्थानवर अमेरिका किंवा रशिया कधीं हि चढाई करणार नाहीं. जर चढाई करील तर पाकिस्तान करील, म्हणजे च भावाभावाचे भाडणाचा प्रश्न आहे. जगात जितकीं भाडणे होतात, तीं सर्व भावाभावाचीं च भाडणें असतात, शत्रूचीं नव्हेत भावाभावात च एकमेकावर हल्ले केले जातात, तसे मित्र वर नाहीं एखाद्या मित्राने एखादे वेळीं एखादा उपकार केला तर त्याची आठवण आपण जन्मभर ठेवतो, परतु भाऊ आपलें नेहमीं काम करतो आणि एखाद्या वेळीं त्याने आपलें ऐकलें नाहीं तर आपण त्याची च आठवण ठेवतों, म्हणून हीं सर्व भाडणे बधुप्रेमानें मिटतील, फौजेन नव्हे. जर आम्हीं फौज वाढविली तर पाकिस्तान हि आपली फौज वाढवील आणि पुन्हा विश्वयुद्धाचा धोका वाढेल परतु आज हिंदुस्थान जर हिंमत करुन आपलें सैन्य कमी करील तर हिंदुस्थानची शक्ति वाढल व पाकिस्तान हि सैन्यावर उगीच च खर्च करणार नाहीं

परतु यासाठीं धैर्य पाहिजे. हें भित्र्याचं काम नाहीं आम्ही भित्रे आहोंत. भित्र्याजवळ कल्पनाशक्ति नसते विचार करण्याची गोष्ट आहे कीं आमच्यावर कोणाचा हल्ला होईल. तिकडे तर ॲटम व हायड्रोजन

बॉम्ब तयार होत आहेत व ते आमच्याजवळ नाहींत. तरी आम्ही म्हणतों कीं आमच्याजवळ एक चाकू असणें च पाहिजे. माझा विश्वास आहे कीं, जर हिंदुस्तान आपलें सैन्य कमी करील तर तें जगांत सर्वांत शक्तिशाली राष्ट्र होईल व यामुळे त्याची नैतिक प्रतिष्ठा पुष्कळ च वाढेल, हिंदुस्थान पाकिस्तानी जनतेचें हृदय जिंकील आणि यूनोंत हि त्याचें वजन वाढेल.

तिरुपुर ( कोईम्बतुर )
१८-१०-'५६

## सामुदायिक मोक्षाची साधना : १८ :

साडेपाच वर्षांपासून भूदान यात्रा चालू आहे. लाखों लोकांनीं दान दिलें आहे. हें दान म्हणजे काहीं नवीन गोष्ट नव्हे. पुरातन काळापासून लोक दान देत आले आहेत. दानी लोकांची प्रशंसा केली जाते, त्याच्या-वर काव्यें रचलीं जातात. त्यांचीं भजन हि गाइलीं जातात. जशी दानाची परंपरा चालत आली आहे तशी च तपश्चर्येची हि. एखादा तपस्वी आपल्या चित्तशुद्धीसाठीं तपश्चर्या करतो. लोक त्याची सेवा करतात, त्याची प्रशंसा करतात. त्याच्या तपश्चर्येमुळें त्याच्याबद्दल आदरबुद्धि बाळगतात आणि त्यांना वाटतें कीं त्याच्या आशीर्वादानें आमचें कल्याण होईल. येथें असे हि ज्ञानी होऊन गेले आहेत कीं जे ज्ञानाचे उच्च पर्वत च होते. काहीं ज्ञानी असे होते कीं ज्यांच्या ज्ञानाचा अदाज लोकांना लागू शकला नाहीं. लोकांना इतकें च कळलें कीं हे ज्ञानसमुद्र आहेत. यांचेकडून आम्हाला काहीं ज्ञान मिळालें तर चांगलें होईल. परंतु आमच्यात ज्ञान प्राप्त करण्याची योग्यता नाहीं. म्हणून त्यांचा आशीर्वाद मिळाला, त्यांची कृपादृष्टि झाली, त्यांचें दर्शन घडलं तरी पुरे.

### सामुदायिक दान

आपल्या देशात अशा प्रकारची साधना चालत आली. भूदान यज्ञाचें काम यापेक्षा वेगळें आहे. दोहोंत हि दान आहे. यात हि कार्यकर्त्यांना

पुष्कळ हिंडावें लागतें, तपश्चर्या करावी लागते, यासाठीं अध्ययन करावें लागतें, ज्ञानाची गरज असते. परंतु यात जें केलें जातें तें समाजासाठीं च केलें जातें, सर्व समाजानें एकत्र येऊन काम करावें अशी इच्छा असते यात अशी गोष्ट नाहीं कीं एखाद्या च मनुष्यानें दान करावं, तर सर्वांनींच दान करावं दान केल्याखेरीज कोणीं राहू नये मला वारंवार विचारलें जातं कीं गरिबांनीं दान का द्यावयाचें? तेव्हा मी विचारतों कीं, का देऊ नये? परमेश्वरानें त्याना दोन हात दिले आहेत म्हणून त्यानें घ्यावें हि आणि द्यावे हि, जर द्यावयाचें नसतं तर ईश्वरानें त्याना एक च हात दिला असता. गरिबाचे जवळ हि देण्यासारखी गोष्ट आहे. ते पैशानें नव्हे तर श्रमानीं श्रीमंत आहेत ते आपल्या श्रमातील हिस्सा देऊ शकतात. प्रत्येकानें च दिलें पाहिजे एक जर व्यक्ति दिल्याशिवाय राहील तर या यज्ञाची पूर्ति होणार नाहीं एखाद्या गावच्या शंभर मनुष्यांपैकीं नव्याण्णव लोकानीं दान दिलें, काणीं भूदान, कोणीं संपत्तिदान, कोणीं श्रमदान दिलें, तर असे समजले जाईल कीं चागलें कार्य झालें, पण त्यानं यज्ञ पूर्ण होणार नाहीं. जेव्हा तो शिल्लक राहिलेला शंभरावा मनुष्य दान देईल तेव्हा च यज्ञ पूर्ण होईल. व्यक्तिगत ज्ञानाची कल्पना भिन्न आहे व या सामुदायिक दानाची, सर्व लोकाच्या दानाची, कल्पना वेगळी आहे. यातील विचार च वेगळा आहे

### सामुदायिक त्याग आणि भोग

मागें लोक पैसा मिळवीत पण तो व्यक्तिगत मिळवीत असत. आज हि तें चालू च आहे पण आज असा काळ आला आहे कीं सर्वांनीं मिळून संपत्ति निर्माण करावी. पूर्वीं एकट्याचा च भोग चालत असे, आता सर्वांनीं मिळून उपभोग घ्यावयाचा आहे. सर्वांनीं मिळून जीवनाची सर्व साधना करावयाची आहे. भूदानामागें हा च विचार आहे. त्याचा परिणाम म्हणून जो भोग मिळेल तो सर्वांना च मिळेल आणि त्याच्यासाठीं सर्वांना च त्याग करावा लागेल. सार्वजनिक त्यागात आणि सार्वजनिक उपभोगात एक विशेष आनंद असतो. यात कोणाच्या हि मनात हा अभिमान रहात नाहीं कीं मी त्यागी आहें. मी चोवीस तास श्वासोच्छ्वास घेतों आणि सर्व जण

हि घेतात. म्हणून त्याचा कोणाला हि अभिमान रहात नाहीं. पुण्यकार्यांत सर्वांत मोठा धोका हा असतो कीं पुण्याचा अहंकार जडतो. त्यागाच्या अहंकाराचा बोजा जर शिरावर बसला तर किती हि हजामत केली तरी तो बोजा दूर होत नाहीं. जे लोक अशा प्रकारें हजामत करतात त्यांना संन्यासी म्हणतात. सन्यासाचा हि अहंकार जडतो. अहंकाराची हजामत केली तर हजामतीचा अहंकार जातो. म्हणून अहंकारापासून मुक्ति मिळविणें ही सर्वांत मोठी गोष्ट आहे. जर आम्हीं त्याग केला नाहीं, पुण्य केलें नाहीं, तर आम्ही नीच आहोत, संसारांत फसलो आहोंत, अशी भावना होते. ' मीं नीच आहें ' असें म्हणणें हा हि अभिमानाचा च एक प्रकार आहे व मी उच्च आहे असें म्हणणे हा हि अभिमानाचा प्रकार च. यातून मुक्त होण्याचा एक च उपाय असा आहे कीं जी साधना करावयाची आहे ती सर्वांनीं मिळून केली पाहिजे.

## सामुदायिक तपश्चर्येचीं प्राचीन उदाहरणें

दहा पंधरा दिवसाचे उपवास करणारे कितीतरी तपस्वी असतात. आपण जुन्या ग्रंथात वाचतों कीं, अमुक एका ऋषींनीं तीन वर्षे उपवास केला. आम्हाला वाटते हें कसें संभवनीय आहे ? तो ऋषि दूध वगैरे कांहीं तरी पीत असेल. हल्लीं दूध पिऊन व केळीं खाऊन उपवास करतात. उपवासाचे दिवशीं खाण्याच्या कांहीं विशिष्ट वस्तु असतात. असे च जर ते ऋषी करीत असतील तर तीन च काय तीस वर्षे हि ते उपवास करूं शकतील. परंतु ग्रंथात लिहिले आहे की ऋषींनीं तीन वर्षे पाण्याशिवाय उपवास केला. यावर असा विचार मनात येतो कीं, त्या वेळीं एखाद्या साधनेसाठीं सर्व लोक एकत्र येऊन उपवास करीत असतील. ते एखाद्याच्या मार्गदर्शनाखालीं करीत असतील. समजा कीं बावन्न व्यक्तींनीं वसिष्ठ ऋषींच्या मार्गदर्शनाखालीं एक आठवडा पाण्याशिवाय उपवास केला असेल तर असें म्हटलें जाई कीं वसिष्ठ ऋषींनीं एक वर्षभर उपवास केला. म्हणजे सर्वांच्या सर्व तपश्चर्या वसिष्ठ ऋषींच्या नावावर लिहिली गेली. आम्ही असें हि वाचतों कीं अमुक ऋषीनें तीस वर्षे तपश्चर्या केली. याचा अर्थ असा कीं, एखादा

ऋषिसंघ असेल आणि सर्वजण मिळून तपश्चर्या करीत असतील व ती एखाद्या ऋषीच्या नावावर लिहिली जात असेल.

आज हि असे होतें. असें बोलले जातें कीं, बाबांना चाळीस लाख एकर जमीन मिळविली. परंतु बाबांने जर पाचशे वर्षे काम केलें तरी हि हे शक्य नाहीं कीं तो चाळीस लाख एकर जमीन मिळवील. परंतु हजारो लोकांनीं जमीन मिळविली आणि तें सर्व श्रेय बाबांचे नावावर लिहिले गेले. अशा प्रकारें जेथें सामुदायिक साधना होते तेथे एक विशेष शक्ति प्रकट होते आणि त्या तपश्चर्येचा अहंकार होत नाहीं.

## मोक्ष व्यक्तिगत असूं शकत नाहीं

मनुष्य जीवनामध्ये उपभोग किंवा मोक्ष जें काहीं प्राप्त करवायाचे तें सर्वांनीं मिळून प्राप्त केलें पाहिजे अशी कल्पना दृढ झाली पाहिजे. ऋषीने म्हटलें आहे—'**कलदु निन् अडियारोडु**' अर्थात् आम्हो तुमच्या भक्ता-बरोबर एकत्रित राहाणें इच्छितों. भक्तगणाच्या साधनेचे हें च रहस्य आहे. पूर्वीच्या काळातील लोक समाजातील कोणता हि व्यापक प्रश्न सोडविण्या-साठीं सामुदायिक तपस्या किंवा सामुदायिक ज्ञानाची कल्पना फारशी करत नसत. हीं थोडीं उदाहरणें मीं आता च दिलीं.

परंतु मी असें सागू इच्छिता कीं, आता सर्वांनीं मिळून उपभोग आणि मोक्ष प्राप्त करण्याचा काळ आला आहे सर्वांनीं मिळून उपभोग घेण्याची थोडी कल्पना येऊ शकते, परंतु सर्वांनीं मिळून मोक्ष प्राप्त करण्याची कल्पना अगदीं नवीन आहे

लोक म्हणतात कीं, मोक्ष तर व्यक्तिगत असतो. परंतु हा अगदीं चुकीचा विचार आहे. जो व्यक्तिगत असतो तो मोक्ष च नव्हे. मोक्षाचा अर्थ आहे 'अहंकारापासून मुक्तता' 'माझा मोक्ष' असें बोलणें जेथें येते तेथें मोक्ष संपून च जातो. 'मोक्ष' याचा अर्थ आहे व्यक्तित्वापासून मुक्त होणें, सामूहिक, समाजमय बनणें भोग व्यक्तिगत हि असू शकतो एखादी व्यक्ति कोठल्या तरी कोपऱ्यात जाऊन, तोंड लपवून आश्रा राऊ शकते परंतु व्यक्तिगत मोक्षाची ही कल्पना नाहीं. ज्याने अशी कल्पना केली आहे

त्याला मोक्षाचा अर्थ च समजला नाहीं, त्याने दुसऱ्या च एखाद्या गोष्टीला मोक्ष मानलें.

## आमचें कार्य

मला वाटतें समाजाला अजून मोक्ष प्राप्त झाला नाहीं. त्याची साधना चालू आहे. हळू हळू आम्ही वर चढत आहोत. आजचे ऋषी जुन्या काळच्या ऋषींपेक्षा थोर आहेत. आजच्या काळीं जसें जुन्या काळापेक्षा भौतिक ज्ञान अधिक आहे तशी च आजच्या आध्यात्मिक ज्ञानाची पातळी हि उच्च आहे. मी हें अशासाठीं सांगतों कीं, आपल्या मनात अशी शंका असू नये कीं पूर्वी दानामुळें जमिनीचा मोठा प्रश्न कधीं च सुटला नाहीं तर तो आता कसा सुटणार ? मी आपल्याला सांगतो कीं, पूर्वीच्या काळीं ज्या गोष्टी झाल्या नाहींत त्या च करण्यासाठीं तुमचा व आमचा जन्म आहे. आज आम्हाला व तुम्हाला एक नवीन कार्य करण्याची संधि मिळत आहे. हें दोघांचें हि भाग्य आहे. मला आशा आहे कीं गावोगावच्या लोकांनीं ही गोष्ट समजावून घ्यावी. कार्यकर्त्यांनीं ही गोष्ट समजावून द्यावी आणि ह्या यज्ञात भाग न घेणारी एक हि व्यक्ति भारतभूमींत असू नये.

वेलपालेयम् ( कोयम्बतूर )
२०-१०-'५६

हिंदुस्थानला हजारों वर्षे राजाचा अनुभव आहे. त्यावरून लोक या निर्णयावर पोहोंचले आहेत कीं, येथें राजे प्रजेच्या कल्याणाच्या दृष्टीने योग्य नाहींत. पण राजा एकटा च राज्य करीत नव्हता. तो कांहीं मंत्री तयार करी आणि त्याच्या सल्ल्यानें राज्य चालवी. आता लोकांनीं राज्यसंस्था नष्ट केली. आता प्रजा पांच वर्षांकरिता राज्यकर्ते निवडते. पुढच्या वर्षी लोक आपल्याला विचारतील कीं राजा कोणाला करावे? ज्याला आज मुख्य मंत्री म्हणतों तो राजा लोकांच्या मर्जीनुसार निवडला जाईल. तो पांच वर्षे राज्य चालवील आणि आपले मंत्री स्वतः निवडील. त्याबाबत तो कोणाला हि विचारणार नाहीं.

## आजच्या सरकारच्या हातीं राजापेक्षां जास्त सत्ता

आजचे मुख्य मंत्री आणि राजामध्यें विशेष फरक नाहीं, थोडासा च फरक आहे. पहिला फरक असा कीं, पूर्वी राजा मरेपर्यंत राज्य करी; आता मुख्य मंत्री पांच वर्षे च राज्य करील. पांच वर्षांनंतर आपण जर त्याना पुन्हा निवडलें तर तो पुन्हा पांच वर्षे राज्य करील. दुसरा फरक हा आहे कीं, पूर्वी राजाचा मुलगा गादीवर बसत असे. परंतु आता राज्यकर्त्याचा मुलगा राज्य करू शकत नाहीं. एवढा च फरक आहे. परंतु बाकी सागाड्यात बदल झाला नाहीं. पांच वर्षे तो आपला संपूर्ण अधिकार चालवितो. तो करील तें च प्रमाण. आजच्या कालातील पांच वर्षे जुन्या काळातील पन्नास वर्षांबरोबर आहेत. पूर्वी राजा आज्ञा देत असे ती देशात सर्वत्र पोंचण्यास दोन चार वर्षे लागत असत. औरंगझेब बादशहाची आसामच्या गव्हर्नरला आज्ञा झाली तर ती दिल्लीहून तिथें पोंचेपर्यंत दोन तीन महिने निघून जात. नंतर तो 'गव्हर्नर' आपल्या सरदाराना ती आज्ञा गावोगावीं पोंचविण्याची आज्ञा देई. अशा प्रकारें गावोगावीं राजाची आज्ञा पोंचण्यास आणखी चार पांच महिने लागत.

मध्यंतरीं परिस्थिति बदलली तर राजाकडून दुसरी आज्ञा पाठवली जाई. पहिल्या आज्ञेची अमलबजावणी सुरु होता च दुसरी आज्ञा येत असे. ती आज्ञा गावोगावीं पोंचण्यास एक वर्ष लागे म्हणून ते फक्त नाममात्र राजे असत. ते प्रजेच्या मोठ्या जीवनभागावें नियमन करू शक्त नसत लोकांना चागले च राजा म होत आज परिस्थिति वेगळी आहे. आज दिल्लीहून निघालेला हुकूम त्या च दिवशीं साऱ्या हिंदुस्थानात पोचतो. रेडिओ इ० साधनाचे द्वारा दिलेल्या आज्ञेची अमलबजावणी होण्यास दोन तास लागतील. दुसऱ्या देशाची ही च स्थिति आहे. म्हणून ज्याला राजा केलें जातें, तो पाच वर्षांसाठीं असला तरी पूर्वीच्या पन्नास वर्षे राज्य करणाऱ्या राजाला होणार नाहीं इतकें काम तो या पाच वर्षांत करू शकतो. आजचीं पाच वर्षे म्हणजे पूर्वीच्या राजाच मृत्युपर्यंतच सर्व आयुष्य. बीस वर्षांत पूर्वीचा राजा जितके हुकूम काढू शकत असे तितके हुकूम आजचा मुख्य मंत्री काढू शकतो. म्हणून त्याना जर प्रजेचें कल्याण करावयाचें असेल तर ते कल्याण करतील व अकल्याण करावयाचें असल्यास तें हि करू शकतील. प्रजेच्या हातीं काहीं हि राहाणार नाहीं.

आपण या भ्रमात राहू नका कीं पाच वर्षांनीं आपल्या हातीं राज्य राहील. पाच वर्षांत इकडचे जग तिकडे होईल. आज प्रजेला विचारण्याचें फक्त नाटक च होतें. त्याचा परिणाम असा होतो कीं, राज्यकर्ते सांगतात कीं आम्ही जे काहीं करतों तें प्रजेच्या संमतीनें च करतों. जुने राजे असें म्हणू शकत नव्हते. आज मुंबई, कलकत्ता, पाटणा इ० ठिकाणीं सरकारद्वारा गोळीबार झाला तर ते म्हणतील कीं आम्हीं लोकांच्या संमतीनें च गोळीबार केला लोकांनीं आम्हाला राज्य करण्याची आज्ञा दिली म्हणून आम्हाला असे करणें भाग पडल. जुन्या राजाचे सरदार असं म्हणू शकत नव्हते कीं आम्ही लोकांच्या संमतीनें च गोळीबार केला. म्हणून ते जें काहीं पाप-पुण्य करीत असत त राजाचें पाप पुण्य ठरत असे आणि त्याची जबाबदारी राजावर च पडत असे पण आजचे राजे जें पाप-पुण्य करतील त्याची जबाबदारी आपणावर आहे आणि जुन्या काळच्या राजाच्या शतपट सत्ता आपल्या मुख्य मंत्र्याजवळ आज आहे. म्हणून गावोगावच्या लोकांनीं

जागृत झाले पाहिजे. आपले मतें वाटेट करण्याचा अधिकार कोणाला हि देता कामा नये. पाच वर्षांसाठीं नाहीं च पण पाच दिवसासाठीं हि नाहीं.

**ग्रामराज्यानें गांव स्वतंत्र होईल**

तुम्ही आपल्या गावाचें एक राज्य तयार करा. कोणता माल बाहेरून आणावयाचा तें सर्वांनीं ठरवावें. गावात इतकी शक्ति आली पाहिजे कीं याशिवाय कोणीहि व्यक्ति कोणती हि गोष्ट विकत घेणार नाहीं व विकणारा तसा च परत जाईल गाव एक राज्य ( स्टेट ) आहे आज प्रातरचनेच्या बाबतींत चर्चा चालू आहे कीं कोणता तालुका कोणत्या राज्यात घातला जावा राज्य करणारे इकडचें तिकडे घालतात व तिकडचें इकडे घालतात, तुम्हाला कोणी विचारावयास येत नाहीं. पाच वर्षांनीं दुसरा राज्यकर्ता येतो व तो इकडचे तिकडे व तिकडचे इकडे करतो. जर कोणी तुम्हाला विचारलें कीं, ' आपण कोठें राहता ? ' तर उत्तर असे असावें कीं, मी गावात राहणारा आहे व माझा गाव जगात आहे. आपण आमची गणना तामिळ, म्हैसूर इ० पाहिजे त्यात करा, आम्ही आपली गणना गावात करतों आणि जागा जर कोठे आहे असें विचाराल तर ती जगात आहे. आमचा राजा परमेश्वर आहे आणि गावकरी मिळूनमिसळून राज्य-कारभार चालवतात आज आपल्या गावच्या व्यवस्थेची योजना दिल्लींत, फार तर मद्रासमध्यें, होते, परतु जोंपर्यंत आपल्या गावाची व्यवस्था आपण करणार नाहीं तोंपर्यंत गुलामगिरी संपणार नाहीं.

म्हणून सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, आपण च आपला कारभार चालवावा गावातील जे एकवीस वर्षांवरील स्त्री पुरुष असतील त्याची एक ग्रामसमिति नेमावी आणि तींतून सर्वांचे मतानें काम करण्यासाठीं एक कार्यसमिति बनवावी. ते लोक गावाची सेवा करतील ते गावासाठीं जो न्याय देतील तो गावात च होईल. त्याचा खर्च सर्व गाव करील. म्हणून कर्जाचा प्रश्न च येणार नाहीं. गावच्या समितीतर्फे गावात एक दुकान चालेल. त्यात गावकरी जो निर्णय देतील त्या च वस्तु ठेवल्या जातील. भाडणाचा निकाल गावात च होईल. त्यावर अपील केलें जाणार नाहीं. असें कराल तर च गावाला खरें स्वातत्र्य मिळेल.

मग जर दिल्लीतील लोक म्हणाले की, बाहेरून होणाऱ्या आक्रमणापासून रक्षण करण्यासाठी सैन्य पाहिजे, देशात रेल्वे पाहिजे, या सर्वांच्या व्यवस्थेसाठी थोडा कर द्या, तर तो दिला पाहिजे. परंतु त्यात हि आपण असे म्हणू शकता की, आमच्या गावचा कारभार आम्ही च पाहतो. म्हणून आमच्या कराचा उपयोग आमच्या गावासाठी च केला जावा. यावर सरकार म्हणेल की, रुपयातील पंधरा आणे तुम्ही ठेवा आणि एक आणा आम्हाला द्या. अशा प्रकारें गावची सत्ता आपल्या हातीं येईल तेव्हा च देश वाचेल. हा च सर्वोदयाचा प्रयत्न आहे. भूदान यासाठीं च आहे. थोडी जमीन घेऊन ती वाटणें हा त्याचा उद्देश नाहीं. व्यक्तिगत मालकी नष्ट करणें हे च त्याचें उद्दिष्ट आहे.

### व्यक्तिगत मालकी नाहींशी होण्यानें व्यक्तिगत रडणें थांबेल

लोक विचारतात, व्यक्तिगत मालकी राहिली नाहीं तर काम कसें चालेल? पण हा भ्रम आहे. व्यक्तिगत मालकी नष्ट झाली कीं व्यक्तिगत दुःख हि नष्ट होईल. सर्वांनीं मिळून काम केल्यावर रडण्याची पाळी का येईल? आज प्रत्येक शेतकऱ्याच्या मागें एक सावकार आहे. शेतकरी रडतो आणि बाकीचे लोक पाहतात. व्यक्तिगत मालकी ठेवली आहे म्हणून व्यक्तीला रडावें लागतें. व्यक्तीची मालकी नष्ट झाली व रडावें लागलें तर सारें गाव रडेल. सर्वच्या सर्व गाव रडेल असा प्रसंग येणें सोपी गोष्ट नाहीं. सर्वांनीं मिळून काम केलें तर हसण्याची च वेळ येईल. या दृष्टीनें आपण भूदानाकडे पाहा.

### ग्रामदान कशासाठीं?

जर तुम्ही हे योग्य तऱ्हेनें जाणलेंत आणि त्याप्रमाणें आचरण केलेंत तर तुम्ही सुखी व्हाल नाहीं तर पाच पाच वर्षांनीं राजा बदलत राहील आणि आपण तो निवडून देत राहाल. तुम्ही हें लक्षात ठेवा कीं, राजा अजून मेला नाहीं तर तो जोरदार झाला आहे. फक्त त्याचें नाव बदललें आहे. जोपर्यंत आम्ही आमच्या गावात गावाचें राज्य चालू करणार नाही तोंपर्यंत हे राजे चालत राहाणार. ग्रामदानात तुमचें कांहीं हि गमावणार नाहीं.

५–१० वा ५० एकर जमिनीचा मालक दोन हजार एकर जमिनीचा म्हणजे गावच्या सर्व जमिनीचा मालक होईल त्याच्यात कोणी काहीं गमावणार नाहीं, पुष्कळ मिळवील च. एक लहानसे कुटुंब होते त्या वेळीं जो येईल तो त्याना भरडत असे. जर आता तो परिवार मोठा होईल तर त्याला कोणी हि भरडूं शकणार नाहीं. हा च ग्रामदानाचा अर्थ आहे. म्हणून बाबा ग्रामदान मागत आहे.

कनकम्पालेयम्
२१–१०–'५६

## विणकरांना : २० :

विणकराचा धंदा शिकण्यात वा तो वाढविण्यात आजपर्यंत कोणाची एक कवडी हि खर्च झाली नाहीं. वेदात एक मंत्र आहे. ऋषि ईश्वराला आपलें स्तोत्र अर्पण करीत आहे : 'वस्त्रेव भद्रा सुकृता सुपाणि।' जसें एखाद्या विणकरानें सुंदर वस्त्र बनवावें तस च मीं हें स्तोत्र बनविलें आहे आणि तें तुला समर्पण करतो. हें दहा हजार वर्षांपूर्वीचें वचन आहे. यावरून हे स्पष्ट होतें कीं दहा हजार वर्षांपासून आमच्या देशात विणकराचा धंदा चालू आहे. बापानें मुलाला ती कला पुष्कळ शिकवली आहे ही कला शिकवण्यासाठीं शिक्षक ठेवावा लागला नाहीं, शाळा उघडावी लागली नाहीं, किंवा सरकार वा अन्य कोणाला ही कला शिकवण्यासाठीं एक कवडी हि खर्च करावी लागली नाहीं. परंतु आज ती कला मारण्यासाठीं च सरकारकडून खर्च केला जात आहे ही किती विचित्र गोष्ट आहे ! कारण एकदा का चरख्याला पावर-लूम लागला कीं हाताची कला नष्ट होईल. हजारो वर्षां-पासून जी कला विकास पावत आली आहे ती एका क्षणात नष्ट होऊं शकते. याकरिता च आपण जो पावर-लूमचा निषेध केला त्याला माझी सहानुभूति आहे. अशा सभा गावोगाव झाल्या पाहिजेत आणि विणकरानीं आपला आवाज उठवला पाहिजे कीं आम्हाला पावर-लूम नकोत.

लक्षात ठेवा कीं जर ह्या वेळीं राजाचें राज्य असतं तर तुम्ही ओरडला असता कीं 'राजाचा जुलूम झाला आहे.' पण हें प्रजेचें राज्य आहे या राज्यात तुम्ही गप्प बसाल तर असें च मानलें जाईल कीं सर्व कांहीं आपल्या च संमतीनें होत आहे. म्हणून या गोष्टीविरुद्ध आवाज उठविणें आपलें कर्तव्य आहे. मनात निषेध ठेवाल तर काम चालणार नाहीं हजारो सभांच्या द्वारें आपला आवाज उठविला पाहिजे आणि ज्यांचे कान हृदयपर्यंत येऊं शकत नाहींत त्यांच्या कानापर्यंत तो आवाज पोंचला पाहिजे इतक्या जोरात आवाज उठविला पाहिजे कीं बहिऱ्यांच्या कानांना हि तो ऐकूं गेला पाहिजे. जर तुम्ही असें कराल तर सरकार-विरुद्ध कांहीं च करत नाहीं परंतु चांगलें राज्य चालविण्यात सरकारला मदत च देतां जर तुम्ही आवाज उठविला नाहीं तर सरकारला वाटेल कीं लोकांना ही गोष्ट पसंत आहे आणि लोकांच्या पसंतीनें राज्य चाललें आहे म्हणून हा निषेध जरूर आहे आणि प्रजेच्या नात्यानें आपलें हें कर्तव्य आहे

पण या निषेधाबरोबर च आपली संघटना हवी फक्त विणकरांची संघटना पुरेशी नाहीं विणकर, शेतकरी आणि इतर धंदे करणारे यांचा एक संघ पाहिजे तीन दोऱ्या एकत्र करून वळल्यानें च ती मजबूत होते विणकर एक धागा, शेतकरी एक धागा आणि इतर कार्य करणारे एक एक धागा या सर्वांना वळल्यानें एक मजबूत दोरी होईल आणि ती कोणी तोडूं शकणार नाहीं म्हणून आपण गावाच्या बरोबर एकरूप होण्याचा जो निश्चय केला आहे त्यामुळें मला फार आनंद झाला जगात निषेधानें च काम चालत नाहीं निषेधाबरोबर कांहीं काम हि असलें पाहिजे त्याच्या बरोबर कांहीं स्वरूप असेल तर शक्ति वाढेल परंतु हें हि समजा कीं फक्त प्रस्ताव करण्यात च शक्ति नाहीं तो अमलात आणाल तर च शक्ति निर्माण होईल

मुरट्टपालयम्
२२-१०-'५६

आपल्या गावाच्या नावावरून आचार्य नरेन्द्रदेवांची आठवण येत आहे. ते भारताचे एक मोठे सेवक होते, आणि शेवटच्या आजारात ते येथें येऊन राहिले होते. सत्पुरुषाचें मरण-स्थान हि महत्त्वपूर्ण मानलें जातें कारण त्यांची शेवटची शुभवासना त्या ठिकाणाशीं निगडित असते. मला उमेद वाटते कीं येथील बंधु-भगिनींना त्यांच्या स्थानापासून निष्कामसेवेची प्रेरणा मिळेल. प्रत्येक मनुष्य कांहीं ना कांहीं सेवा करतो च. त्याशिवाय जगणें शक्य नाहीं. परंतु जेव्हा आम्ही सेवा करतों तेव्हा त्याच्याबरोबर च एखाद्या फळाची अपेक्षा करतो. अपेक्षा ठेवून जी सेवा केली जाते तिची किंमत थोडी कमी होते, पण जेथें प्रेमानेंच सेवा केली जाते आणि त्यापासून मिळणाऱ्या मानसिक आनंदाशिवाय कांहीं इच्छा असत नाहीं तेव्हा त्या सेवेची किंमत वाढते. अशी सेवा करणारे ईश्वर भक्त असतात. ते लोकांची सेवा करतात आणि त्यामुळें हृदयात आनंदानुभव मिळवतात. त्यानें च त्यांची तृप्ति होते.

## खेळासारखेंच सेवा-कार्य

ज्या सेवेबरोबर कांहीं वासना असते, त्या सेवेमुळें पूर्ण आनंद मिळत नाहीं. प्रत्येक कामाचे बाबतींत ही गोष्ट लागू पडते. मुलें खेळतात तेव्हा त्यांना त्यात आनंद मिळतो. त्यामुळे व्यायाम हि होतो आणि देहाला लाभ हि होतो, पण ते देहाला लाभ होण्याच्या इच्छेने खेळत नाहींत. आनंद व सहज वृत्तीनें खेळतात म्हणून मुलांचा खेळ निष्काम कर्मसेवा होते. अशा च प्रकारें सत्पुरुषांचीं जीं लोकसेवेचीं कार्यें असतात, तीं स्वयंस्फूर्त असतात आणि खेळासारखीं च असतात. मुलांना विचारलें कीं, तुम्ही का खेळता? त्यांच्या मनात च हा प्रश्न नसतो. तीं असें हि म्हणू शकणार नाहींत कीं तीं आनंदासाठीं खेळतात. शरीर सुदृढ व्हावें म्हणून खेळत नाहींत. खेळानें शरीराला फायदा होतो आणि आनंद हि मिळतो.

पण मुलें स्वभावत न गेळकर असतात तसें च सत्पुरुषाचा स्वभाव च सेवा करणें हा आहे त्या सेवेमुळें लोकांना फायदा होतो आणि झाला हि पाहिजे लाभ मनात ठेवून सेवा करावी लागते पण त्या सेवेमध्यें ते कांहीं वासना ठेवत नाहींत म्हणून ते जी सेवा करतात त्याची जबाबदारी त्याचेवर नाहीं

## स्वभावत. च सेवा

असा प्रश्न विचारला जातो कीं ईश्वरानें सृष्टिरचना का केली? आम्ही त्या सृष्टीचे छोटेसे अंश आहोंत तर याचें काय उत्तर देणार ? परतु या प्रश्नाचें उत्तर दिलें गेलें आहे 'लीलामात्रम्' म्हणजे ईश्वरानें खेळण्या साठीं सृष्टिरचना केली नटराज का नाचतो? त्यामुळें सृष्टीची निर्मिति, प्रलय आणि प्रलय हि होतो त्यात भक्तावर अनुग्रह असतो आणि त्याच मोचन हि होतें त्याच्या नाच्यावरून असें पचविध कार्य होत तरीं अनेक कार्यें असतील परतु मोजण्यासारखीं पाच च आहेत नटराजला विचारलें कीं, तू 'पचविध कार्य करतोस का?' तर तो सागेल कीं, 'मी नाचतों' त्याचा हा खेळ चालू आहे त्याचा भार त्याचे शिरावर नाहीं पचविध कार्य केल्याशिवाय तो राहू शकत नाहीं

जर आपण सूर्यनारायणाला म्हटलें कीं, 'तू चोवीस तास सतत प्रकाश देतोस, मनुष्य व प्राण्याना उष्मा देतोस किती महान् कार्य आहे हे! अधकार दूर करतोस हे तुझे महान् उपकार आहेत' तर तो म्हणेल कीं, 'मी काय उपकार करतों, हे मला माहीत नाहीं' प्रकाशदान हा सूर्याचा स्वभाव आहे त्याशिवाय सूर्य राहू शकत नाहीं सूर्याचें सूर्यत्व त्यावर च अवलबून आहे म्हणून तो जीं जीं कामें करतो त्याचा भार त्याच्या शिरावर नाही आरोग्याचा आम्हाला भार वाटतो का? भार रोगाचा असतो, आरोग्याचा नाहीं कारण आरोग्य ही च प्रकृति आहे, हा च स्वभाव आहे म्हणून त्याचा भार वाटत नाहीं

## परोपकारासाठीं च जीवन

परोपकार करणें सत्पुरुषाचा स्वभाव आहे त्याना त्याची जाणीव नसते

त्याना वाटलें कीं आपण आपलें काम करतो. एकदा एक शेतकरी लोकमान्य टिळकाना भेटण्यास आला आणि नमस्कार करून म्हणाला, 'आपले आमच्यावर मोठे उपकार आहेत आपण महापुरुष आहात' लोकमान्य म्हणाले, 'तू शेती करून पोट भरतोस आणि मी लेख लिहून, व्याख्यान देऊन म्हणून तू जें काम करतोस त्याच्यापेक्षा मोठें काम मी करीत नाहीं. जर उपकाराची च गोष्ट बोलावयाची तर माझ्याइतके च तुझे जगावर उपकार आहेत.' तात्पर्य हें कीं, आपण कांहीं उपकार करतों असें त्याना वाटलें नाहीं

आई मुलाची किती सेवा करते! त्याच्यासाठीं च आयुष्य घालविते चोवीस तास त्याच्यासाठीं च काम करते जर ती असें म्हणेल कीं, मी किती काम करतें, तर मुलें म्हणतील कीं आम्ही तुझे फार उपकारी आहोंत परंतु आज आई म्हणत नाहीं कीं मी सेवेचें काम करतें आणि मुलें हि तिचे आभार मानीत नाहींत आई मुलांची सेवा करते आणि मुलें आईची सेवा करतात, कोणी कोणाचे आभार वा उपकार मानीत नाहींत

परंतु संस्थेचा सेक्रेटरी आपल्या वर्षभर कामाचा लांबलचक रिपोर्ट तयार करतो आणि नंतर सर्व लोक एकत्र होऊन त्याचे आभार मानतात अशा तऱ्हेनें जेथ सेवेचें नाटक चालतें तेथें उपकाराचा भार वाटतो आणि आभार मानले जातात परंतु स्वभावतः च उपकार होतात तेथें त्याचा भार वाटत नाहीं

### सत्पुरुषांची सेवा 'बाय प्रॉडक्ट' होय

कावेरी नदी अखंड वहाते ती किती उपकार करते! लोकांवर पाणी, वृक्ष, शेतकरी, कारखानदार यांच्यावर आणि शहरात वीज पोचल्यावर शहरातील लोकांवर असंख्य उपकार करते तुम्ही तिला म्हणाल कीं तू किती उपकार करतेस तर ती असें च म्हणेल कीं, 'मी काय उपकार करतें मला माहीत नाहीं मला इतकें च माहीत आहे कीं मी समुद्राला मिळावयास जात आहें. दुसरें एखादें काम मी करीत असेन तर मला तें माहीत नाहीं पण एक च काम मला माहीत आहे माझें जें ध्येय-गंतव्यस्थान समुद्र-

आहे, त्याला भेटण्यासाठीं मी जात आहे. ' तसें च भक्त लोक परमेश्वराला भेटण्यासाठीं प्रयास करतात. ईश्वराजवळ जाण्यासाठीं त्याची यात्रा चालते. परतु त्यामुळें लोकावर उपकार होतात. असख्य मनुष्याची सेवा होते. ही सेवा त्याचा ' बाय-प्रॉडक्ट ' आहे. ते सेवा करता करता च आपापलें जीवन पूर्ण बनवितात, त्याचें सार्थक करतात.

## निष्काम आणि सकाम सेवेचीं उदाहरणें

भगवान् सूर्यनारायणाचा प्रवास सकाळपासून सध्याकाळपर्यंत अखड चालत असतो. त्यामुळें लोकाची कितीतरी सेवा होते. पण सूर्य समजत नाहीं कीं मी सेवा करीत आहे. अशा च सेवेला निष्कामसेवा म्हणतात. अशा प्रकारची निष्कामसेवा करण्यासाठीं च मनुष्यदेह आहे.

महात्मा गांधींनीं सतत चाळीस वर्षे स्वराज्यासाठीं काम केलें. त्याचे चोवीस तास स्वराज्यचितनात जात. जेव्हा स्वराज्य मिळालें तेव्हा दिल्लींत आणि प्रत्येक मोठ्या शहरात रोषणाई झाली. पण त्या वेळीं गाधीजी नोआखालीमधे पायीं फिरत होते, दु खितांचे अश्रु पुसण्याचें काम करीत होते. स्वराज्य मिळाल्यावर त्यानीं कोणता च अधिकार आपल्या हातीं ठेवला नाहीं. अशा च प्रकारें भगवान् श्रीकृष्णाने कसाचा वध केला आणि सारे राज्य त्याचे हातीं आल. परतु कृष्णानें स्वत राज्यपद घेतलें नाहीं त्यानें उग्रसेनाला राजा केले

नतर त्याचे हातीं द्वारकेचं राज्य आलें. तेव्हा ते बलरामाला दिलें, स्वत घेतलें नाहीं महाभारताचं मोठें युद्ध झालें आणि त्यात श्रीकृष्णामुळें पाडवाना जय मिळाला. परतु शेवटीं भगवान् श्रीकृष्णानीं धर्मराजाचा मस्तकावर अभिषेक केला. ते सर्वदा सेवक च राहिले. याचें च नाव निष्कामसेवा. लोकमान्य टिळक स्वराज्यासाठीं सतत प्रयत्न करीत राहिले. पण जेव्हा त्याना विचारलें कीं स्वराज्यप्राप्तीनतर आपण कोणता अधिकार घेणार ? तव्हा त्यानीं म्हटलें कीं ' स्वराज्यप्राप्तीनतर अधिकारपद घेणें माझं काम नाहीं. मी वेदाचा अभ्यास करीन वा गणिताचा अध्यापक होईन ' याचें च नाव निष्कामसेवा. अशी थोडीशी निष्कामसेवा ज्याचे हातून होते त्याला अत्यत समाधान आणि तृप्ति होते.

## दात्यांना हि निष्काम सेवेचें समाधान

मला वाटतें कीं, भूमिहीनांना भूमि मिळावी आणि त्यांच्या मदतीसाठीं संपत्तिवाल्यांची संपत्ति. सर्व लोकांनीं आपली जमीन, संपत्ति आणि बुद्धि गरिबांच्या सेवेंत खर्च करावी याबद्दल आम्ही त्या देणाऱ्यांना कसले अधिकार देणार ? कीं त्यांची कसली शिफारस करणार ? आम्ही त्यांना निष्कामसेवेचें समाधान देऊं. केवळ निष्कामसेवेच्या प्रेमानें जे लोक आपली जमीन, संपत्ति आणि बुद्धीचा थोडासा अंश दान देतील तर त्यांना अत्यंत समाधान वाटेल. यामुळ भूमिहीनांना जो आनंद होईल त्याच्यापेक्षा कितीतरी अधिक आनंद देणाऱ्यांना होईल. एखादा तृषित मनुष्य आपल्या घरीं येऊन पाणी मागूं लागला आणि जर आपण त्याला गार पाणी दिलें तर त्याचा अंतरात्मा तृप्त होईल. पाणी पिणाऱ्याला जितका आनंद होतो त्यापेक्षा अधिक आनंद पाजणाऱ्याला होतो. ही गोष्ट बरोबर आहे कीं चूक याचा तुम्हीच आपल्या मनाशीं विचार करा. तुम्ही गरिबांना, दु:खितांना काहीं मदत कराल तर त्यांच्यापेक्षा जास्त आनंद तुम्हांस होईल. तुम्ही अनुभव घेऊन पहा. आणि जर आपल्या मनाचा निश्चय झाला कीं यांत आनंद, संतोष आणि तृप्ति आहे तर आपण हें काम करा.

परेन्दुराई ( कोयम्बतूर )
२४–१०–'५६

भारत फार मोठा देश आहे. त्यात ३६ कोटींपेक्षा अधिक लोक रहातात. त्यातील ⅙ लोक शहरात रहातात. ते लोक शेती करीत नाहींत वा करू शकत नाहींत. गावात जे कारागीर आहेत त्याना शेतीचें काम करता येत नाहीं कारण त्याना गावातील लोकांचीं कामें करावीं लागतात. आज सर्व देशाला अन्न देण्याचें काम शेतकरी व शेत मजुरांचें आहे. बाकी सर्व लोक धान्य विकत घेतात. धान्य अशी वस्तु आहे कीं त्याच्या-शिवाय कोणाचें चालणार नाहीं. ती वस्तु सर्वांना मिळणे जरूर आहे. म्हणून ती महाग हि विकता कामा नये. वास्तविकपणें ' अन्नाची किंमत ' ही कल्पना च सोडून दिली पाहिजे. जशी हवा व पाणी सर्वांना फुकट मिळते तसें च अन्न पैशाशिवाय मिळालें पाहिजे. जर तें फुकट मिळू शकत नसेल तर कमींत कमी किंमतींत मिळालें पाहिजे. जवळ जवळ फुकट च. परंतु धान्याचा भाव कमी असेल तर शेतकऱ्याला त्रास होतो. म्हणून महाग हि नाहीं व स्वस्त हि नाहीं असा मार्ग काढला पाहिजे.

## अन्न-धान्यापासून पैसा मिळत नाहीं

ही गोष्ट सर्वश्रुत आहे कीं धान्य विकून पुष्कळ पैसा मिळत नाहीं. शेतकरी हि ही गोष्ट जाणतात तरी हि त्यांची मागणी असते कीं, धान्याची किंमत जास्त असावी. त्या च बरोबर ते जाणू शकतात कीं, धान्य अधिक महाग होऊ शकत नाहीं. जी गोष्ट सर्वांना हवी, ती महाग होऊ शकत नाहीं. म्हणून च ते तम्बाखू, ऊस, जूट, ताग, कापूस, हळद इ० पैसे देणारीं पिके काढतात. असें हि जास्त दिवस चालणार नाहीं. कारण दिवसें-दिवस जनसंख्या वाढत आहे. म्हणून जितक्या जमिनींत दुसऱ्या वस्तु पेरल्या जातील, त्या प्रमाणात धान्य कमी मिळेल यामुळें देशाचें नुकसान होईल. जरी साखर खाण्याचा पदार्थ असला तरी हि ती अन्नाची जागा घेऊ शकत नाहीं. दोन तोळे अन्नाऐवजीं दोन तोळे साखर घेऊ शकता.

पण त्यापेक्षा जास्त खाऊ शकणार नाहीं. म्हणून धान्य कमी पडेल इतका ऊस पिकवता कामा नये देशाला कापसाची गरज आहे कारण कापसाशिवाय कापड होणार नाहीं. पण कापूस खूप पिकवाल तर धान्य कमी पडेल आणि कापड पुष्कळ होईल धान्याच्या ऐवजीं कापड, तम्बाकू, ऊस इ० नें हि काम भागणार नाहीं. साराश, जसजशी लोकसंख्या वाढेल तसतसा जमिनीचा उपयोग धान्यासाठीं करावा लागेल. त्या वेळीं पैशासाठीं पिकवल्या जाणाऱ्या वस्तु सोडून द्याव्या लागतील किंवा कमींत कमी पिकवाव्या लागतील.

## ग्रामोद्योगाचा माल महाग विकला जावा

शेतकऱ्याला पैशावर आपले जीवन अवलंबून ठेवता कामा नये त्याचे हातीं दुसरे उद्योगधंदे असावेत. तेल, साखर, जोडे, कापड इ० वस्तु गावातच तयार झाल्या पाहिजेत. शेतकऱ्याचे हातीं काहीं उद्योग असला पाहिजे आणि त्या उद्योग धंद्याचा माल शहरात विकला जावा व तो महाग हि असावा गावातील लोकानीं आपल्या स्वत करता तेल काढलें पाहिजे आणि बाकीचें विकलें पाहिजे. कापड इ० वस्तूचेंहि असें च झालें पाहिजे.

खेड्यातील लोक म्हणतात कीं, खादी महाग आहे पण ती तर विकण्याची वस्तु आहे, विकत घेण्याची नाहीं त्याचा अधिक पैसा मिळाला च पाहिजे ते हा च शेतकऱ्याला काहीं थोडा पैसा मिळेल धान्यात त्याना विशेष पैसा मिळणार नाहीं लोकसंख्या वाढली तर दुसऱ्या गोष्टी न पिकविता जास्तींत जास्त जमीन धान्यासाठीं वापावी लागेल म्हणून तुमच्या वस्तु शहरात विकल्या पाहिजेत, तुम्हीं विकत घेता कामा नये. आपण सर्व लोकानीं खादी वापरली पाहिजे आणि उरलेली खादी शहरात विकली पाहिजे शहरातील लोकानीं हि जास्त किंमत देऊन ती विकत घेतली पाहिजे परतु आज खेड्यातील लोकाच सर्व जीवन पैशावर अवलंबून आहे शेतीच्या शिवाय बाकीचे धंदे नष्ट झाले आहेत

## जमिनीची किंमत होऊं शकत नाहीं

जमीन माता आहे. ती सर्वांच्या पोषणाचें साधन आहे पैशाचे साधन

उद्योग असले पाहिजे आणि त्याचा च उपयोग केला पाहिजे. परंतु आज जमीन च पैशाचें साधन झालें आहे. म्हणून पैसेवाल्यांनीं गरीब लोकांच्या हातून तें काढून घेतलें आहे घरीं लग्न झालें तर शंभर रुपयांचें कर्ज दोनशे रुपये लिहून देऊन घ्यावें लागतें. दिवसेंदिवस रुपये वाढत गेले आणि शेवटीं दोनशे रुपयांचे ऐवजीं पांच एकर जमीन द्यावी लागली. अशा प्रकारें जमिनीची पैशात किंमत होत गेली आणि बिचारा शेतकरी असहाय झाला. वास्तविक जमिनीची किंमत रुपयांत होऊ शकत नाहीं. आपण जर दहा हजार रुपयांच्या नोटा एका खड्डयात ठेवून त्यावर पाणि घातलें तर पीक येईल काय? मातीची किंमत पैशात होऊ च शकत नाहीं. मातींतून खाण्याचे पदार्थ मिळू शकतात, पैसे नव्हे. असें असून हि आज जमीन पैशाचें साधन झालें आहे आणि तें थोड्या लोकांच्या हातांत आलें आहे. याचें कारण पैसे शेतकऱ्यांची हातची गोष्ट नव्हे. पैसा नाशिकच्या छापखान्यात छापतात. शहरांतील लोकांना पैसा तयार करण्यास त्रास होत नाहीं. आपण जमिनीला पैशाचा आधार बनविलें. तेव्हां आपली शेंडी त्यांचे हातांत गेली. जमिनीची मालकी च अशू शकत नाहीं. ती पैशाची गोष्ट नव्हे, प्राणाची वस्तु आहे. त्यावर आपले प्राण अवलंबून आहेत. परंतु आपण तिची पैशात किंमत केली. ह्याचा परिणाम म्हणून गांवाचे उद्योग नष्ट झाले आणि खेड्यांतील लोकांचें शोषण झालें.

शहरांत लुटणारे लोक च अधिक असतात खेड्यांत लुटणारे गरिबांच्या तुलनेनें पैसेवाले च अधिक असतात. परंतु शहरांत तर ते लुटले जातात कारण जमिनींतून ते किती पैसे मिळवणार? शहरांतील लोक एक दुसऱ्याला मारून जगत असतात. यानें समाज कधीं हि सुखी होऊ शकणार नाहीं, समाजात शांति नांदणार नाहीं, हृदयाला समाधान मिळणार नाहीं आणि जीवन पूर्ण होणार नाहीं.

### खेड्यांतील लोक सुखी कसे होतील?

आपणाला सुखी होण्यासाठीं चार पांच गोष्टी कराव्या लागतील. (१) जमीन पैशाचा आधार होता कामा नये. (२) खेड्यांतील लोकांना

पैशाची अधिक गरज असूं नये. ( ३ ) थोड्या पैशाची जरूरी असेल तर त्यासाठीं खेड्यात उद्योग चालवेत आणि या उद्योगातील वस्तू बाहेर विकाव्यात. ( ४ ) त्या उद्योगाच्या वस्तूची किंमत अधिक असावी. ( ५ ) जसें लग्न करण्याचा श्रीमत, गरीब इत्यादि सर्वांना अधिकार आहे, कारण त्याची सर्वांना जरुरी आहे, तशी गावातील सर्व लोकाना जमीन मिळावी. तशी च खेड्यातील प्रत्येक मनुष्याला जमीन मिळाली पाहिजे. म्हणून खेडेगावातील जमीन सर्व लोकात वाटा. जमिनीची किंमत पैशात होऊं शक्त नाहीं.

जर आपण हें ग्रामीण अर्थशास्त्र समजून घेतलें तर आपणास भूदान समजविण्याची गरज नाहीं. आपण गावात जमीन वाटाल, गरिबाना जितकी जमीन पाहिजे तितकी दान द्याल, गावात ग्रामोद्योग उभे कराल, महत्त्वाच्या गोष्टी बाहेरुन खरेदी करणार नाहीं तर स्वतः तयार कराल आणि ज्या वस्तू बाहेर विकाल त्याची किंमत जास्त ठेवाल. ही सर्व व्यवस्था सपद्यक्तीनें केली पाहिजे. वेगवेगळें विकण्यास जाल तर जास्त पैसा मिळणार नाहीं. म्हणून आपणास गावचा एक संघ बनवला पाहिजे. हें च आमचें ग्रामीण अर्थशास्त्र आहे.

सिद्धागिरि ( कोयम्बतूर )
२७-१०-'५६

आज देशात 'निष्कामसेवा' जवळ जवळ नाहीं च. निष्काम सेवा म्हणजे अशी सेवा की जींत आपल्याला लाभाची इच्छा नाहीं. आपल्या पक्षाच्या लाभाची नाहीं आणि जींत प्रतिष्ठेची हि इच्छा नाहीं स्वराज्यप्राप्तीपूर्वी निष्कामसेवेची लोकाना सवय होती. त्या दिवसात काँग्रेस मधले कित्ती तरी लोक स्वराज्याच्या भावनेनें केवळ निष्कामपणें काम करीत होते. रचनात्मक काम करणारे सुद्धा निष्कामबुद्धीनें च गरिबाची सेवा करीत होते.

## स्वराज्यानंतर निष्कामसेवा राहिली नाहीं

स्वराज्यप्राप्तीनतर सारा देश बदलून गेला. लोक अनेक राजनैतिक पक्षात वाटले गेले. काहीं सेवक जे पूर्वी लोकाची सेवा करीत होते ते सरकारी कामात दाखल झाले. स्वराज्य हातीं घेतल्यावर त चालविलें पाहिजे हें हि एक कर्तव्य मानलें गेलें म्हणून योग्यता आणि वजन असणारे लोक सरकारात गेले जे लोक सरकारात गेले ते अनिष्काम होऊ शकत नाहीं असं नाहीं काहीं होऊ शकतात आम्हाला माहीत आहे कीं जनकमहाराज अत्यत निष्काम होते आणि निष्कामकर्मांचे बाबतींत त्याचें उदाहरण भगवद्गीतेंत दिले आहे परतु असे लोक हाताच्या बोटावर मोजले जातील बाकीचे लोकाना तिथें सत्ता च दिसते म्हणून त्याचे हातून निष्कामसेवा होऊ शकत नाहीं.

रचनात्मक कार्य करणारे हि पूर्वी सरकारी मदतीची अपेक्षा करीत नसत. एक प्रकारें त्याचें कार्य सरकारचे विरुद्ध च होतें म्हणून त्याना पुष्कळ त्याग करावा लागे त्याना थोडा पगार हि दिला जात असे तो फार च थोडा दिला जात असे, आणि त्या सर्वांचा भार जनतेवर च होता पण आज परिस्थिति बदलली आहे आज सरकारच्या योजनेंत काहीं रचनात्मक कार्यकर्ते दाखल झाले आहेत त्याना अनेक प्रकारच्या सवलती मिळू

लागल्या आहेत. त्याना त्याग करण्याची तितकीशी जरूरी हि राहिली नाहीं. त्याना जनतेवर अवलंबून राहाण्याची गरज हि राहिली नाहीं. त्याची अशी कल्पना झाली आहे कीं सरकारवर अवलंबून राहून हि काम होऊ शकतें अशा स्थितींत हि निष्कामसेवा करणारे आहेत पण त्याची संख्या फार च कमी, ती तीन चार हाताच्या बोटावर मोजली जाऊ शकेल.

## राजकीय पक्षांतील लोकांची स्थिति

जे लोक राजकीय पक्षात विभागले गेले आहेत त्यातील काहीं लोकानीं अधिकारपदें ग्रहण केलीं आहेत काहीं म्युनिसिपालटी, जिल्हा बोर्ड इ० मधे गेले, तर काहीं कॉंग्रेस संस्थेचे अध्यक्ष, मंत्री इ० झाले. आज कॉंग्रेसच्या अध्यक्ष इ० चे हातात हि पुष्कळ सत्ता आहे कारण आज कॉंग्रेस राज्य करणारी संस्था आहे. अशा वेळीं निष्कामसेवक कोण असणार? जगात काहीं असतील हि ईश्वराचे भक्त कोठे ना कोठे असतात च तसे च ते तेथे हि असतील जे लोक दुसऱ्या राजकीय पक्षात आहेत त्याचे हातीं सत्ता नाहीं पण त्याना सत्तेचा हाव आहे आणि त्याचे सारें लक्ष कॉंग्रेसच्या या सरकारच्या कामातील उणीवा काढण्यात असते अशा प्रकारें दुसऱ्याच्या चुका काढणारा आपलें मन शुद्ध राखू शकत नाहीं. जेथें चित्तशुद्धीचा अभाव आहे तेथे निष्काम सेवा कशी होइल? तरी हि त्यात थोडे निष्काम लोक असतील

## सेवेचा सौदा

स्वराज्यप्राप्तीनंतर जी सेवा चालू आहे त्याचा हिशोब आम्हीं असा केला आहे आज हि 'रामकृष्ण मिशन' सारख्या काहीं संस्था काम करीत आहेत त्या पूर्वी हि काम करीत होत्या त्यात काहीं निष्काम सेवक अवश्य असतील. निष्कामसेवाच खरी सेवा आहे बाकीची सेवा म्हणजे एक प्रकारचा सौदा च आहे एखाद्यानें तुरुगात काहीं वर्षे घालविलीं तर तो म्हणतो कीं मग हि काहीं तरी मिळाले पाहिजे एखाद्यानें भूदानात काहीं त्याग केला तर तो हि म्हणतो कीं मला काही तरी मिळाले पाहिजे. आता च कॉंग्रेसनें जाहीर केलें आहे कीं, ज्यानीं काहीं काम केलें

आहे त्यानीं आपल्या कामाचा हिशोब द्यावा. त्यानुसार त्याला काहीं तरी पदाधिकार मिळेल. काहीं लोक आपल्या कामाचा रिपोर्ट देतील कीं, आम्हीं इतके दिवस काम केले म्हणून आमची निवड व्हावी. त्याना अशी अपेक्षा ठेवण्याचा अधिकार हि आहे. पण त्यात निष्कामता कोठें राहिली ? ती शुद्ध सेवा नाहीं, तर तो सौदा झाला.

## राजसत्तेकडून धर्मप्रचार संभवनीय नाहीं

आता दुसरा हिशोब आज जनशक्तिवरील श्रद्धा व जनसेवेवरील विश्वास कमी दिसून येतो. राजकीय पक्षात काम करणारे लोक मानतात कीं सत्तेने च काम होईल त्याचा सरकारच्या शक्तीवर जो विश्वास आहे तो जनशक्तीवर नाहीं ते थोडी जनसेवा करतील ती सरकारमार्फत लोकाना मदत पोंचविण्यासारखी च असेल लोक हि त्याना विचारतील आपण आमचे प्रतिनिधी झालात तर आमचेसाठीं काय केलें ? म्हणून लोकाना आपल्या स्वत च्या शक्तीवर विश्वास नाहीं आणि राजकीय पक्षात काम करणाऱ्याचा जनशक्तीवर विश्वास नाहीं अशा परिस्थितींत स्वतत्र जनसेवेची काहीं च किंमत राहिली नाहीं तरी हि ते लोक सेवा करतील कारण त्याच्यामुळे च ते सत्ता आपल्या ताब्यात ठेवू शकतील ते विचार करतात कीं आम्हीं सेवा केली तर च लोक आम्हाला निवडतील आणि तर च आमचे हातीं सत्ता येईल म्हणून ती सेवा सत्तेची दासी आहे

लोक जीवनात सुधारणा, परिवर्तन, लोकात क्राति इ० कामें सरकारी शक्तीनें कधीं होऊ शकणार नाहींत जर सरकारी शक्तीनें जनक्राति होण्याची शक्यता असती तर भगवान् बुद्धाचे हातीं जें राज्य होत तें त्यानीं का सोडलें असतें ? आज लोक भगवान् बुद्धाचें नव्हे तर अशोकाचें उदाहरण देतात ते सागतात कीं, अशोकाचें हृदयपरिवर्तन झालें आणि त्यानें धर्मप्रचार केला तर मग राज्यशक्तीनें च धर्मप्रचार झाला ना ? मी सागतों कीं, त्या लोकाना इतिहासाचें थोडें सुद्धा ज्ञान नाहीं. जेव्हा-पासून बौद्ध धर्माला सरकारी शक्तीचा पाठिंबा मिळाला तेव्हापासून बौद्ध धर्म हिंदुस्थानातून नष्ट होण्यास सुरुवात झाली जेव्हा ख्रिश्चन धर्माला कॉन्स्टेन्टाईनच्या नतर राजसत्तेचे अधिकार मिळाले तेव्हा ख्रिश्चन धर्म

सत्ता गाजविणें धर्मविचार नाहीं. सर्वांची सेवा करणें व प्रेमानें समजाविणें हा च धर्मविचार आहे. लाखों लोक एकदम धर्मनिष्ठ व्हावे ही काय धर्म-निष्ठा झाली ?

## राजसत्ता आणि समाजक्रांति

जो धर्म जगात आणि विचारात क्रांति करणारा आहे तो राजसत्तेच्या आधारानें पसरू शकत नाहीं. म्हणून भगवान् बुद्धाना राज्य सोडावें लागलें. अशी जुनीं उदाहरणें आहेत. परंतु हल्लींचें उदाहरण घ्या. नवबाबू (ओरिसाचे भूतपूर्व मुख्यमंत्रि श्री. नवकृष्ण चौधरी) यांनीं राजसत्तेच्या आधारानें सेवा करण्याचा पुष्कळ च प्रयत्न केला. शेवटीं गेलीं दोन वर्षें ते त्यापासून सोडवणूक करून घेण्यासाठी धडपडत होते. पण त्यांची सुटका होत नव्हती. आता त्यांची सुटका झाली आहे. हें एक ल्हानसें उदाहरण आहे. आणि भगवान् बुद्धाचें मोठें उदाहरण पण दोघांचें तात्पर्य एक च आहे. दोघांचे हातीं राजसत्ता होती. पण त्यांनीं पाहिलें कीं समाज आज ज्या स्थितींत आहे, ती च स्थिति कायम ठेवून जर थोडीशी च सेवा करावयाची असेल तर ती सरकारचे द्वारा होऊ शकेल, त्यानें समाज थोडासा पुढें जाऊ शकेल. पण ता चाल मुंगीसारखी राहील. जर राज्यकर्ते चांगले असतील तर समाज प्रगति करील. पण सर्व च राज्यकर्ते चांगले नसतात. म्हणून सत्तेच्या द्वारा समाजरचनेंत क्रांतिकारक बदल होऊ शकत नाहीं. लोकांत जाऊन त्यांच्या मनशुद्धीचा कार्यक्रम केल्याशिवाय जन समाजाची प्रगति होणार नाही

## कोणा राजाच्या आज्ञेनें काम होणार नाहीं

हिंदुस्थानचा सारा इतिहास पाहता असें दिसून येईल कीं, हिंदुस्थाना-तील समाजाची जेव्हा जेव्हा प्रगति झाली तेव्हा ती सत्पुरुषांचे द्वारें च झाली. बुद्ध आणि महावीराचा जो प्रभाव भारतावर दिसतो तो त्या काळच्या कोणत्या हि राजाचा नाहीं. कबीर आणि तुलसीदासाचा जो प्रभाव आज उत्तरेकडे आहे तो उत्तरेकडील कोणत्या हि राजाचा नाहीं. चैतन्य महाप्रभु, रामकृष्ण परमहंस आणि रवींद्रनाथ यांचा जो प्रभाव

आज बंगालवर आहे तो बंगालच्या कोणा हि राजाचा नाही. शंकराचार्य, रामानुज, माणिक्यवाचकर आणि नम्मालवार यांचा तामिलनाडवर आजपर्यंत जो प्रभाव आहे, तो कोणत्या हि पाड्य, पल्लव व चोल राजाचा नाही. येथे सर्व लोक भस्म लावतात तें काय एखाद्या चोल वा पाड्य राजाच्या आज्ञेनें लावतात? कोणाच्या नावासाठीं आपल्या जीवनाचा मोठा त्याग लोक करतात? विवाहासारखी उत्तम संस्था कोणीं निर्माण केली? त्यात कोणता कायदा आहे? माता मुलाचा साभाळ करते तो कोणत्या राजाच्या अथवा सरकारच्या हुकुमानें? असख्य यात्रा चालतात त्या कोणत्या राजाच्या आज्ञेनें? मरणानंतर स्मशान-विधि आणि श्राद्ध-विधि इ० होतात ते कोणाच्या आज्ञेनें? येथें जें 'तिरुकुल' वाचलें जातें, 'तिरुवाचकम्'चें पठन होते, तें काय युनिव्हर्सिटीच्या आज्ञेनें होतें कीं कोणत्या म्युनिसिपालिटीच्या का डिस्ट्रिक्ट बोर्डाच्या आज्ञेने? ही गोष्ट खरी आहे कीं, आज त्या मूर्खांचे हातात अशी शक्ति आहे कीं ते कोणतें हि पुस्तक सर्व मुलाकडून अभ्यासून घेण्याची इच्छा असली तर घेऊ शकतात. परंतु अशीं पुस्तकें मुलें शाळेंत वाचतात आणि शाळा सपता च फेंकून देतात व सर्व आयुष्यभर तें पुस्तक उघडत नाहींत. परतु लोक 'तिरुकुल' आणि 'तिरुवाचकम्' खिशात ठेवतात आणि वारवार वाचतात. आज लोकांची जी विवेकबुद्धि आहे ती कोणीं बनविली? आज इतकें दान दिलें जातें तें कोणाच्या आज्ञेनें? इतकें तप, उपवास, एकादशी, रोजा इ० केलीं जातात तीं कोणाच्या आज्ञेनें केलीं जातात? हिंदुस्थानात पुष्कळसे लोक स्नान केल्याशिवाय दुपारचें भोजन करीत नाहींत ते कोणाच्या आज्ञेने तसे करतात?

## सिकंदर आणि डाकू

तुम्ही असें समजता का कीं, पिनलकोडात चोरीला शिक्षा आहे म्हणून सारे लोक चोरी करीत नाहींत? समजा कीं, उद्या पोलीस, कोर्ट, तुरुंग इ० काहीं नसेल तर यात्रा भूदानाचें कार्य सोडून चोरी करणे सुरू करील? चोरीला शिक्षा नसेल तर तुमच्यापैकीं किती लोक चोरी करू लागतील?

चोरी करता कामा नये अशी जी आमची विवेकबुद्धि झाली आहे ती काय एखाद्या राजानें बनविली ? राजे काय बनविणार ? ते स्वतः च चोर होते. ते डाकू, लुटारू व लोकांवर सत्ता चालविणारे होते ते लोकांच्या हृदयावर सत्ता चालवू शकत होते का ? त्याचे उदाहरणानें कोण चोरी सोडील ?

सिकंदर बादशहाची गोष्ट आहे. एका डाकूला पकडून त्याच्या समोर आणण्यात आलें. सिकंदरानें डाकूला विचारलें कीं, 'तूं काय करतोस ?' डाकू म्हणाला, 'तूं जें करतोस तें च मी करतों.' यावर सिकंदर म्हणाला, 'तुझी आणि माझी कशी बरोबरी ? मी तर बादशहा आहे.' डाकू म्हणाला, 'तूं जें काम करतोस तें च मी करतों. परतु तूं यशस्वी झालास आणि मी यशस्वी झालों नाहीं एवढा च फरक.' पण तू यशस्वी चोर आहेस म्हणून लोकांचे डोक्यावर नाचतोस आणि मी अयशस्वी आहे म्हणून तुझ्यासमोर उभा आहे. तरी हि तूं हें नीट समज कीं, तुझी माझी योग्यता समान आहे.' हे ऐकून सिकंदर गप्प राहिला. येथें ईस्ट इंडिया कंपनीचें राज्य चाललें. त्यात क्लाइव, वॉरन हेस्टिंगज् इ० काय महापुरुष होते ? त्या च वेळीं विरुद्ध इंग्लंडमध्यें त्याच्यावर खटला चालू होता. त्यात बर्कने त्या खटल्यांत ( Impeachment ) जे व्याख्यान दिले तें आम्हीं वाचलें तर कळून येतें कीं, हेस्टिंगज् वगैरे किती बदमाश होते. परंतु हिंदुस्थानवर त्याची सत्ता चालली आणि ते राज्यकर्ते झाले !

## जनशक्तीनें च स्वराज्य

इंग्रजाच्या हातून आमचे हातीं स्वराज्य आलें आणि आम्ही राज्यकर्ते झालों. शास्त्रात लिहिलें आहे कीं, "राज्यान्ते नरकप्राप्तिः" राज्य संपल्यावर नरकप्राप्ति होते. म्हणजे राज्य करणारा राजा मरण पावल्यावर त्याला नरक मिळतो लोक विचारतील कीं, मग स्वराज्य चालवू नये का ! मी म्हणतों कीं, स्वराज्य जरूर चालवावें, पण राज्य नव्हे. वेदातील ऋषि म्हणतात कीं, '**यतेमहि स्वराज्ये**' आम्ही स्वराज्याकरितां प्रयत्न करूं. शास्त्रात हि हें लिहिलें आहे कीं, '*नत्वहं कामये राज्यम् ।*' मी राज्य नव्हे

तर स्वराज्याची इच्छा करितों. दिल्लीहून जें चालतें त्याला राज्य म्हणतात. मग तें आपल्या लोकांचें असो. चेन्नै ( मद्रास )हून जें चालतें त्याला राज्य म्हणतात. गावोगावीं प्रत्येक मनुष्य जें आपणांवर चालवितो तें स्वराज्य आहे. मला उपाशी रहावें लागलें तरी चालेल पण मी चोरी करणार नाहीं याचें नाव ' स्वराज्य. ' माझ्यावर दुसऱ्या कोणाचा अधिकार चालत असेल तर तें काय स्वराज्य आहे? ' स्वराज्य ' याचा अर्थ आहे कीं आपल्या स्वतःचें आपल्या स्वत:वर चालणारें राज्य. अशा रीतीनें जेव्हां सर्व लोकांत आपणा स्वतःवर ताबा ठेवण्याची शक्ति निर्माण होईल व त्याना आपल्या कर्तव्याचें भान राहील तेव्हा च ' स्वराज्य ' येईल. तोंपर्यंत ' राज्य ' च चालू राहील. मग ते हिंदीवाल्याचें राज्य असो वा तामीळवाल्याचें असो. आम्हाला ' स्वराज्या 'चें काम करावयाचें आहे. त्यासाठीं जनशक्ति निर्माण करावयाची आहे. हृदयात आत्मशक्ति निर्माण करावयाची आहे. आमच्या गावाचा कारभार आम्ही च चालवूं शकतों. कोणती हि बाहेरची सत्ता आम्हांला अडवू शकत नाहीं अशी शक्ति निर्माण झाली पाहिजे.

## बाबाला स्वराज्य मिळालें

मी स्वतःवर स्वतःची सत्ता चालवू शकतों. बाबानें निश्चय केला आहे कीं, तो पायीं फिरेल. रोज कितीतरी गाड्या जातात आणि बाबाला त्यांचें दर्शन घडतें. बाबाचा कोणी मित्र कलकत्त्यांत आहे. आगगाडींत बसविलें तर दोन दिवसात च त्याला भेटावयाला जाता येईल. पण कोणती हि गाडी बाबाला आपल्यामधें बसवू शकत नाहीं. बाबाचा आपल्या विचारावर ताबा आहे. तो समजतो कीं, तो जो संकल्प करील त्याच्या विरुद्ध जगांतील कोणती च ताकत काम करूं शकणार नाहीं. तरी हि बाबा दुसऱ्यावर वजन आणण्याचें काम करणार नाहीं; तो आपल्यावर च वजन आणण्याचें काम करील. बाबा आपल्यासाठीं निश्चय करील आणि पाहील कीं तो निश्चय मोडूं शकणारी शक्ति जगात आहे का?

एक काळ असा होता कीं जेव्हा बाबाचा स्वतःवर ताबा नव्हता. आपल्या स्वतःवर ताबा ठेवण्यासाठीं त्याला प्रयत्न करावा लागला. त्या

वेळीं त्याची स्वत:वर सत्ता नव्हती, त्या वेळीं दुसऱ्याची सत्ता त्याचेवर चालत असे, पण जेव्हापासून त्याची स्वत:वर सत्ता चालू झाली तेव्हा पासून त्याला स्वराज्य मिळालें.

### स्वराज्याचीं दोन लक्षणें

जगातील दुसरी कोणती हि सत्ता आपल्यावर चालूं न देणें हे स्वराज्याचें पहिलें लक्षण आहे. दुसऱ्या कोणावर आपली सत्ता न चालविणे स्वराज्याचें दुसरें लक्षण आहे. माझ्यावर कोणाची सत्ता चालणार नाहीं आणि मी कोणावर सत्ता चालवणार नाहीं या दोन्ही गोष्टी मिळून स्वराज्य होतें. हे सर्व काम सरकारी शक्तीनें नव्हे तर लोकमतपरिवर्तन होण्यानें च होईल. यासाठीं हृदयशुद्धीची जरूरी आहे. हृदयशुद्धि करण्याचा कार्यक्रम जनतेंत जाऊन करावा लागेल. त्याच्यासाठीं यज्ञ, दान, तप इ० सर्व आहे.

मलयकोटाई (कोइमतूर).
२९-१०-'५६

## करुणेच्या समुद्राचें दर्शन

: २४ :

आता च आपण भजनात ऐकलें कीं 'परमेश्वर करुणासागर आहे. परमेश्वराला कोणीं पाहिलें आणि कसें माहीत झालें कीं तो करुणा-सागर आहे? त्याला कोणीं हि आपल्या डोळ्यानीं पाहिलें नाहीं. एखाद्याला डोळ्यानीं चतुर्भुज विष्णूचें दर्शन होतें तर एखाद्याला शिव शंकराच्या मूर्तीचें. तेव्हा तो आपल्या भावनेनें जाणतो कीं, कुठें तरी परमेश्वर आहे. परंतु ईश्वराचें रूप कोणीं पाहिलें आहे असें मी म्हणत नाहीं. तें आपल्या भावनेचें रूप आहे. भावनेला च आम्हीं ईश्वर मानलें तर तें त्याच्या दृष्टीनें ईश्वर-दर्शन आहे, पण चर्मचक्षूनें ईश्वराचें दर्शन कोणाला हि होत नाहीं. मग कसें ओळखता कीं ईश्वर करुणासागर आहे? पाण्यानें भरलेला समुद्र सर्वांनीं पाहिला आहे पण करुणेनें भरलेला ईश्वर

कोणीं पाहिला आहे? पाण्यानें भरलेला समुद्र हि थोडीं च लोकांनीं पाहिला आहे, सर्वांनीं नव्हे तरी हि सर्वांनीं पाणी पाहिलें च आहे. जगात असा कोणी हि मनुष्य नसेल की ज्यानं पाणी पाहिलं नसेल पण पाण्याचा समुद्र पाहिला नाहीं असे लाखों लोक असतील. मारवाडातील लोक कोठ समुद्र पाहणार? हिमालयाच्या जंगलात रहाणाऱ्याना समुद्र कसा माहीत असणार? लाखों कोट्यवधि लोक असे असतील कीं ज्यानीं समुद्र पाहिला नाहीं पण ज्यानीं पाणी पाहिलें नाहीं अशी एक हि व्यक्ति नसेल — मुलानीं हि पाणी पाहिलें असेल.

## करुणा आणि करुणा समुद्र

भजनात आम्हीं ऐकलं कीं ईश्वर करुणा सागर आहे. ज्यानीं करुणेचा समुद्र पाहिला असेल पण तो डोळ्यानीं नव्हे तर अन्तरेनें पाहिला असेल. कोणी परमेश्वराला आपल्या बुद्धीनें करुणा समुद्राच्या रूपात पाहिलें असेल. सर्व लोक करुणेच्या समुद्राला नाहीं तर करुणा पहातात करुणा कोणीं पाहिली नाहीं? ज्यानीं पाणी पाहिलें नाहीं त्यानें हि करुणा पाहिली आहे. मुलाचा जन्म होता च मातेनें त्याला आपल्या स्तनातील दूध पाजलें. मुलानें त्या वळपर्यंत पाणी पाहिलें नाहीं, पण करुणेचा आस्वाद घेतला. जेव्हा आईनें त्याला स्तनातील दूध पाजलें त्या बरोबर च त्याला करुणेचें ज्ञान झालें म्हणून ज्यानें करुणा पाहिली नाहीं असा कोणी हि जगात नाहीं

## जीवनात करुणेचें दर्शन

काहीं लोकानीं करुणेच्या समुद्राचें आपल्या बुद्धीनें दर्शन घेतलें असेल पण करुणेचें दर्शन बालकानें हि घेतलें आहे बालकानें मातेची करुणा पाहिली म्हणून तामिळमधें मातेला 'कणकण्ड देवयम्' (प्रत्यक्ष भगवान्) म्हणतात. तरी त्याला करुणेचा समुद्र दिसत नाहीं मुलाला मातेच्या करुणेची नदी पुष्कळ च मिळते समुद्र मोठी गोष्ट आहे, परंतु नदी हि काहीं फार लहान गोष्ट नाहीं मुलाला करुणेच्या नदीचें दर्शन मातेमधे

झालें. त्यानें ओळखिलें की येथे परमेश्वराचा एक अंश आहे. कारण माते-मधें ईश्वराची करुणा दिसून येते.

थोड्या च दिवसात मुलाला पित्याच्या करुणेचा अनुभव येतो. तो जाणतो कीं येथे हि परमेश्वराचें काहीं रूप आहे. नतर थोडे दिवसानीं तो शाळेंत जातो तेथे त्याला गुरुजींच्या करुणेचे दर्शन होतें. हातात छडी घेणारे गुरुजी असतील तर ते दर्शन घडणार नाहीं. पण ज्ञान देणारे गुरुजी भेटले तर करुणेचें दर्शन अवश्य घडेल. नतर तो जगात काम करू लागेल. अनेक प्रकारचीं सकटें आलीं आणि मित्रानीं मदत केली तर मित्रात करुणेचें दर्शन होईल. एक दिवस तो नदींत स्नान करीत असता बुडू लागला. रस्त्यानें एक प्रवासी जात होता. ओळख नव्हती. त्यानें पाहिलें, एक व्यक्ति पाण्यात बुडत आहे. त्याला चागले पोहता येत होतें. त्याने पाण्यात उडी टाकली आणि त्याला बाहेर काढलें. काहीं हि ओळख नसताना नदींत उडी टाकून आपल्याला वाचविणाऱ्या त्याला करुणेचें दर्शन घडलें. नतर त्याच्या हृदयात अशी भावना निर्माण झाली कीं जगात किती तरी लोकानीं मजवर करुणेचा वर्षाव केला आहे. आता मी हि थोडी करुणा करीन. नतर तो गरिबाना मदत, आजाऱ्याची सेवा शुश्रूषा आणि दुःखिताना साहाय्य करू लागला. अज्ञानी मनुष्याला ज्ञान देऊ लागला. यामुळे त्याला आपल्या स्वतात च करुणेचें दर्शन होऊ लागलें. अशा प्रकारे सर्वप्रथम मातेंत आणि शेवटीं आपल्यात त्याला करुणेचें दर्शन घडलें.

### वृक्षांत आणि मृत्यूंत करुणेचें दर्शन

जेव्हा त्याला आपल्या हृदयात च करुणेचें दर्शन घडू लागलें तेव्हा तो सर्व जगाकडे करुणेच्या दृष्टीनें पाहू लागला. ज्या प्रमाणें मुगी मातीच्या कणातून फिरते व जेव्हा साखरेचा कण पहाते तेव्हा ती तो लगे च उचलते. ती खाण्याच्या वस्तूचा हि सग्रह करते. तसे च या मनुष्यानें जगात जेथें जेथें करुणा पाहिली तेथून त्याने करुणा घेणें सुरु केलें. नतर त्याला कुत्रें, गाय, घोडा इत्यादींत करुणा दिसू लागली. एक दिवस पाहिलें कीं, एक

प्रवासी रस्त्यानें जात आहे. त्याला भूक लागली होती. इतक्यात रस्त्यात एक आंब्याचें झाड लागलें. तो त्याखालून जात होता. इतक्यात एक चांगला आंबा खालीं पडला. त्यानें तो उचलला व खाल्ला. तेव्हां त्याला एकदम ज्ञान झालें कीं वृक्षात हि करुणा भरलेली आहे. ते उत्तमोत्तम फळे तयार करतात पण स्वतः कधीं खात नाहींत. लोक मोठ्या प्रेमानें आंब्याचीं फळे खातात. वृक्षात किती करुणा भरलेली आहे अशा रीतीनें त्याला वृक्षात हि करुणेचें दर्शन घडतें.

एकदा एक मनुष्य पुष्कळ आजारी होता. त्याचें पोट अतिशय दुखत होतें. डॉक्टरानीं पुष्कळ उपचार केले परंतु त्याचा काहीं चांगला उपयोग झाला नाहीं. तो बिचारा दुःखानें रोज ओरडे. आसपासचे लोक ऐकत आणि त्याला मदत करण्याचा प्रयत्न करीत. पण काहीं उपयोग झाला नाहीं. एक दिवस सूर्य उगवत असता त्या रोग्याचे डोळे बंद झाले आणि त्याचें ओरडणें थांबलें. एकानें विचारलें, 'अरे, झाला काय झालें?' लोक म्हणाले, 'तो मेला.' त्या वेळीं त्याला मृत्यूमध्यें हि करुणेचें दर्शन घडलें. किती करुणामय मृत्यु आहे. बिचारा किती ओरडत होता. डॉक्टर, मित्र काहीं करू शकत नव्हते. नातेवाईक हि त्याला दुःखातून सोडवू शकत नव्हते. त्याला करुणामय मृत्यूनें सोडविलें.

सारांश, त्याला करुणेचें दर्शन थाईत घडता घडता हृदयात झालें. आणि नंतर त्यानें जेथें जेथें पाहिलें तेथें करुणेचें च दर्शन झालें. शेवटीं करुणेचें दर्शन त्याला मृत्यूत हि झालें. तो इकडे तिकडे असणारी सर्वच्या सर्व करुणा एकत्र करूं लागला व एक दिवस करुणेचा फार मोठा समुद्र तयार झाला. त्याला च तामीळ भाषेंत 'करुणैकडल' (करुणेचा समुद्र) म्हणतात. तो च परमेश्वर आहे. त्या च करुणेचा एक अंश मातेमध्यें आहे, एक अंश पित्यात आहे, एक अंश गुरूमध्यें आहे, एक अंश मित्रात, एक अंश भावात, एक मनुष्यात, एक प्राण्यात, एक वृक्षात आणि एक मोठा अंश मृत्यूत आहे. अशा तऱ्हेनें त्याला सर्वत्र करुणेचें दर्शन घडलें. आतां म्हटलें जाईल कीं त्याला परमेश्वराचें दर्शन झालें. त्यानें करुणेचा समुद्र पाहिला कारण त्याचें स्वतःचे जीवन करुणेनें च

भरलें होतें असें बोललें जातें कीं, परमेश्वराचा करुणेचा समुद्र आहे. पण तो पहाण्याची एक कला आहे. ती कला मीं आपणापुढें उघड केली.

## भूदानांत करुणा समुद्राचें दर्शन

साडेपाच वर्षें मी भूदानाच्या कार्यांत फिरत आहे. मी म्हणू शकतों कीं मला करुणा समुद्राचें दर्शन झालें. पाच लाख लोकांनीं चाळीस लाख एकर जमिनीचें दान दिलें आहे. त्यात अनेक गरीब लोकांचें दान आहे. मोठ्या लोकांचे हि दान आहे. दान कसें मागतात? दान मागणाऱ्याजवळ कोणती सत्ता, काय शक्ति आहे? फक्त प्रेमानें च तो समजावितो परमेश्वरानें आम्हाला ज्या गोष्टी दिल्या आहेत त्याचें सेवन दुसऱ्याला दिल्याशिवाय आम्हीं करू नये ज्या गोष्टी आमचेजवळ आहेत त्याचा दुसऱ्याना उपभोग दिल्यानंतर च आम्हीं उपभोग घ्यावा. आपल्याजवळ जमीन असेल तर जमिनीचा हिस्सा, संपत्ति असेल तर संपत्तीचा, बुद्धि असेल तर तिचा, शरीरात शक्ति असेल तर शक्तीचा हिस्सा दुसऱ्याला प्रेमानं दिला पाहिजे हे च समजावून सांगून आम्ही जमीन मागतों. याचे शिवाय आमचेजवळ दंडशक्ति नाहीं व सरकारी शक्ति हि नाहीं. फक्त प्रेम आणि विचार समजाविण्याची गोष्ट आहे ती समजून च इतक्या लाखों लोकांनीं दान दिलें आहे आपल्या हृदयाचे तुकडे च त्यांनीं दिले. ह्यात मला करुणा समुद्राचें दर्शन झालें.

## असुरावर विजय प्राप्त करूं

लोक मला विचारतात कीं बाबा किती दिवसपर्यंत फिरत रहाणार? मी त्याना सांगतो कीं, मी फिरत नाहीं. ही माझी यात्रा चालू आहे. परमेश्वर दर्शनासाठीं यात्रा असते मी करुणारूपी परमेश्वराच्या दर्शनासाठीं फिरत आहें मला जागोजागीं त्याचे दर्शन होत आहे माझी यात्रा यशस्वी आहे. एखाद्या दिवशीं पन्नास लोकांनीं दान दिलं किंवा एखाद्या दिवशीं एकानेंच दिलें परंतु जेथें प्रेमानें दिलें जातें तेथें परमेश्वराचें दर्शन होतें माझी इच्छा आहे कीं या करुणेचा जो अंश प्रत्येकाच्या हृदयात आहे तो प्रकट व्हावा ती करुणा मर्यादित राहू नये मुलाना

सर्वप्रथम मातेंत करुणेचें दर्शन घडतें. पण अशा हि माता दिसतात कीं ज्या आपल्या मुलासाठीं करुणामय आहेत, परंतु शेजाऱ्याच्या मुलाशीं निष्ठुर वागतात त्याच्या हृदयात करुणेचा अंश आहे आणि निष्ठुरतेचा हि अंश आहे. देव हि आहे आणि असुर हि आहे. हा देवासुराचा संग्राम प्रत्येकाच्या हृदयात चालतो. प्रत्येकाच्या हृदयात काहीं देव असतात व काहीं असुर. असुराना ठेचून घालवून देवाना विजयी करावयाचें आहे.

## ईश्वराचें रूप आणि चिन्ह

मला आशा आहे कीं, या गावात हि करुणेचें दर्शन होईल. जेव्हा हृदय करुणेनें भरेल तेव्हा ईश्वराचें दर्शन होईल. काहीं लोक दगडाच्या मूर्ति करतात आणि त्याला च परमेश्वर समजतात. पण तें ध्यानासाठीं एक चिन्ह तयार केलें आहे. जसें ईश्वराच्या ध्यानासाठीं 'स्वस्तिक' किंवा 'ॐ' करतात आणि म्हणतात कीं 'ॐ' या मूर्तीमध्यें 'उ' हा परमेश्वराचा चेहरा आणि बाकी सोंड आहे. तें करुणा, ज्ञान आणि प्रेमानें परिपूर्ण आहे. तसें च संकटात लोकाना मदत करतें. अशा प्रकारें परमेश्वराचें ध्यानचिंतन करण्याकरिता त्यानीं एक चिन्ह बनविलें. तरी हि तें ईश्वराचें खरें रूप नाहीं. तुम्हाला आंब्याचें चित्र दाखविलें गेलें तर तो आंबा आहे का? समजा कीं, एक शेणाचा आंबा तयार केला आणि त्यावर रंग चढविला तर आपण तो खाल काय? आणि त्याने आपली तृप्ति होईल काय? तो आंबा नाहीं तर आंब्याचें रूप आहे हे स्पष्ट आहे. खाल्यावर च आंबा कळतो अशा च तऱ्हेनें दगडाची मूर्ति ईश्वराचें चिन्ह आहे. ती आम्हीं च बनविली परंतु आंबा आम्हीं बनविला नाहीं, ईश्वरानें निर्माण केला. शेणाचा आंबा आणि हा दगडाचा ईश्वर आम्हीं बनविला तें ईश्वराचें रूप नाहीं, चिन्ह होय. जसा खरा आंबा वेगळा च असतो तसा च खरा ईश्वर म्हणजे करुणा आहे. करुणा आणि प्रेम हें परमेश्वराचें रूप आहे.

येथें 'अन्वे शिवम्' प्रेम च ईश्वर आहे असें सांगितलें आहे. शंकराची ही एक खूण आहे कीं त्याच्या मस्तकावर गंगा आहे. म्हणजे हृदयात शांति असली पाहिजे शांतीशिवाय मस्तकात आग लागली तर करुणेच्या ऐवजीं क्रोध प्रकट होईल. म्हणून अतिशय थंड अशी गंगा शंकरानीं

मस्तकावर ठेविली आहे आणि गळ्यांत साप ठेवले आहेत. ही किती मोठी करुणा आहे. तो चावणारा साप राहिला नसेल तर फुलांचा हार झाला असेल. त्यांनीं ते धारण केलें तें करुणेचें रूप समोर उभें करण्याचें एक चिन्ह झालें. परंतु ह्या चिन्हाला च ईश्वर समजून करुणेला ओळखलें नाहीं तर काय म्हणावे? म्हणून परमेश्वराचें रूप करुणा आहे. ह्यासाठीं मुळांत परमेश्वराचे रूप करुणा समजून दिवसेंदिवस आम्ही आपली करुणा वाढवूं लागलों तर ती च खरी साधना होय.

मीं तुम्हाला ही गोष्ट समजाविली. जर तुम्हांला ही गोष्ट पटली तर पुढें करुणा च आपल्याकडून काम करवून घेईल. येथून मी तुमच्या स्थूल रूपाची शेवटची स्मृति घेऊन जाईन. परंतु तुमच्या करुणेच्या रूपाचें निरंतर दर्शन करीन. परमेश्वर माझ्या हृदयात करुणा राखील तर माझें रूप हि परमेश्वर तुमच्यासमोर अवश्य ठेवील. मी आशा करतों कीं करुणामय परमेश्वराच्या कृपेनें तुम्ही आम्ही करुणामय बनून जाऊं.

चिन्नमन्नूर (कोयम्बतूर)
३०-१०-'५६

जगात अनेक प्रकारचे लोक असतात — काही चांगले, काही साधारण आणि काही थोडे वाईट हि असतात. जे वाईट असतात ते कायमचे वाईट नसतात. ते सुधारू शकतात. जे चांगले असतात ते नेहमी चांगले च असतात. चांगल्यातून कोणी वाईट होणार नाहीं. पण जे वाईट आहेत त्यातून च चांगले होणार आहेत. कारण चांगुलपणात च शक्ति असते. वाईटपणात नाहीं.

### चांगल्याचा वाईटावर हल्ला

आपण एखाद्या सज्जनाचें व्याख्यान ऐकलें. तो आपल्याला चांगल्याचा उपदेश करतो. त्याचा काहीं ना काहीं परिणाम आपल्यावर होतो च. पण जर कोणी वाईटावर व्याख्यान देईल तर लोकावर त्याचा परिणाम होणार नाहीं. चोर चोरी करील आणि दोन चार मित्र हि एकत्र करील. परंतु तो लोकाना समजावू शकत नाहीं कीं चोरी करणें कर्तव्य आहे व सर्वांनीं तें काम केलें पाहिजे. तो जें काहीं करील तें लपून करील, अंधारात करील, प्रकाशात नाहीं. चांगल्या गोष्टी प्रकाशात प्रकट केल्या जातात. आणि लोक त्या ग्रहण करतात. अंधकाराचा प्रकाशावर हल्ला होऊ शकत नाहीं तर प्रकाशाचा हल्ला अंधकारावर होतो. अशा च तऱ्हेनें वाईटाचा हल्ला चांगल्यावर होऊ शकत नाहीं. तो जर होत असेल तर लपून च. नेहमीं चांगल्याचा हल्ला वाईटावर होत आला आहे.

### सज्जनांचें कर्तव्य

जर लोकाना हा विचार समजेल तर ते हि निराश होणार नाहींत. लोक विचारतात कीं जर चांगलेपणा बलवान होतो आणि वाईटाची शक्ति टिकत नाहीं, तर जगात वाईटाची च पुष्कळ चलती दिसते, याच कारण काय? तें वाईट लोकातून च येतें. म्हणून परिस्थितींत बदल घडवावा लागेल. हा सर्व प्रयत्न चांगल्या लोकाना करावा लागेल. भल्या लोकाना

तिहेरी प्रयत्न करावा लागेल. पहिल्यानें त्यानें आपल्या चित्ताचें निरीक्षण करून स्वत:ची भलाई वाढवावी. त्याना असे वाटू नये कीं आम्ही भले आहो च. आमच्यात कोणती वाईट गोष्ट आहे? प्रत्येकात कोणते ना कोणते तरी अवगुण लपलेले असतात. ते शोधून नष्ट केले पाहिजेत. व्यक्तिगत आत्मशुद्धीचें हें कार्य लोकांनीं सतत केलें पाहिजे. दुसरी गोष्ट अशी की सर्व भल्या लोकांना एकत्र करावे. आज भले लोक एकेकटे काम करीत आहेत. आपला आपला विचार करतात आणि दुसऱ्या भल्या सज्जनाशीं सहकार्य करीत नाहींत. त्याच्यात थोडासा विचार-भेद हि असतो आणि त्याला च महत्त्व देऊन ते वेगवेगळे कार्य करितात. म्हणून त्याची शक्ति एकत्र होत नाहीं. त्याच्यात अनेक सप्रदाय होतात.

भक्ताचे वेगवेगळे सप्रदाय बनतात पण सर्व अभक्त मात्र एकत्र रहातात. ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. त्या सर्वांचा एक समूह आहे. पण भक्त मात्र वेगवेगळ्या सप्रदायात विभागले आहेत. इस्लाम धर्म नास्तिकता मानत नाहीं. तरी हि हे सर्व लोक एकत्र येऊन नास्तिकतेवर हल्ला करीत नाहींत कारण त्याचें आपसात पटत नाहीं. अल्लाचे नाव घेणारा विष्णूचें नाव घेणार नाहीं. विष्णूचें नामस्मरण करणारा शिवाच्या भक्ताशीं एकरूप होणार नाहीं. ख्रिश्चनाकडे अल्ला, विष्णु शिव कोणी हि जाणार नाहीं. त्याचा स्वर्गांत रहाणारा परमेश्वर वेगळा च आहे की जो सातव्या आकाशात रहातो. ते त्याची भक्ति करतील. हे सारे आस्तिक विभक्त रहातात आणि सर्व नास्तिक लोक एक होतात. पुण्यवान् लोक वेगवेगळे रहातात आणि पापी लोक एकत्र होतात. अशानें काम चालणार नाहीं. म्हणून पुण्यवान् लोकानीं सामुदायिक शक्ति प्रकट केली पाहिजे.

साराश, प्रथमत: त्याच्या हृदयात च काहींना काहीं वाईट लपलेलें आहे; तें दूर केलें पाहिजे. त्यानतर दुसऱ्या सज्जनाशीं एकरूप होऊन सामुदायिक सज्जनता बनवली पाहिजे. ते असा समुदाय बनवत नाहींत याचें कारण असे की त्याचे हृदयात वाईट गोष्टी आहेत. म्हणून मी प्रथम आपल्या वाईट गोष्टी पाहून नतर दुसऱ्याशीं एकरूप होण्याबद्दल सागत आहें. ते पुण्यवान्, धार्मिक व आस्तिक हि म्हणवून घेतात पण आपल्या मनात

अहंकार ठेवतात. हें वाईट आहे. जो सज्जन दुसऱ्या सज्जनाशीं एकरूप होऊं शकत नाहीं तो पूर्णरूपानें सज्जन नाहीं. त्यात अहंकार ही च मोठी वाईट गोष्ट आहे. म्हणून प्रथम त्यानीं आपली सज्जनता पूर्ण केली पाहिजे आणि नतर सज्जनाशीं एकरूप होऊन सामुदायिक काम केलें पाहिजे.

## परिस्थितींत परिवर्तन करण्याची हिम्मत

तिसरी गोष्ट ही कीं त्यानीं समाजरचनेत बदल करण्याची हिंमत केली पाहिजे. आजची समाजरचना कायम ठेवून जर चागले काम केलें तर सर्व चागलें काम च नष्ट होईल. खाऱ्या पाण्याने भरलेल्या समुद्रात दोन चार बाटल्या मध ओतल्याने तें पाणी गोड होणार नाहीं. ही च स्थिति त्या सज्जनाची होते. आजच्या या सर्व समाजात ते आपली गोडी ओतू इच्छितात. पण त्यामुळें काहीं च होत नाहीं. लोक दारू, सिगरेट, विडी इत्यादि सेवन करतात. व्यभिचार, अत्याचार होतो आणि लोक आजारी पडतात तेव्हा हे सज्जन लोक डॉक्टर होऊन औषधोपचार करतात. आजारी दु:खी रहातो च. शेवटीं जेव्हा तो मरतो तेव्हा च त्याची सुटका होते. पण डॉक्टर समाजस्थितींत कोणता हि बदल करण्याचा प्रयत्न करीत नाहींत. लोक जास्त खातील तर आम्ही सागत नाहीं कीं कमी खा. पण तो आजारी पडल्यावर दयाळू होऊन सेवा करू लागतो. या सेवेमुळें समाजात काहीं फरक पडत नाहीं

जुने वैद्य असें तरी करीत कीं आजाऱ्याला काहीं मुदतीपर्यंत पथ्य करावयास लावीत. औषध देण्यापूर्वी पथ्य करण्याची गोष्ट सागत कीं मिरची मसाला, साखर इ० खाता कामा नये विडी, सिगारेट सोडली पाहिजे. तेव्हा च औषधाचा गुण येईल. नाहीं तर औषधाचा काहीं परिणाम होणार नाहीं. पण आजच्या डॉक्टराकडे रोगी गेला तर तो विचारील, 'काय झाले आहे?' तो म्हणेल कीं छाती दुखते डॉक्टर सागतील कीं ठीक आहे. औषध देतो, खाण्यापिण्याचें पथ्य नाही. सर्व खा प्या. पण एवढेच करा कीं जास्त खाऊं नका हे आधुनिक डॉक्टर आहेत. त्याला असें भय वाटतें कीं पथ्य सागितलें तर रोगी औषध नेण्यास येणार नाहीं. आणि रोग्याला हि हें आवडतें. याचें फळ म्हणून रोग, रोगी व डॉक्टर या

तिघाची मैत्री होते. तो रोग कायम राहील, रोगी कायम राहील आणि डॉक्टर सदा च डॉक्टर राहील तो त्याचा 'फॅमिली डॉक्टर' (कौटुंबिक डॉक्टर) होईल तो नेहमीं औषध देईल व घरात सदा आजार राहील. पूर्वी जशी घरात एका जागीं ईश्वराची मूर्ति ठेवीत असत तशी च घरात एका कोपऱ्यात बाटली राहील. त्यात कधीं लाल पाणी असेल तर कधीं हिरवें. जेव्हा घरातील लोक मरतील तेव्हा च घरातून बाटली निघेल.

साराश, आजच्या समाज रचनेंत फरक करण्याची हिंमत च कोणात नाहीं आजच्या समाजात जे दु खी आहेत त्याच्यासमोर दया दाखवितात. कोणी हि मागावयास आला तर त्याना फार दु ख होईल आणि ते दोन मुठी धान्य हि देतील पण अशी काहीं व्यवस्था करणार नाहींत कीं त्याला पुन्हा मागावें लागू नये. ते का भीक मागतात या बाबतींत कधीं विचार करणार नाहींत. परिस्थिति बदलण्याची हिम्मत व कल्पना ते करू च शकत नाहींत.

## भूदानाचें तिहेरी कार्य

भूदानात आम्हाला हें तिहेरी कार्य करावयाचें आहे. पहिलें हें कीं सर्वोदय विचार पटलेल्या सज्जनानीं आपल्या हृदयाची शुद्धि केली पाहिजे. दुसरे हें कीं सर्वांनीं मिळून काम करावयाचें तिसरें असें कीं आजच्या समाजरचनेवर हल्ला करावयाचा, समाजरचना बदलावयाची. आज एक मित्र मला भेटावयास आला होता. तो म्हणू लागला कीं मी तुम्हाला घर बाधण्यासाठीं जमीन दान देऊ इच्छितों मीं विचारलें कीं, 'ही गोष्ट चागली आहे, पण घर कोण बाधणार ?' तेव्हा तो सागू लागला कीं, 'तुमच्या संपत्तिदानातून तें बाधता येईल.' आज गावोगावीं असेंच चालू आहे. कोणी सरकारी अधिकारी आला तर गावातील लोक म्हणतील कीं आम्ही आपणास जमीन देऊ आपण एक शाळा बाधा व चालवा किंवा असें म्हणतील कीं आम्ही शाळा बाधून देतों आपण चालवा सारांश, आपल्या गावाकरिता योजना आम्ही च आखू आणि त्याची अम्मल-बजावणी आम्हीं च करू अशी हिम्मत कोणात हि नाहीं भूदानात कोणी थोडीशी जमीन दिली तर त्यामुळ इतकी क्राति होणार नाहीं. त्याला

व्यक्तिगत दानाची किंमत वाटते. पण समाजरचना बदलण्यासाठीं सर्वांना सामुदायिक रूपाने काम करावें लागेल.

## भेदक्षयानें पीडलेला समाज

हिंदुस्थानात दान धर्म कमी होत नाहीं. पण तें सर्व समुद्राच्या पाण्यात मधाची एक बाटली ओतण्यासारखें आहे. म्हणून हीं ल्हानसहान दान-पुण्यें समाजात किती तरी जीर्ण झालीं आहेत. क्षयरोगी शरीराला दुसरा इलाज नाहीं. त्याला जितकें खाऊ घालाल तें सर्व खपतें. त्याला वारवार खाऊ घालणें हा इलाज नव्हे. त्यावर उपचार झाला पाहिजे आमच्या समाजाला हि क्षयरोग लागला आहे. आम्ही एकमेकाशीं मिळून मिसळून काम च करीत नाहीं. माझे घर, माझा मुलगा, मी आणि माझ्या लोकानीं सान्या समाजाला जीर्ण करून टाकले आहे. एका च गावात जवळ जवळ राहू पण एक घर सुखी असेल तर दुसरे दु खी, दोन्ही एकदम सुखी होणार नाहींत. सुखी घरवाला दु खी शेजान्याची चिंता करणार नाहीं आणि दु खी घरवाला सुखी घरवाल्याचा मत्सर करील. दोघे मिळून एकमेकाची काळजी करणार नाहींत, तर सर्व गावाचे बाबतींत कसा विचार करतील? आमच्या देशात हि हा क्षयरोग आहे. त्यात अनेक सप्रदाय व पथ आहेत. अनेक जाति आहेत आणि आज राजकीय पक्ष आले आहेत. हा हि एक क्षयरोग आहे. यावर उत्तम इलाज केला गेला पाहिजे.

हल्लीं जो उठतो तो उत्पादन वाढविण्याची गोष्ट बोलतो. स्वराज्य आल्यावर च असें बोलतात असें नव्हे. त्या पूर्वीं हि 'ग्रो मोअर फूड' (अधिक धान्य पिकवा) हें चालत होतें. उत्पादन वाढविण्यानें हा क्षयरोग नाहींसा होणार नाहीं. उत्पादन वाढवाल व क्षयरोग कायम ठेवाल तर रोगी दोन दिवस जास्त जगेल. लवकर मरता तर बिचारा दु खातून लवकर मुक्त झाला असता. साराश, जे समजतात कीं भारताचा मुख्य प्रश्न 'अन्नउत्पादन' आहे ते भारताला समजू च शकले नाहींत. भारताचा मुख्य प्रश्न हे अनत भेद आहेत. भारताला हा 'भेदक्षय' झाला आहे.

## प्रेमाची शिक्षा

भूदानात थोडी-थोडी जमीन मिळाली तर सुरुवातीस ठीक आहे. पण ही भूदानाची पद्धति नव्हे. भूदानाची पद्धति अशी आहे कीं गावाचा प्रश्न हातीं घेऊन गावात कोणीं हि भूमिहीन राहू नये. गावात जितके भूमिहीन आहेत त्या सर्वांना भूमि देण्याची जबाबदारी सर्वांनीं च घेतली पाहिजे. पूर्वीं जसे गावात कोणीं बदमाशी केली आणि सरकार ती हुडकू शकलें नाहीं तर गावावर एक सामुदायिक दंड बसवत असत. तसे च आपल्या गावातील भेदासुर वाढविण्याच्या अपराधासाठीं आपल्याला २०० एकर जमीन प्रेमाने देण्याचा दड आहे. गावात १२०० एकर जमीन असेल तर त्याचा ⅙ हिस्सा २०० एकर जमीन वसूल झाली पाहिजे. हा सरकारचा दड नाहीं तर प्रेमाचा आणि समजूतदारपणाचा दड आहे. गावातील जवळ-जवळ सर्व जमीनदारांनीं जमीन दिली पाहिजे. सर्व भूमिहीनाना पुरेल-इतकी जमीन सर्वांनीं मिळून दिली पाहिजे. तेव्हा च भेदासुराचा नाश होईल. नतर गावकरी मिळून मिसळून काम करतील आणि गावच्या प्रश्नाचे बाबतींत एकत्र बसून विचार करतील. अशी सवय झाली तर 'ग्राम-राज्य' व 'सर्वोदय' होईल क्षयरोग नाश पावेल व व्यक्ति, समाज त्या-प्रमाणें च देश याना पुष्टिलाभ होईल.

वेल्लैकोविल ( कोईमतूर )
३१–१०–'५६

## हिंसा घालविणें हें च आमचें ध्येय



भूदानयज्ञासाठीं कितीतरी लोकांनीं दोन अडीच महिने आपापल्या शक्तीप्रमाणें मदत केली आहे. मला त्यांचे उपकार मानले पाहिजेत. मी जेव्हां स्वतःचा विचार करतों तेव्हां माणिकवाच्यकर यांचे वचनाची आठवण येते. '**नान् यार, येन उल्लम् यार, ज्ञानम् यार, इंग येनै यार अखिर।**' अर्थात् 'मी कोण आहें, माझें ज्ञान काय, मी कोठपर्यंत पोचूं शकतों, मला कोण ओळखतें' – अगदीं हा च विचार कित्येक वेळां माझे मनात येतो. लोक जी मदत करतात ती सर्व कामाचे दृष्टीनें अपुरी पडते. तरी हि मी विचार करतों कीं, माझी अशी कोणती तपश्चर्या आहे, कीं लोक मला इतकी मदत करतात?

### सर्व संस्थांतून मुक्ति

सर्व लोक जाणतात कीं, माझ्या हातीं कांहीं सत्ता नाहीं व एखादी खास संस्था हि नाहीं. यात माझा कांहीं दोष नाहीं, तर हा मी आपला गुण मानतों. पूर्वी माझा अनेक संस्थाशीं संबंध होता. आज हि अनेक संस्थांत आमचे अनेक मित्र आहेत. जर मी एखाद्या संस्थेंत दाखल होईन आणि तिच्यामार्फत काम करूं इच्छीन तर लोक मोठ्या आनंदानें मला साथ देतील. लोक मला सांगतात कीं, 'तुम्ही संस्थेचा आधार घेत नाहीं हा तुमचा एक अहंकार च आहे.' पण अशी गोष्ट नाहीं. सर्वांची मदत मला स्वागतार्ह आहे —— व्यक्तिगत मदत आणि संस्थाच्या मार्फत केलेली मदत. आणि अशी मदत मिळते हि. परंतु मीं माझ्या विचारात कोणत्या हि संस्थेला स्थान दिलेलें नाहीं. हा मीं एक मूल विचार मानला आहे. राजकीय संस्थाची गोष्ट सोडून देतों पण रचनात्मक अन्य संस्थापैकीं कोणत्या हि संस्थेचा मी समासद नाहीं. एके काळीं 'गांधी-संघ' स्थापन झाला होता, त्याचे अध्यक्ष माझे परममित्र किशोरलाल होते. माझे पुष्कळसे मित्र त्याचे



सभासद होते. किशोरलाल आग्रहानें म्हणाले कीं, मी जर त्यांत दाखल झालों तर ती फार चांगली गोष्ट होईल. त्या काळीं बापूजी होते. पण त्या वेळीं हि मी त्या संस्थेंत दाखल झालों नाहीं. मला वाटतें, शेवटीं किशोरलालजींना माझी स्थिति व माझे तत्त्व-विचार समजले.

### अजून हि अहिंसक समाज बनला नाहीं

ज्याला एखाद्या नवीन विचाराचें संशोधन करावयाचें असेल त्याला पहिली गरज तटस्थ बुद्धीची आहे. मनुष्य जोंपर्यंत दुसऱ्या संस्थेचा सदस्य असतो, तोंपर्यंत तो पुष्कळ काम करतो; पण विचारसंशोधनाला आवश्यक असणारें मुक्त मन रहात नाहीं. आपण जाणता कीं, आम्ही अहिंसेचें नांव घेतों. तो फार जुना विचार आहे. पण तो ऋषींच्या व्यक्तिगत जीवनाचा विचार होय. आपण 'कंब रामायणम्' इ० मधें वाचाल कीं, ऋषींच्या विचारानुसार एक समाज झाला होता. पण तो पक्का भ्रम आहे. वास्तविकतः असा समाज अद्यापपर्यंत झालेला नाहीं. काव्यांत जें वर्णन येतें तें एक चित्र आहे. एक आदर्श पुढें ठेवला जातो. तो अमलांत आणण्यासाठीं जीवनाची रचना च बदलावी लागते.

### आजच्या समाजाचा अंतिम शब्द 'लॉ ॲन्ड ऑर्डर' आहे

आज लोकनेत्यांची पुष्कळशी शक्ति आणि बुद्धि हिंसेच्या विकासासाठीं खर्च होत आहे. सर्वच्या सर्व विज्ञान हिंसेचें दास झालें आहे. वैज्ञानिकाला आज्ञा दिली जाते कीं त्यानें अशा प्रकारें संशोधन करावें. भांडवलशाही समाजांत नव्हे तर त्यापूर्वी हि समाजांत विज्ञानाचें संशोधन केलें जात असे. आपण पाहूं शकाल कीं साध्या धनुष्य-बाणापासून तों ॲटम व हायड्रोजन बॉम्बपर्यंत जितके शोध लागले त्यांच्यासाठीं किती बुद्धि लागली, किती प्रयोग झाले, आणि हिंसेचीं किती असंख्य साधनें तयार केलीं गेलीं. याशिवाय हिंसेसाठीं अनेक प्रकारचें तत्त्वज्ञान हि तयार केलें गेलें. पुंजीवाद, साम्यवाद इ० पुष्कळसे वाद काय दाखवतात ? विशिष्ट विचार समाजावर लादण्यासाठीं हें तत्त्वज्ञान निर्माण झालें. अशा रीतीनें हिंसेच्या साधनासाठीं पुष्कळ संशोधन केलें गेलें आणि हिंसेला उचलून धरणारें तत्त्वज्ञान हि तयार केलें गेलें.

याशिवाय 'पीनल कोड', लॉ कोर्ट, कायद्याचें सर्वच्या सर्व स्वरूप काय करतें? त्याचा अंतिम शब्द काय आहे? शंकराचार्यांना विचारलें कीं, 'तुमचा अंतिम शब्द काय आहे?' ते म्हणाले, 'ब्रह्म.' तसेंच आधुनिक समाजाला, या सर्व कायदे करणाराना, विचारलें कीं, तुमचा निर्वाणीचा शब्द काय आहे?' तर ते सांगतील कीं, 'लॉ ॲण्ड ऑर्डर.' कायदा व सुव्यवस्था म्हणजे च तो आजच्या कालाचें 'ब्रह्म' आहे, आजचा अंतिम शब्द आहे. त्याच्याजवळ यापेक्षा उच्च शब्द नाहीं कायदा व व्यवस्था याचा अर्थ हा च आहे कीं आजपर्यंत जी समाजरचना झाली त्या समाजरचनेंत ज्याचे जे अधिकार आहेत ते कायम रहावेत.

## महादेव हिंसा।

आपण आजच्या वर्तमानपत्रात ईडनचें महावाक्य वाचलें असेल च. त्याने म्हटलें आहे कीं, "'मॉरल फोर्स' (नैतिक शक्ति) पुरेशी नाहीं. 'फिजिकल फोर्स' (भौतिक शक्ति) ची जरूरी आहे. इंग्लंडनें ईजिप्त-वर हल्ला चढविला नसता तर यू. एन्. ओ. ला शांति स्थापण्यास वेळ लागला असता." ते पहिल्यापासून असा च दावा करीत आले आहेत आणि आज हि करतात कीं, आम्ही जें कांहीं केलें तें जगात शांतीची स्थापना करण्यासाठीं च केलें. हें आजच्या समाजाचें एक चिन्ह आहे. पण ते एक प्रकारचे विचारक आहेत ते साम्यवाद मानीत नाहींत आणि सर्वांची च सत्ता असावी असें हि मानीत नाहींत. ते असे उदार विचारवाले नाहींत कीं कोणत्या च प्रकारची मालकी नसावी. उदार विचार करणारे करूंचेव आहेत. पण ते हि म्हणतात कीं हंगेरींत आम्ही जें कांहीं करीत आहोंत तें शांति स्थापण्यासाठीं च करीत आहोंत. आणि इजिप्तसाठीं आम्ही तसेंच करू च करावें लागेल. त्याची हि श्रद्धा व विश्वास हिंसेवर च आहे.

साराश, आजपर्यंत जो समाज बनला आहे त्यात कांहीं दया, प्रेम नव्हतें अशी गोष्ट नाहीं. त्यात दया, प्रेम इत्यादि सर्व गोष्टी आहेत. पण त्या रक्षक नाहींत, रक्ष्य आहेत. प्रेम, करुणा, सहयोग इत्यादि सर्व लहान लहान देव आहेत आणि महादेव आहे हिंसा. त्याचेकडे आपल्या सर्व तक्रारी पोंचवल्या जातात.

### हिंसेला कर्तव्यरूपांत मान्यता

त्या हिंसा-शक्तीचें स्थान अहिंसेनें घ्यावें असें मला वाटतें. अहिंसेला आजच्या समाजात हि स्थान आहे. घरोघरीं लोक एकमेकावर प्रेम करतात ती अहिंसा च आहे. पण ती हिंसेपर्यंत पोंचते. परतु जेव्हा ' टोटल वॉर ' ( सकुल युद्ध ) सुरू होईल तेव्हा देशातील सर्व लोकाना सैन्यात भरती व्हावें लागेल. अमेरिका, रशिया व इग्लडची ही स्थिति आहे. जोंपर्यंत आम्ही त्या परम देवतेला — हिंसेला — बदलत नाहीं, तोंपर्यंत हिंदुस्थानात हि हीं च स्थिति राहील. आज आपणावर कोणती हि आपत्ति नाहीं म्हणून आपण शात दिसता. पण प्रसग आल्यावर सर्व लोकाना युद्धाची प्रेरणा मिळते. तेव्हा हें राष्ट्रीय कर्तव्य मानलें जाईल. आज ज्या स्थितींत लोकाचीं मनें आहेत, त्या स्थितींत हें च कर्तव्य आहे.

इ. स. १९१५-१६ ची गोष्ट आहे. त्या वेळीं मी बडोदा कॉलेजमध्यें शिकत होतों. महायुद्ध सुरू झालें. फ्रान्सनें जाहीर केलें कीं, सर्व लोकानीं सैन्यात भरती व्हावें. आमचे एक फ्रेंच प्रोफेसर होते. ते विज्ञान शिकवीत असत. त्याना पुष्कळ चागला पगार मिळत होता. परतु एक दिवस त्यानीं आमची परवानगी घेताना म्हटलें, ' माझ्या देशाचा आदेश आहे कीं सैन्यात भरती व्हा. म्हणून मी येथे शिकवू शकत नाहीं. मला तेथें गेलें च पाहिजे. ' ते नोकरी सोडून सैन्यात गेले. जर ते गेले नसते तर त्याना कोणीं पकडून नेलें नसतें. परतु कर्तव्य समजून कॉलेज सोडून ते गेले. मीं हें उदाहरण या साठीं च दिलें कीं हिंसेसाठीं सिद्ध होणारे पुष्कळसे लोक भरपूर श्रद्धा आणि कर्तव्यभावनेनें च हिंसेसाठीं सिद्ध होतात.

### हिंसेचें स्थान अहिंसेला द्यावयाचें आहे

तें स्थान आम्ही अहिंसेला देऊ इच्छितों. आजपर्यंत जगाचे प्रश्न हिंसेनें सोडविण्याचा प्रयत्न केला गेला. जितकी निष्ठा, जितकी सेवा व जितकी बुद्धि हिंसेसाठीं उपयोगात आणली गेली तितकी च आता अहिंसेसाठीं उपयोगात आणावी लागेल ज्याप्रमाणें हिंसेचीं साधनें, तत्त्वज्ञान आणि व्यवस्था तयार करण्यात लोकानीं आपलें जीवन घालविलें तसें च आता

आम्हाला अहिंसेचीं साधनें, तत्त्वज्ञान आणि व्यवस्था बनविण्यासाठीं आपलें जीवन अर्पण करावें लागेल. यासाठीं अहिंसेचे च कूट नीतिज्ञ, वैज्ञानिक, समाजशास्त्रज्ञ, सैनिक, सेनापति आणि कारखानेवाले तयार झाले पाहिजेत. ही एक अगदीं स्वतंत्र च सृष्टि आहे.

आजपर्यंत जी दया आणि करुणा चालत आली ती फार लहानशी गोष्ट होती. आम्हाला त्या दयेवर आणि करुणेवर दया करावीशी वाटते. कारण ते असे देव आहेत कीं जे हिंसेसमोर मस्तक नम्र करीत. त्यांनीं कधीं हि कोणाची हिंसा केली नाहीं असा अत्यंत दयाळू मनुष्य देशाची आज्ञा होता च हातात तलवार घेऊन मारण्यास धावतो. त्या अंतिम परमेश्वराचा शब्द आम्हा सर्वांना प्रमाण आहे. आई मुलाला समजाविण्याचा प्रयत्न करते परंतु त्याची समजूत होत नाहीं तेव्हा शेवटीं ती थप्पड मारते. म्हणजे तिचा अंतिम देव थप्पड आहे. आणि त्याच्यावर च तिचा अंतिम विश्वास आहे. जेथें प्रेम, समजाविण्याची शक्ति आणि वक्तृत्वशक्ति काम करूं शकत नाहीं तेथें तो मोठा देव – ती काठी – काम करेल. ही अशी आज श्रद्धा आहे. या श्रद्धेच्या ऐवजीं आम्हाला अहिंसेची श्रद्धा निर्माण करावयाची आहे. यासाठीं खूप संशोधन करावें लागेल. असें संशोधन करणाऱ्यावर संस्थेचें बंधन चालणार नाहीं.

## सरकार हिंसारूपी देव बदलूं शकत नाहीं

आज जे लोक सरकारात आहेत ते सेवा करीत नाहींत ? काहीं लोक आम्हाला वारंवार विचारतात कीं ग्रामदानात सरकारी मदत घ्याल तर कितीं ग्रामदान मिळेल ! सरकार कोट्यवधि रुपये खर्च करून गावांना मदत करूं शकतें. त्या शक्तीला काहीं सीमा च नाहीं. मला मान्य आहे कीं सरकारमार्फत पुष्कळ सेवा होऊं शकते. म्हणून च काहीं लोक सरकारात राहातात. पण सरकार त्या देवाला बदलूं शकत नाहीं. सरकारी कायद्याचे मुळात हें च तत्त्व आहे कीं त्याच्या पाठीशीं सैन्य असणें. आम्हाला तें बदलावयाचें आहे. त्यासाठीं सर्वांना चिंतन करावें लागेल आणि सर्व संस्थातून मुक्त झाल्याशिवाय तें चिंतन होऊं शकणार नाहीं.

### आइक व बुल्गानिन एका च देवाचे भक्त

आमचे काम इतर्रें भूग्गामी क्रांतींचें आहे कीं त्यात साधनात व साध्यात दोघात क्रांति आहे कम्युनिस्ट समजतात कीं त्याचें ध्येय क्रांतिकारी आहे. परंतु वास्तविक तस नाहीं. कारण पुंजीपती लोकांचा जो देव तो च त्यांचा देव आहे त्या देवाचा भक्त ईस्न आहे, आइक आहे, त्या च देवाचा भक्त बुल्गानिन आहे. या भक्तात आपआपसात टक्कर होते. पण सर्व एका च देवाचे भक्त आहेत म्हणून त्यांच्याजवळ क्रांति नाहीं. परंतु ग्रामदान, भूदान, संपत्तिदान इत्यादि क्रांतीच्या च गोष्टी आहेत पण लोकांच्या हें लक्षात येत नाहीं

### संपत्तिदान क्रांति आहे

आता च आपण ऐकलें कीं आम्हाला सात लाख रुपयांचे संपत्तिदान मिळालें परंतु बाबाचे हातात एक पैसा हि आला नाहीं. काहीं कार्य कर्त्यांच्या समोर हा प्रश्न आहे कीं इतर्रें सर्व संपत्तिदान कसें वसूल केलें जाईल त्याना कळत नाहीं कीं वसूल करावे लागलें तर ' संपत्तिदान ' च नष्ट होईल तो फंड होईल संपत्तिदानात आम्हाला काहीं करावयाचें नाहीं. त्याचा खर्च कोण करील ? कसा करील ? या सर्वांची चिंता संपत्तिदान देणारा च करील तो विचारील कीं मजजवळ पैसा आहे तो मी कोठें खर्च करू ? त्यावर भूदान समिति काहीं सल्ला देईल आणि त्यानुसार तो खर्च करील जर आपण असें संपत्तिदान मिळविलें कीं ज्यात देणाराला काहीं च काळजी नाहीं तर तें संपत्तिदान नव्हे मग आपल्या सात लाख रुपयांच्या संपत्तिदानाचें दानपत्र बाबा एकदम फाडून टाकील आणि त्यामुळें च बाबाच्या संपत्तिदानाचें क्रांतिकारक पाऊल प्रकट होईल संपत्ति दान वसूल करण्यानें क्रांति होत नाहीं वसूल करणें ' टॅक्स कलेक्टर 'चें काम आहे लक्षात ठेवा कीं कोट्यवधि रुपयाची संपत्ति एकत्र करण्या करिता बाबा फिरत नाहीं तो लोक हृदयात परिवर्तन घडविण्यासाठीं फिरत आहे

### विचारानें च काम होतें

सपत्तिदानाचा विचार सोपा आहे. पहा, कोण्या ऋषीनें समाजाला समजाविलें कीं मुलीला घरीं ठेवणें योग्य नाहीं तेव्हा लोक स्वतः मुलीच्या लग्नाची चिंता करू लागले. त्यासाठीं सहा सहा महिने भटकतात, वर हुडकतात आणि चार सहा हजार रुपये खर्च करतात. अशा च प्रकारें ग्रामदानाच्या गावाची चिंता जमीनदार दाता करील परतु तो आज करीत नाहीं. याचें कारण अजून त्याना पूर्ण विचार समजला नाहीं. परतु त्याचा हात पकडून त्याला काम करावयास लावणें हें बाबाचें काम नव्हे. त्याचें काम एवढें च कीं विचार समजावून देणें. जेव्हा लोकाना समजेल कीं आपल्याजवळ जमीन ठेवणें आपल्या घरातील कन्या ठेवण्यासारखे च आहे, तेव्हा ते स्वत जाऊन वर हुडकतील आणि त्याला जमीन देतील. तोपर्यंत लोकाना हा विचार समजावून सागण्यासाठीं जमीन मिळविणें, वाटणें इत्यादि 'किंडरगार्टन 'चा प्रयोग चालू राहील. जर बाबानें दानपत्रें मिळवलीं नसतीं, समिति बनविली नसती, वाटणी केली नसती तर हा विचार हवेंत निघून गेला असता. म्हणून त्याला मूर्त रूप देण्यासाठीं हा प्रयोग चालू आहे. आज आम्ही सपत्तिदानाचे कागद लिहून घेऊन आमचेजवळ ठेवतो. परतु त्याची हि गरज नाहीं. कामाचा प्रारभ व्हावा म्हणून आज आम्ही कागद लिहून घेतों. नाहीं तर विचार किती पसरत आहे हें कळणार नाहीं. हा नवा विचार जितका पसरेल तितकें हें काम विस्तृत होईल

### चिंतन सर्वस्वाचें दान व्हावें

मी एका फार मोठ्या गूढ शक्तीवर विश्वास ठेवून काम करीत आहें. ती शक्ति कोणत्या प्रकारें काम करीत आहे हें मला माहीत नाहीं. पण मी पाहातों कीं, ती काम करीत आहे. ती शक्ति आमच्याकडून काम करवून घेत आहे. आम्हाला फिरावयास लावीत आहे. आता च एका मित्रानें सागितलें कीं मी या कामासाठीं आठवड्यातील तीन दिवस देईन. यावर दुसऱ्या मित्रानें सागितलें कीं अशा च प्रकारें सर्वांनीं आपापला निश्चय केला पाहिजे. मनुष्य विचार समजल्याशिवाय या कामात आपल्या वेळेचा

अशा अर्पण पक्ष सांत नाही. 'जीवनदान' याचा असा अर्थ नव्हे की आठवड्यातून सात हि दिवस या कामासाठी द्यावे. मनुष्य झोंपतो. दिवसाचे ७–८ तास त्यात जातात. तसा हिशोब केला तर आमचा अर्धा वेळ शोप इ० गोष्टींत निघून जातो. पण मनुष्याचें जें चिंतन आहे तें या कामासाठीं समर्पित झालें पाहिजे. मग वेळेचा एक हिस्सा च दिला जाईल, तो पुरे. बाबा भूदानात आपली सर्व शक्ति खर्च करीत आहे. परंतु तो खाणें पिणें, झोंप, आजार इत्यादींत हि वेळ घालवतो च. तरी हि नेहमीं त्याचें भूदानाचें च चिंतन चालू असतें.

### ग्रामदान च देशाला महायुद्धापासून वांचवूं शकेल

ज्याच्या लक्षात येईल की आजच्या परमेश्वररूपी हिंसेला बदलणें जरूर आहे तो दुसरी गोष्ट च बोलणार नाहीं. आज हिंदुस्थानात अधिकात अधिक बोलबाला 'पंचवर्षीय योजने'चा आहे. मला सांगावेंसें वाटतें कीं उद्या जर विश्वयुद्ध सुरू झालें तर सर्व पंचवर्षीय योजना नष्ट होईल. बाहेरच्या वस्तु इथें येणें आणि इथल्या वस्तु बाहेर जाणें बंद होईल. पदार्थांच्या किंमती वाढतील. असंख्य लोकांना त्रास होईल. त्या वेळीं पंचवर्षीय योजनेची गोष्ट च सोडा, लोकांना जिवंत ठेवणें हि कठीण होईल. परंतु त्या वेळीं बाबाचें भूदान, संपत्तिदान चालू च राहील कारण त्याचा संबंध लढाईशीं नाहीं. परंतु अशा वेळीं तें काम जोरानें च चालेल. बाबा लोकांना समजावील कीं वस्तूंच्या किंमती खूप वाढल्या आहेत कारण तें *तुमच्या देशाच्या हातात नाहीं*, *परदेशाच्या हातात आहे. लढाई सुरू झाली म्हणून भाव वाढले, पण जर तुम्ही ग्रामोद्योग उभे कराल, आपल्या* गरजेच्या वस्तु गावात च निर्माण कराल, तर किंमती तुमच्या हातात रहातील. रॉकेल तेल इत्यादींचे भाव वाढतील पण धान्य, कापड इत्यादींचे भाव तुम्ही आपल्या हातीं ठेवू शकाल. मी तर असें सांगतों कीं अशल्या महायुद्धाचे वेळीं हिंदुस्थान ग्रामदान आणि ग्रामराज्याच्या जोरावर जगू शकेल.

### परमेश्वरानें आइक बुलगानिन यांना सद्बुद्धि द्यावी

मी हें सांगू इच्छितों कीं आजच्या स्थितींत लढाई थांबवून धरणें कोणाहि

व्यक्तीचे हातीं नाहीं. कारण आजचे राजकारणी पुरुष एका समाजरचनेंत दाखल आहेत ते एका यन्त्राचे भाग आहेत. ते यन्त्राची गति थोपवू शकत नाहींत. ते ओरडतात कीं लढाई होऊ नये, शांति असावी; पण त्याच्या हातात फक्त ओरडणें च आहे एखाद्या मूर्खानें आपली विडी गवताच्या गंजी-वर फेंकली तर साऱ्या जगाला आग लागू शकते. अशा च तऱ्हेनें एखाद्या मूर्खाच्या मनात आलें आणि त्यानें एखाद्या देशावर आक्रमण केलें तर लढाई सुरू होईल. एखाद्या राजकारणी पुरुषाची बुद्धि फिरली तर तो सर्व जगाला आग लावू शकेल आजचा समाज असा आहे कीं आम्हीं आपलें चागलें वाईट करण्याची शक्ति मोजक्या लोकांच्या हातात दिली आहे.

नेहमीं प्रार्थना करताना परमेश्वराला मला सद्बुद्धि दे असें म्हणण्याचा रिवाज आहे. परतु बाबा अनेक वेळा आपल्यासाठीं प्रार्थना करीत नाहीं. तो परमेश्वराची प्रार्थना करतो कीं, ' परमेश्वरा, आइकला सद्बुद्धि दे, बुल्गानिन आणि ईडनला अक्कल दे. ' कारण तो जाणतो कीं परमेश्वरानें बाबाला मूर्ख बनविलें, वेडें केलें तर तो जगाचें काहीं नुकसान करणार नाहीं. परतु त्यानें जर ईडन, आइक आणि बुल्गानिनला अक्कल दिली नाहीं तर जग नष्ट होईल. म्हणून बाबानें सर्व स्वार्थ सोडून दिला आणि केवळ परार्थबुद्धीनें च त्या लोकासाठीं तो प्रार्थना करतो. तो याहून हि एक मूलगामी गोष्ट करतो. ती प्रार्थना आहे आणि प्रयत्न हि प्रार्थना ही आहे कीं, ' परमेश्वरा, तू आम्हाला अशी बुद्धि दे कीं आम्हीं आपला कारभार थोड्या च लोकांच्या हातीं सोंपवू नये. ' आणि हा च आमचा प्रयत्न आहे तो भूदान, संपत्तिदानाच्या मार्फत चालू आहे. म्हणून बाबाचा असा दावा आहे कीं भूदानामार्फत विश्वशातींसाठीं जितके चागले प्रयत्न होत आहेत त्यापेक्षा अधिक कोठें हि होत नसतील.

### वेड पाहिजे

मीं तुम्हाला भूदानाचा मूलगामी विचार समजाविला तेव्हा माझें काम पूर्ण झालें. आता मी चार प्राच महिने आपल्या प्रदेशात राहीन परतु जर आपण बाबाचें मत आवून पहाल तर तुम्हाला दुसरें च दृश्य दिसेल. जर

येथे अहिंसात्मक प्रांतांचा थोडासा भाग झाला तर बाबा तामीळनाड सोडणार च नाहीं. बाबाचा लोभ एखादा प्रदेश, जिल्हा किंवा गावावर नाहीं. त्याची आसक्ति त्या हिंसादेवाला घालविण्याची आहे. आपले रामस्वामी नायकर (द्रविड चळवळीचे प्रमुख) म्हणतात कीं मला ही मूर्ति फोडावयाची आहे, जाळावयाची आहे. अशा च तऱ्हेनें बाबाचा सारा ओढा या च गोष्टीकडे आहे कीं आज जेथें हिंसादेवाला उभें केलें आहे तेथून त्याला काढलें पाहिजे. मला अशी आशा आहे कीं अशा प्रकारचा वेडेपणा आपल्यात हि येईल

धारापुरम् (कोयम्बतुर)
८-११-'५६

## मलयकालचा मार्कंडेय ग्रामदान

: २७ :

विज्ञानाचा काल झपाट्यानें पुढें चालला आहे. त्याचें अहिंसेशीं प्रेमाचें नातें आहे. विज्ञानाच्या बरोबर जर हिंसा चालली तर मानवजातीचा नाश निश्चित आहे. म्हणून जर आपण विज्ञान वाढविण्याची इच्छा करूं तर त्याचा संबंध अहिंसेशीं जोडला पाहिजे. जोंपर्यंत लोकांच्या हातीं सत्ता येत नाहीं तोंपर्यंत अहिंसेची प्रगति होणार नाहीं. कोणाच्या देण्यानें अधिकार मिळत नाहीं तर तो योग्यतापूर्वक मिळतो.

### इंग्लंडमधें लोकशाहीचें नाटक

हिंदुस्तानमध्यें आज लोकांचें राज्य आहे असें मानलें जातें. अमेरिका व इंग्लंडमध्यें सुद्धा 'लोकशाही' चालू आहे. इंग्लंडची लोकशाही तर लोकशाहीचा एक परिपूर्ण नमुना मानला जातो. परंतु ह्या १०-१५ दिवसात फ्रान्सनें व इंग्लंडनें इजिप्तवर जो हल्ला केला त्या वेळेस सर्व लोकांचें मत त्याविरुद्ध होतें. 'यू. एन्. ओ.' सुद्धां त्याच्याविरुद्ध होती आणि इंग्लंडच्या पार्लमेंटमध्यें सुद्धा त्याच्याविरुद्ध आवाज उठवला गेला. सर्व

लोकांनीं चांगल्या तऱ्हेने आपला विचार प्रकट केला. तेव्हा जगाची परिस्थिति बदलली आहे असे जाणून इंग्लंडने आपलें पाऊल मागें घेतलें. ही लोकशाही नाहीं, तर लोकशाहीचें नाटक आहे

## वेलफेअर नव्हे, इल फेअर

जेथे सर्व सत्ता केन्द्रित आहे तेथें लोकशाही नाहीं. तीमध्यें काहीं थोडे लोक निवडले जातात आणि त्यांच्या हातात सर्व काहीं असते. राजे महाराजे यांच्या काळीं सुद्धा कोणी हि राजा एकटा राज्य करीत नसे. काहीं थोड्या लोकांच्या सल्लामसलतीन च तो राज्य करत असे. राजाचे सरदार, मंत्री इत्यादि असत राजा आणि त्याचे दोन चार सल्लागार चांगले असतील तर देशाचें राज्य चांगले चाले, अन्यथा राज्य वाईट होइ.

आज सुद्धा तशी च परिस्थिति आहे लोकशाहीचें नाटक चाललें आहे. आजची परिस्थिति बदलण्याचा एक च उपाय आहे. तो म्हणजे ठिक ठिकाणच्या लोकांच्या हातीं त्यांच जीवन येणें. आज 'वेलफेअर स्टेट' (कल्याणकारी राज्य)च्या नावानें पुष्कळशी सत्ता केन्द्राच्या हातात असते त्यामुळे जनतेला जरी काहीं सुख मिळत असलें तरी त्याला मी 'वेलफेअर' म्हणणार नाहीं 'इल फेअर' म्हणेन. थोड्या च लोकांच्या हातात सत्ता असणे हें काहीं 'वेलफेअर' नाहीं. जेव्हा सत्ता गावागावामध्यें वाटली जाईल तेव्हा च अहिंसेचा विचार पसरेल. यासाठीं गावागावाला अधिकार द्यावे काय? नाहीं मीं मागें च सांगितलें आहे कीं अधिकार देऊन मिळत नाहींत, ते घ्यावे लागतात जेव्हा त्याना आपल्या गावाचा कारभार आपण चालवावा असें जेव्हा गावातील लोकाना वाटू लागेल तेव्हा च त्यांचे हातीं सत्ता येईल या दिशेनें टाकलेलें सर्वोत्तम पाऊल जर कोणतें असेल तर तें ग्रामदान च होय असें मला वाटतें.

## ग्रामदानी गांवची कहाणी

येथें जवळ च एक गाव ग्रामदान म्हणून मिळाले. त्याचें नाव तुम्ही वा आम्ही विसरू शकणार नाहीं कारण त्याच नाव आहे 'मरावा-पाल्यम्' (ज्याला कोणी विसरू शकत नाहीं) ३–४ दिवसापूर्वीं त्या

येथे अहिंसात्मक क्रांतीचा थोडासा भाग झाला तर बाबा तामीळनाड सोडणार च नाहीं. बाबाचा लोभ एखादा प्रदेश, जिल्हा किंवा गावावर नाहीं. त्याची आसक्ति त्या हिंसादेवाला घालविण्याची आहे. आपले रामस्वामी नायकर ( द्रविड चळवळीचे प्रमुख ) म्हणतात कीं मला ही मूर्ति फोडावयाची आहे, जाळावयाची आहे. अशा च तऱ्हेनें बाबाचा सारा ओढा या च गोष्टीकडे आहे कीं आज जेथें हिंसादेवाला उभें केलें आहे तेथून त्याला काढलें पाहिजे. मला अशी आशा आहे कीं अशा प्रकारचा वेडेपणा आपल्यात हि येईल

**धारापुरम्** ( कोयम्बतुर )
८-११-'५६

## प्रलयकालचा मार्कंडेय ग्रामदान

: २७ :

विज्ञानाचा काल झपाट्यानें पुढें चालला आहे. त्याचें अहिंसेशीं प्रेमाचें नातें आहे. विज्ञानाच्या बरोबर जर हिंसा चालली तर मानवजातीचा नाश निश्चित आहे. म्हणून जर आपण विज्ञान वाढविण्याची इच्छा करूं तर त्याचा संबंध अहिंसेशीं जोडला पाहिजे. जोंपर्यंत लोकांच्या हातीं सत्ता येत नाहीं तोंपर्यंत अहिंसेची प्रगति होणार नाहीं. कोणाच्या देण्यानें अधिकार मिळत नाहीं तर तो योग्यतापूर्वक मिळतो.

### इंग्लंडमधें लोकशाहीचें नाटक

हिंदुस्तानमध्यें आज लोकांचें राज्य आहे असें मानलें जातें. अमेरिका व इंग्लंडमध्यें सुद्धा 'लोकशाही' चालू आहे. इंग्लंडची लोकशाही तर लोकशाहीचा एक परिपूर्ण नमुना मानला जातो. परंतु ह्या १०-१५ दिवसात फ्रान्सनें व इंग्लंडनें इजिप्तवर जो हल्ला केला त्या वेळेस सर्व लोकांचें मत त्याविरुद्ध होतें 'यू. एन्. ओ.' सुद्धा त्याच्याविरुद्ध होती आणि इंग्लंडच्या पार्लमेंटमध्यें सुद्धा त्याच्याविरुद्ध आवाज उठवला गेला. सर्व

लोकांनीं चांगल्या तऱ्हेनें आपला विचार प्रकट केला. तेव्हा जगाची परिस्थिति बदलला आहे असें जाणून इंग्लंडने आपले पाऊल मागे घेतलें. ही लोकशाही नाहीं, तर लोकशाहीचे नाटक आहे

## वेलफेअर नव्हे, इल फेअर

जेथे सर्व सत्ता केन्द्रित आहे तेथें लोकशाही नाहीं. तीमध्ये काहीं थोडे लोक निवडले जातात आणि त्यांच्या हातात सर्व काहीं असते राजे महाराजे यांच्या काळीं सुद्धा कोणी हि राजा एकटा राज्य करीत नसे. नाहीं थोडया लोकांच्या सल्लामसलतीनें च तो राज्य करत असे. राजाचे सरदार, मंत्री इत्यादि असत राजा आणि त्याचे दोन चार सल्लागार चांगले असतील तर देशाचें राज्य चांगलें चाले, अन्यथा राज्य वाईट होई.

आज सुद्धा तशी च परिस्थिति आहे. लोकशाहीचे नाटक चाल्लें आहे. आजची परिस्थिति बदलण्याचा एक च उपाय आहे. तो म्हणजे ठिक ठिकाणच्या लोकांच्या हातीं त्यांचें जीवन येणें. आज ' वेलफेअर स्टेट ' ( कल्याणकारी राज्य )च्या नावानें पुष्कळशी सत्ता केन्द्राच्या हातात असते त्यामुळे जनतेला जरी काहीं सुख मिळत असले तरी त्याला मी ' वेलफेअर ' म्हणणार नाहीं. ' इल फेअर ' म्हणेन. थोड्या च लोकांच्या हातात सत्ता असणें हें काहीं ' वेलफेअर ' नाहीं. जेव्हा सत्ता गावागावामध्यें वाटली जाईल तेव्हा च अहिंसेचा विचार पसरेल. यासाठीं गावागावाला अधिकार द्यावे काय ? नाहीं. मीं मागें च सांगितलें आहे कीं अधिकार देऊन मिळत नाहींत, ते घ्यावे लागतात जेव्हा त्यांना आपल्या गावाचा कारभार आपण चालवावा असें जेव्हा गावातील लोकांना वाटू लागेल तेव्हा च त्यांचे हातीं सत्ता येईल या दिशेनें टाकलेलें सर्वोत्तम पाऊल जर कोणतें असेल तर ते ग्रामदान च होय असें मला वाटतें.

## ग्रामदानी गांवची कहाणी

येथें अपल च एक गाव ग्रामदान म्हणून मिळालें. त्याचें नाव तुम्ही या आम्ही विसरू शकणार नाहीं कारण त्याचे नाव आहे ' मरावा पाल्यम् ' ( त्याला कोणी विसरू शकत नाहीं ). ३–४ दिवसांपूर्वी —

गावचे काहीं लोक मला भेटावयास आले. मीं त्यांच्याशीं काहीं चर्चा केली; परंतु तेथील भगिनींनीं हि सांगितलें कीं, 'आम्ही बाबाला भेटू इच्छितों. त्या आज मला भेटायला आल्या. मीं त्यांना विचारलें, 'ग्रामदानानें तुम्हांला समाधान वाटलें का?' त्या म्हणाल्या, 'रोम्ब संतोषम्' (पुष्कळ संतोष आहे). बहुधा मालकी अधिकार सोडण्याची गोष्ट भगिनींना एकदम पटत नाहीं. त्यांना इस्टेट वगैरेंचा अधिकार नाहीं, म्हणून त्यांना त्याचें जास्त महत्त्व वाटतें. त्याशिवाय त्यांना खाणार इ० ची अधिक काळजी करावी लागते. जर मातांना मुलांची काळजी नसेल तर कोणाला असणार? म्हणून जेव्हां त्या भगिनींनीं सांगितलें कीं, 'आम्हांला संतोष आहे' तेव्हां मला खरोखर च फार संतोष झाला.

त्या गावच्या लोकांनीं असा हि निश्चय केला आहे कीं, आम्ही आमच्या गावांत निघणारें कापड च वापरूं. तेथें चरखे चालू झाले आहेत. जेव्हां मीं त्या भगिनींना विचारलें कीं, 'आपलें सर्व कापड गावांत तयार होण्यास किती वेळ लागेल?' त्या म्हणाल्या कीं, 'आम्हांला विचार करून च याचें उत्तर दिलें पाहिजे, आणि तसें आचरण केलें पाहिजे. म्हणून आम्ही खोटें उत्तर देऊं शकणार नाहीं.' हें ऐकून मला विशेष आनंद झाला. नंतर मी म्हणालों कीं, 'विचार करून उत्तर द्या' तेव्हां त्या म्हणाल्या कीं, 'सहा महिन्यांचा कालावधि लागेल.' हें तर मला फार च आवडलें. अशा जर गावांतील भगिनीवर्ग जाग्रत झाला तर गावावर सुल्तानी चालणार नाहीं.

### महायुद्धांत पंचवार्षिक योजना टिकणार नाहीं

जगांत महायुद्ध केव्हां सुरू होईल कोणी सांगू शकत नाहीं. राजकारणी लोक नाडीवर हात ठेवून सांगतात कीं आतां ताप नाहीं. पण लगेच केव्हां सांगतात कीं ताप १०५ डिग्री झाला आहे आणि आजाऱ्याला काल रात्रीं अस्वस्थता वाटत होती. कोणाला हि कळत नाहीं कीं त्याचा परिणाम काय होणार आहे. अशा स्थितींत हिंदुस्तान लढाईत सामील झाला नाहीं तरी हि गावोगावच्या लोकांना त्रास होणार च. वस्तूंच्या किंमती वाढतील. वस्तू बाहेरून आंत व देशांतून बाहेर जाणें कठीण होईल. पंचवार्षिक योजना कोसळून पडेल. परंतु ज्या गावांत ग्रामदान झालें आहे आणि जेथील लोक

आपल्या वस्तू आपण स्वत च बनवीत असतील तेथें लढाईचा कमींत कमी परिणाम होईल. ते आपल्या गावातील दूध पितील, गावातील धान्य, फळें भाजी खातील. गावात कापूस पेरतील आणि गावात च कपडा करतील. गूळ, तेल इ० जीवनाच्या मुख्य गरजा गावात च निर्माण करतील केरोसिनचे भाव वाढतील व त्यामुळें थोडाफार त्रास होईल. पण तो कमी होईल. मी सागू इच्छितों कीं जसा प्रलयकालात मार्कण्डेय ऋषि एकटा च पोहत होता तसे च ग्रामदानाचीं गावें ह्या महाप्रलयात तरतील. त्याचा ग्रामदान, भूदान इ० कार्यक्रमावर काहीं परिणाम होणार नाहीं. हा एक अहिंसेचा प्रयोग आहे. चोहींकडे दाट अंधकार पसरला असता एक लहानसा च दिवा लावला तरी तो सर्व अंधःकार त्या दिव्यावर हल्ला करू शकत नाहीं कारण कीं दिवा च स्वत प्रकाश आहे.

## तामीळनाड ग्रामदानाला अनुकूल

ग्रामदानाची कल्पना ज्या गावात मान्य होईल तेथे ज्ञानाचा दिवा तेवू लागेल. मी आपल्या अनुभवानें सागतों, कीं तामीळनाडच्या लोकाचा स्वभाव ग्रामदानाला अनुकूल आहे काहीं लोकाना वाटतें कीं तामीळनाडचे लोक अतिशय बुद्धिमान आहेत, विचार करणारे आहेत. म्हणून येथें ग्रामदानाला अनुकूलता कमी आहे. म्हणजे त्याच्या सागण्याचे तात्पर्य हें च कीं बाबाचा कार्यक्रम मूर्खाना अनुकूल आहे. पण मी सागू इच्छितों कीं खरी गोष्ट याच्या उलट आहे. मूर्खाला समजाविणें त्या हि पेक्षा अधिक सोपें आहे. परतु जो मनुष्य थोड्या ज्ञानानें दग्ध झाला आहे त्याला समजाविणें कठीण आहे

> ' अज्ञः सुखमाराध्यः सुखतरमाराध्यते विशेषज्ञः ।
> ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि च तं नरं न रञ्जयति ॥ '

माझा अनुभव आहे कीं तामीळनाडमधील लोक अशा अर्धदग्ध लोकासारखे नाहींत. ते उत्तम विचार करणारे आहेत म्हणून ग्रामदानाचें कार्य त्याच्या दृष्टीनें अतिशय अनुकूल आहे. आज हि मरावापालेयमच्या

लोकानीं मला सांगितलें कीं आम्ही दोन वर्षे या गोष्टीवर विचार करीत होतों आणि विचार करून च ग्रामदान केलें आहे.

धारापुरम् ( कोयम्बतूर )
११–११–'५६

## अंतःशुद्धि व बाह्य योजना : २८ :

माझ्या स्वागतासाठीं आज सकाळीं एक दिवा ठेवला होता. पण वारा सुटला होता, म्हणून तो रहात नव्हता. शेवटीं मालवला च.

### ज्ञानज्योति स्नेह आणि शांतिरूप वातीवर अवलंबून

हें सर्व स्वागत-साहित्य, पूजेची क्रिया ध्यानासाठीं च असते. तेथें दिव्याची जरूरी नसते, पानाची नाहीं, फुलाची नाहीं, फळाची नाहीं अथवा पाण्याची हि नाहीं. प्रत्येक वस्तुमागें चिंतन असतें. तो दिवा राहिला नाहीं, त्यानें हि माझ्या चिंतनाला मदत झाली. जरी तो जळत राहिला असता तरी हि मला चिंतनास मदत झाली असती. जेव्हां सभोंवतींची हवा शांत असते तेव्हां दिवा शांतपणें जळतो. जर हवा प्रतिकूल असली, जोरात वाहू लागली, तर दिवा टिकत नाहीं. हवा शांत असली पण दिव्यात तेल नसलें तरी हि तो टिकणार नाहीं. जशी दिव्यात तेलाची जरूरी आहे तशी च मनुष्यात भक्ति-भावना पाहिजे. जशी दिवा जळण्यासाठीं बाहेरची हवा शांत असली पाहिजे, तशी च समाजरचना हि शांतिमय पाहिजे. मनुष्याचें हृदय भक्तिरूपी तेलानें ( स्नेहानें ) भरलेलें असेल आणि समाजाची रचना शांतीच्या पायावर उभारलेली असेल तर ज्ञानप्रकाश पसरेल. तेव्हां च व्यक्ति आणि समाजाचें सारें जीवन ज्योतिर्मय होईल.

### दुहेरी प्रयत्न

आज त्या दिव्यात तेल होतें. पण वारा जोरानें वहात होता. पण त्याची काहीं व्यवस्था झाली नाहीं. भारतात पुष्कळसा प्रयत्न अशा प्रकारें च झाला.

मनुष्याच्या हृदयात भक्ति असावी याचा प्रयत्न केला गेला. समाजाची रचना चागली व्हावी या हि बाबतींत प्रयत्न केले गेले. पण आपल्याला पूण यश मिळाले नाहीं. तरी हि मी असे समजतो कीं दुसऱ्या देशाचे तुलनेनें यासाठीं हिंदुस्तानात विशेष प्रयत्न केले गेले. येथें संत लोक झाले आणि त्यानीं लोकाना अंतर्दृष्टीकडे आकर्षित केलें. अशा तऱ्हेनें दुसऱ्या देशाचे तुलनेनें ह्या बाबतींत आम्हाला काहीं समाधान आहे. तरी हि ते प्रयत्न पुरेसे प्रामाणिक असून हि त्यात आम्ही शेवटीं हार खाल्ली. आजच्या स्थितींत आमच्या हृदयातील भक्तीचा झरा पुष्कळसा सुकला आहे परिस्थितीचे विरुद्ध तो भक्तिभाव टिकू शकला नाहीं. समाजरचना हि पुष्कळ च बिघडून गेली. म्हणून नैतिक दृष्टीनें आजच्या स्थितीचा विचार केला तर तो फार च असमाधानकारक वाटेल. आज आम्हाला असा प्रयत्न केला पाहिजे कीं आमचीं सर्व भक्तीरूपी तेलानें भरून राहतील. त्याच्याशिवाय ज्योत प्रकट होणार नाहीं. समाजरचना शातिमय व्हावी म्हणून प्रयत्न करावे लागतील. त्याशिवाय ही ज्योत टिकणार नाहीं. तेलाशिवाय ज्योत टिकणार नाहीं आणि शात हवेशिवाय हि ती टिकणार नाहीं. म्हणून आम्हाला हा दुहेरी प्रयत्न केला पाहिजे. आम्हाला समाज आणि व्यक्ति दोघाचे जीवन चागलें केलें पाहिजे.

### युरोपनें अंतःकरणाकडे लक्ष दिलें नाहीं

युरोपातील लोकानीं समाजरचनेचा पुष्कळ च यत्न केला. पण हिंदुस्तानच्या तुलनेनें ते कमी च आहेत. कारण हिंदुस्तान एक प्राचीन देश आहे आणि येथें प्राचीन कालापासून समाजरचनेचा प्रयत्न केला गेला आहे. क्षत्रिय वर्गाशिवाय कोणीं हि शस्त्र धारण करू नये अशी योजना आम्हीं केली. काहीं लोकानीं सतत ज्ञानार्जन करावें आणि ज्ञान देण्याचें कार्य करीत रहावें असा हि आम्हीं प्रयत्न केला. मनुष्यजीवनात चार आश्रमाची व्यवस्था केली पाहिजे हें हि आम्हीं च सागितलें. आम्हीं शेतीचे कामीं अहिंसेचा उपयोग केला. हिंदुस्तानच्या शेतीचा इतिहास ' अहिंसेचा इतिहास ' आहे. हे सर्व प्रयत्न आम्हीं केले. त्या हिशोबानें युरोपचे प्रयत्न कमी पडतात. तरी हि असें म्हणावें लागते कीं युरोपनें

मानव हृदय तयार करण्याचे जितके प्रयत्न केले त्याच्यापेक्षा अधिक यत्न समाजरचना करण्याकडे केले पण तिथे कोणत्या हि प्रकारची शाति राहिली नाहीं, समाधान राहिलें नाहीं मला युरोप व अमेरिकेची स्थिति भयकर च दिसत आहे त्या ठिकाणचें सर्व जीवन धोक्यात आहे कारण त्याचें ध्यान अत करणाकडे तितकेंसें गेलेलें नाहीं भारत व युरोप दोघाच्या अनुभवानें आम्हाला एका सत्याचें दर्शन होतें कीं अत शुद्धि आणि बाहेरची रचना या दोन्ही गोष्टींकडे पूर्ण लक्ष दिलें पाहिजे सर्वोदयात आमचा हा च प्रयत्न आहे

## हृदय शुद्धीच्या आधारावर समाज रचना

समाजात उच्च–नीच असे पुष्कळ भेद आहेत काहीं लोकाना पुष्कळ पैसे मिळतात तर काहींना कमी, हा भेद सर्व जगभर आहे हे भेद बाहेरच्या योजनेनें हि मिटणार नाहींत किंवा त्याच्याशिवाय हि मिटणार नाहीं, तसें च ते अत शुद्धीशिवाय हि मिटणार नाहींत अत शुद्धीबरोबर बाहेरची योजना हि करावी लागेल तेव्हा च ते भेद मिटतील गावातील लोक स्वत च ग्रामदानासाठीं तयार झाले हें एक हृदय शुद्धीचें मोठें कार्य झालें ग्रामदानाचा आधार घेऊन च ग्रामरचना व ग्रामनिर्माणाची योजना करावी लागते समाजाचें जीवन सामुदायिक करावयाचें असेल तर हें सर्व करावें लागेल आपल्या घरातील लग्नाची काळजी घरातील लोक करणार नाहींत तर सर्व गाववाले लोक करतील आपल्या शेतात काय पेरावयाचें हे प्रत्येक मनुष्य वेगवेगळा ठरवणार नाहीं तर सर्व लोक मिळून च ठरवतील लोक वस्तु वेगवेगळेपणें बाजारात विकत घेतात आणि फसतात असें होऊ नये सर्वांनीं मिळून गावात एक दुकान काढावें गावात भाडण झालें तर हायकोर्टात जाऊ नये गावातील भाडणाचा निकाल गावात च व्हावा गावातील उद्योगधदे सर्वांनीं मिळून च गावात च करावेत अशा प्रकारची ग्राम रचना व ग्राम निर्माण योजना करावी लागते परतु हृदय शुद्धीच्या आधाराशिवाय या गोष्टी टिकू शकणार नाहींत जेव्हा मनुष्य गावासाठीं स्वत आपल्या जमिनीचें दान देतात, तेव्हा त्याची हृदय शुद्धि

टरले. विज्ञानाच्या काळात जे प्रयत्न झाले त्याच्यापुढें ते टिकू शकले नाहींत. आम्हाला ते परत घेतले पाहिजेत. मला वाटतें, या दुहेरी प्रयत्नासाठीं भारताचें वातावरण आता अनुकूल आहे. भारतात आत्मज्ञानाची परंपरा आहे च. सर्वोदय विचारात आम्ही विज्ञानाचा हि भरपूर लाभ घेतों. कारण कीं, सर्वोदयाशिवाय जर विज्ञान वाढेल तर तें व्यक्तीला महत्त्व देईल आणि समाजाला नष्ट करील किंवा स्वार्थी गट याचे हातीं सत्ता राहील. भांडवलवाल्यांनीं विज्ञानाचा भरपूर विस्तार केला. परंतु त्यामुळें लाभ झाला नाहीं. भांडणें च वाढलीं. परंतु हा विज्ञानाचा दोष नाहीं तर विज्ञान थोड्या लोकांचे हातीं राहिलें याचा दोष आहे.

## विज्ञानासाठीं सर्वोदय प्राणवायु आहे

असें म्हणतात कीं इंग्रजीशिवाय विज्ञान चालणार नाहीं. पण विज्ञान श्वासोच्छ्वासासारखें मनुष्याला अवश्य आहे. उद्या जर आम्ही असें म्हणू लागलों कीं मुलाला इंग्रजी आल्याशिवाय मातेचें दूध पाजण्याची योजना होणार नाहीं तर हिंदुस्थानात कोणतें मूल जिवत राहील? जशी मुलाला दुधाबरोबर च मातृभाषा येते तसें च मातृभाषेबरोबर जेव्हा विज्ञान शिकविलें जाईल तेव्हा च ते वाढेल. यामुळें च हिंदुस्थानच्या सर्व जनतेंत विज्ञान पसरण्याला उशीर होत आहे.

परंतु लोकांच्या भाषेंत विज्ञान येण्यानें हि तें पसरेल असें नाहीं. विज्ञान लोकजीवनासाठीं झालें पाहिजे. सर्व जनतेच्या जीवनासाठीं ज्या वस्तूंच्या शोधाची जरूरी आहे त्यात च शास्त्रज्ञांनीं प्रयत्न केला पाहिजे. हिंदुस्थानात इतका मलेरिया आहे. तो कसा दूर होईल यावर विज्ञानानें जोर करावा. भारतीयाचीं उत्पादनाचीं औजारें अतिशय मागासलेलीं आहेत म्हणून लहान लहान चांगलीं औजारें बनवावीत. पण आज विज्ञान लहान लहान औजाराकडे पहात च नाहीं. मोठमोठीं यंत्रें बनवितात आणि तीं थोड्या लोकांच्या हातात जातात. म्हणून जेव्हा विज्ञानाची दृष्टि सर्वोदयाशीं निगडित होईल तेव्हा तें समर्थ होईल. म्हणून विज्ञानासाठीं सर्वोदय हा च प्राणवायु आहे.

आज आम्ही अशा ठिकाणीं आलों आहोंत कीं जेथून आसपासच्या लोकांना भक्तीची प्रेरणा मिळाली आहे. माझा असा दावा आहे कीं मी ज्या कार्यास लागलों आहें तें भक्तिमार्गाचें प्रचार-कार्य आहे. म्हणून अशा गावीं मी येतो कीं जेथून लोकांना भक्तीची प्रेरणा मिळाली आहे. तेव्हा माझ्या मनात विशेष उत्साह वाटतो.

### ईश्वर एक च आहे

हिंदु धर्मात परमेश्वराविषयीं जितका खोल आणि सर्वांगीण विचार झाला आहे तितका कोणत्या हि तत्वज्ञानात आणि धर्मात झाला नाहीं. परमेश्वर एक च असू शकतो आणि एक च आहे याविषयीं सर्व धर्मांचें एकमत आहे. हिंदु धर्माचें हि असें च मत आहे. पण हिंदु धर्मात या बाबतीत आग्रही वृत्ति नाहीं कारण ईश्वर शब्द शक्तीच्या पलीकडे आहे असें वर्णन केलें आहे. 'शोल्लुक कडगावे पराशक्ति' 'शब्दाच्या शक्तींत तुम्ही येणार नाहीं.' ईश्वर चिंतनशक्तीच्या पलीकडे आहे म्हणून समजण्यासाठीं काहीं शब्द-प्रयोग करतात आणि आपल्या चित्तशुद्धीसाठीं काहीं चिंतन हि करतात आपल्या चिंतनातून आम्ही परमेश्वराचें उत्तम वर्णन आणि ग्रहण करू शकतों असें मानत नाहीं तरी सुद्धा आमची चित्तशुद्धि होते हा च लाभ आम्हाला होतो.

हिंदु धर्मात ईश्वराचें विविध रूपात चिंतन केलें आहे यामुळें कधीं कधीं असा भ्रम होतो कीं हिंदु लोक अनेक देवदेवता मानतात. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. परमेश्वराची एकता अत्यंत अद्वितीय आहे. म्हणजे च त्याच्या अद्वितीयतेंत दुसरी कोणती हि वस्तु सहन होऊ शकत नाहीं. हिंदु धर्म हें जाणता आणि असें सांगतो 'एकमेवाद्वितीयम् ।' ईश्वर एक च आहे, दुसरा नाहीं, असे उपनिषदातील शब्द आहेत 'भूतस्य जात पतिरेक आसीत् ।' सर्व सृष्टीचा पति एक च आहे. तो परमेश्वर शब्दातीत आहे.

### चिंतनासाठीं विविध रूपें

म्हणून हिंदुधर्मात अनेक ईश्वराचा विचार नाहीं. परतु चिंतनासाठीं एका च ईश्वराच्या अनेक विभूति आहेत. ते परमेश्वराला करुणारूपात पाहतात. कोणी भिणारा जीव असेल तर त्याच्यासाठीं निर्भयतेच्या स्वरूपात च ईश्वराचें चिंतन आहे. अशा च प्रकारें प्रत्येकाच्या गरजेनुसार चिंतनीय परमेश्वराचें रूप बदलतें. परमेश्वरानें आम्हाला निर्माण केलें हें सत्य आहे आणि आम्हीं त्याला निर्माण करतों हे हि सत्य आहे. त्या परमेश्वराचें आम्ही ग्रहण करतों तो आमच्या दृष्टीने पूर्णावतार आहे. पण तो परिपूर्ण परमात्म्याचा एक विभूति मात्र अशमात्र असतो विद्याप्राप्तीसाठीं प्रयत्न करणाऱ्या मनुष्याला सरस्वती हे च परमेश्वराचें रूप आहे. दुर्बल मनुष्यासाठीं, ज्याला मानसिक आणि शारीरिक शक्ति मिळवायाची आहे, त्याला ईश्वर शक्तिरूप होतो. या रूपाना वेगवेगळीं नावें दिलीं जातात आणि त्या नावानीं भिन्न देवाची कल्पना केली जाते कोणी 'कुमार' होतो, कोणी 'विष्णु', 'भगवान्' व कोणी 'शिव' होतो तर कोणी 'देवी' होते अशा प्रकारें कल्पनेनें परमेश्वराचीं अनेकविध रूपे होतात. त्यात जी एक कल्पना करतात आणि तिच्यात परिपूर्ण ईश्वराचे ध्यान करतात तरी तो ईश्वराचा एक अंश, एक विभूतिरूप मात्रा होतो, तरी हि भक्ताच्या दृष्टीनें तो पूर्ण असतो.

### हिंदु धर्माची समन्वयदृष्टि

आमचें गाव सर्व विश्वाचा एक अंश आहे परतु ग्रामसेवकाला तो पूर्ण वस्तु आहे. त्या गावाच्या सेवेंत तो सर्व जगाची सेवा करू शकतो सर्व जगात ज्ञान आणि सेवेचे जितके विषय असतात ते सर्व एका गावाच्या सेवेंत असू शकतात भगवान् शिव परमेश्वराचा अंश आहे अशा च प्रकारें विष्णु, मुरगन (तामिळमधे कार्तिकेय याचें नाव) इ० परमात्म्याचे एकेक अंश आहेत. तरी हि विष्णूचा उपासक विष्णूला एक अंश मानात नाहीं त्यात च परिपूर्णतेची कल्पना करतो शिवाचा उपासक हि शिवाला एक अंश न मानता त्यात परिपूर्णत्वाची कल्पना करतो. विष्णूचा उपासक असें वर्णन करतो– 'आमच्या भगवान् विष्णूनें परिपूर्ण ज्ञान शिवाला हि

झाले नाहीं.' शिवाचा उपासक म्हणतो, 'भगवान् शिवाचे पूर्ण ज्ञान भगवान् विष्णूला हि नाहीं.' यात विरोध अथवा भांडण नाहीं. जो ज्या रूपात ईश्वराची उपासना करतो, तो त्या रूपात त्याला परिपूर्णतेचा आधार मानतो. तो ईश्वराच्या दुसऱ्या रूपाचा निषेध करीत नाहीं पण आपल्या ध्यानासाठीं एक रूप घेतो. अशा तऱ्हेनें एका हिंदु धर्मात अनेकविध उपासना चालू आहेत. पण या साऱ्या उपासना अनेकविध देवाच्या नाहींत तर एका च देवाच्या मानल्या गेल्या आहेत. ते त्यातील एका अंशाला परिपूर्ण मानून त्याची उपासना करतात तर कधीं कधीं ईश्वराच्या अनेक अंशाचा योग हि करतात कधीं ते पंचायतन पूजा करतात. शंकर, विष्णु, गणपति, शक्ति, सूर्य इ०ची पंचभक्ति करतात. तरी हि ते पंचायतनाला पाच ईश्वर मानीत नाहींत, एक च ईश्वर मानतात. पण त्याच्या पाच विभूतींचें एकत्र ध्यान करू इच्छितात.

असें प्रत्येकजण करू शकतो. मनुष्य सकाळीं उठून वेदाध्ययन करू शकतो. त्या वेळीं तो ईश्वराला सरस्वतीच्या स्वरूपात पाहतो. तो च मनुष्य शेतात काम करावयास जाईल तर त्या वेळीं ईश्वराचें लक्ष्मी रूपात ध्यान करील नंतर घरीं येऊन मुलाची सेवा करतो, तेव्हा ईश्वराचें मातृरूपात उपासना करतो. अशा च रीतीनें जसा एक च मनुष्य शरीरबलासाठीं, बुद्धि वाढविण्यासाठीं, लक्ष्मी वाढविण्यासाठीं, अनेक कामें करतो, अनेक उद्योग करतो, तसें च एक च मनुष्य अनेक गुणाची उपासना करू शकतो. एक च विद्यार्थी आखाड्यात जाउन जोर बैठकानीं शक्तीची उपासना करील व शाळेत जाऊन विद्येची उपासना करील तर आम्ही दोन दोन उपासना करतो असें म्हणत नाहीं. कारण मनुष्याला दोन्हींची गरज आहे. अशा च तऱ्हेनें दोन दोन, चार चार विभूतींचें एकत्र ध्यान, चिंतन व उपासना होऊ शकते. परंतु याचा अर्थ असा करता कामा नये कीं, तो मनुष्य दोन चार ईश्वर मानतो.

पुष्कळ लोकाची हिंदु धर्माचे बाबतींत गैरसमजूत आहे. ते समजतात कीं, हिंदु धर्मात देवाचा बाजार भरला आहे. हा देवाचा बाजार नव्हे तर ईश्वराच्या अनेकविध गुणाची, विभूतींचा संग्रह करण्याची वृत्ति आहे.

म्हणून वेदानीं सांगितलें होतें कीं, 'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति।' सत्य एक च आहे, परंतु उपासक एका च सत्याची अनेक प्रकारें उपासना करतात. याप्रमाणें दुसरे धर्मानुयायी हि विचार करतील तर त्यांना कळेल कीं, यांत कांहीं विरोध नाहीं.

**षण्मुखम् : समाज देवता**

तुमचा हा पलनी स्वामी ( कार्तिकेय ) कोण आहे ? तो सर्व जनतेचा देव आहे. परमेश्वराचा एक अंश जनतारूपांत प्रकट झाला आहे. त्यांचा हा देव आहे. आपण पाहतां कीं, त्याला सहा मस्तकें आहेत. सहा मस्तकांची ही कल्पना एक विशेष कल्पना आहे. प्रत्येक कुटुंबांत साधारणतः पांच माणसें असतात. प्रत्येक कुटुंब म्हणजे एक पंचायतन. सर्व हिंदुस्थानांत लहान मोठीं कुटुंबें आहेत. पण प्रत्येक घरीं बहुधा पांच माणसें असतात. ते पांच एका विचारानें काम करतात तेव्हां कुटुंबांत प्रेम नांदतें व त्याची उन्नति होते. पांच मनुष्यांचीं पांच डोकीं असावीत पण हृदय एक च असलें पाहिजे. म्हणून कुटुंब देवतेचें जर चित्र काढावयाचें असेल तर त्याला पांच शिरें असतील, पण हृदयांत भावना एक च असेल. यासाठीं च आपला हा देव कुटुंब देवता नाहीं, तो षण्मुखम् आहे. म्हणजे तो समाजाची देवता आहे. आपल्या कुटुंबांत पांच माणसें असतात च, पण आणखी एक समाजाचा म्हणून एक सहावा प्रतिनिधि मिळवून समाजदेवता बनली

**सहावा हिस्सा दान कां ?**

मी सर्व कुटुंबांकडून सहावा हिस्सा दान मागतों मग तो श्रीमंत असो, गरीब असो वा मध्यमवर्गीय असो जितके परिवार आहेत तितकीं दानपत्रें मला हवींत समजा कीं आम्हीं प्रत्येकाकडून सर्वच्या सर्व घेतलें. हिंदुस्ताना तील सर्व कुटुंबांनीं आपलें सर्वस्व दान म्हणून दिलें, तर तें सर्व घेऊन आम्ही काय करणार ? तें आम्ही कोणाला देणार ? एक हिस्सा ठेवून ५ हिस्सा त्या कुटुंबांना परत करावा लागेल उरलेला एक हिस्सा आम्हीं समाजांतील दुःखी लोकांना देऊं अशा प्रकारचे दुःखी व अनाथ लोक जगभर असतात जगांत सुख व दुःख दोन्हीं असतात किंनी हि साम्ययोगी समाज असला तरी हि प्रत्येकाची शक्ति व

बुद्धि अगदीं समान असणार नाहींत. म्हणून दुर्बल, अज्ञानी व दुःखी लोकांचे रक्षण करण्याची जबाबदारी दुसऱ्यावर पडणार. म्हणून पाच मनुष्याच्या परिवारातून या एका मनुष्यासाठीं आम्ही दान मागू. म्हणून आम्ही सहावा हिस्सा मागतों.

तीच गोष्ट आपले पलनी स्वामी सागतात. तो जनतेचा देव आहे. तो सहा मस्तकात सर्व जनता एकत्र करतो. जशीं त्याचीं सर्व मस्तकें एकत्र जोडलेलीं आहेत तसा च सारा समाज एकत्र निगडित राहिला पाहिजे. ज्याप्रमाणें आपले 'आरुमुगम् आण्डवन्' (षण्मुखी भगवान्) सहा दिशांनीं एका दिशेला च पहातात त्या प्रमाणें सर्वांनीं मिळून एक च विचार केला तर समाजाची उन्नति होईल. म्हणून मला आशा वाटत होती कीं पलनी आण्डवन् (कार्तिकेय) च्या कृपेनें येथें पुष्कळ ग्रामदान झालें पाहिजे ग्रामदान म्हणजे च आपलें व्यक्तिगत असें काहीं हि न ठेवणें आणि सर्व समाजाला देऊन टाकणें. समाजात आम्ही येतों च. आम्ही समाजाची काळजी करू तर समाज आमची काळजी करील. नद्या आपलें सर्व पाणी समुद्राला देतात व समुद्र नद्या भरून टाकतो. समुद्राचें पाणी वाफ बनतें त्यामुळें पाऊस पडतो आणि त्यानें नद्या भरतात. नद्या ज्याप्रमाणें आपणा स्वत जवळ पाणी ठेवण्याची काळजी करीत नाहींत, समुद्र भरण्याची काळजी करतात, तसें च व्यक्तीनें आपली काहीं चिंता न करता सर्व काहीं समाजाला अर्पण केलें पाहिजे. प्रत्येक व्यक्तीला समाजाची काळजी पाहिजे. याचें च नाव 'भगवत् अर्पण' वा 'कृष्णार्पण'. आम्हीं ईश्वराला आपलें सर्व काहीं अर्पण करावें आणि नतर ईश्वर जो काहीं भाग आम्हाला देईल तो प्रसाद म्हणून ग्रहण करावा.

### ग्रामदानाचें गाव तीर्थक्षेत्र बनेल

मीं म्हटलें कीं हा भक्तिमार्ग आहे. कारण यात आम्ही आमचें सारें जीवन समाजाला अर्पण करून समाजाकडून जें काहीं मिळेल तें प्रसाद-रूप मानून सेवन करतो आमचें सर्वच्या सर्व जीवन परमेश्वर-भक्तिरूप होतें. ज्या गावाचें ग्रामदान होईल त्याना पलनी तीर्थक्षेत्राचें रूप येईल. ते *'पलनी कोविल' (कार्तिकेय देवाचें मंदिर) समजलें जाईल.* तेथें दुसऱ्या

मंदिराची जरूरी रहाणार नाहीं, सर्व सहा मस्तकें एकत्र होतील आणि तेथ 'आरुमुखम् आण्डवना 'चें दर्शन होईल.

पलनी (मदुरा)
१६-११-'५६

## सुशासनाच्या विरुद्ध आवाज

: ३० :

आज जगात दोन प्रकारच्या संस्था पुष्कळ शक्तिशाली झाल्या आहेत. (१) धर्मसंस्था आणि (२) शासनसंस्था. दोन्ही संस्था लोकसेवेच्या विचाराने च बनविल्या गेल्या. समाजाला दोन्ही संस्थाची गरज भासली आणि तो आज हि ह्याचा उपयोग करीत आहे. जेव्हा ह्या दोन्ही संस्था निर्माण झाल्या तेव्हा समाजाला त्याची जरूरी भासली. म्हणून तेव्हा ह्याचा उपयोग हि झाला.

### धर्मसंस्था आणि शासन संस्था यांपासून मुक्त होण्याची गरज आहे

आज अशी स्थिति झाली आहे कीं, या दोन्हींपासून सुटका करून घेण्याची समाजाला जरूरी आहे. धर्मापासून सुटका करून घेण्याची गरज आहे असें मी म्हणत नाही, पण धर्मसंस्थेपासून सुटका करून घेण्याची जरूरी आहे असें म्हणता. लोकाची काहीं व्यवस्था समाजसेवेची योजना नसावी असे हि मी म्हणत नाहीं, परंतु असें सांगतों कीं, सेवेच्या नावाखालीं जें राज्य शासन चालू आहे त्यापासून सुटका होणें जरूर आहे. मी जितका विचार करतों तितका माझा विश्वास वाढतो कीं, या दोन्ही संस्था चांगल्या उद्देशाने सुरू झाल्या आणि आता त्या उद्देशाची पूर्ति झाली. म्हणून आता त्या चालू रहाण्यात लाभाऐवजीं नुकसान च होईल.

### धर्माचा जीवनावर प्रभाव नाहीं

आज जगात धर्मांची काय स्थिति आहे? ख्रिश्चन धर्म, इस्लाम धर्म, हिंदु धर्म व बौद्ध धर्म काय करीत आहत? मीं चार मोठ्या धर्मांचीं नाव

घेतलीं. याशिवाय दुसरे लहान लहान हि धर्म आहेत. या सर्व धर्मवाल्यानीं आपआपल्या संस्था बनविल्या आहेत. युरोपात पोप काम करीत आहे आणि चर्चची चागली मजबूत रचना झाली आहे. जसा जिल्ह्याकरिता एक एक जिल्हाधिकारी असतो तसा च तिकडे प्रत्येक जिल्ह्याच्या चर्चसाठीं एकेक अधिकारी आहे. अशा च प्रकारची रचना इस्लाममध्ये हि आहे ठिकठिकाणीं त्यांच्या मशिदी आहेत. तेथें मुल्ला असतात. त्यांच्यातर्फे धर्म प्रचाराची योजना होते. काहीं उत्सव हि होतात. हिंदु धर्मांत हि असें चालतें मदिरामार्फत हे कार्य होतें. हीच स्थिति बौद्धाची आहे. हे सर्व धर्म अहिंसा, शाति, प्रेम इ० मानणारे आहेत. तरी हि आपण पहातो कीं जगात शाति स्थापण्याच्या कामीं या संस्थाचा काहीं प्रभाव पडत नाहीं. एखादा देश दुसऱ्या देशावर स्वारी करताना हें ठीक आहे किंवा नाहीं असें पोपला विचारीत नाहीं तो देश समजतो कीं पोपचा अधिकार वेगळा आणि आमचा अधिकार वेगळा. आपल्या व्यवहारात ते धर्माचा काहीं हि प्रभाव मानत नाहींत. इतकें च नव्हे तर लढाया चालू असता आपल्या पक्षाच्या विजयासाठीं चर्चमधें प्रार्थना हि चालतात. समाजाच्या व्यवहारात या संस्थाचा काहीं विशेष प्रभाव नाहीं. इतकें असतें तरी बरें, पण समाजावर त्याचा फार वाईट परिणाम होत आहे.

## श्रद्धावान् लोकानीं धर्म नाहींसा केला

श्रद्धावान् लोकावर या संस्थाचा वाईट परिणाम होत आहे. त्यानीं असं मान्य केलें आहे कीं धर्माचें जें कार्य आहे तें पूर्ण करण्याची जबाबदारी आम्हीं त्याना या कार्यासाठीं निवडलें आहे त्या पुरोहिताची आहे. धर्मासाठीं आम्हाला काहीं हि करावयाचें नाहीं. ते समजतात कीं पल्नीमधें एक सुदर मदिर बाधलें गेलें आहे. त्यासाठीं थोडी जमीन, संपत्ति इ० दिलें आहे. पूजा अर्चेची व्यवस्था ठीक केली आहे मग आमचें धर्मकार्य संपलें. येथें कार्तिकस्वामीचा मोठा उत्सव होईल लोक मदिरात दर्शनासाठीं जातील. देवापुढें दक्षिणा ठेवावयाची असेल तर ती ठेवतील हि, पण धर्मासाठीं आम्हाला हि काहीं करावें लागतें हा विचार श्रद्धावानानीं सोडून दिला आहे. जे श्रद्धावान् नाहींत ते पुरोहिताना विचारीत नाहींत व धर्माला हि विचारीत

नाहींत. पण जे श्रद्धावान् आहेत ते धर्माची, धर्म प्रचाराची, आचाराची व चिंतन मननाची जबाबदारी गुरुजन व पुरोहित यांचेवर सोंपवतात आणि आपल्याला त्यापासून मुक्त समजतात मग त्या गुरूनीं भस्म लावायलो सांगितलें तर त्याची आज्ञा शिरसावन्द्य समजून भस्म लावतात आणि आपलें धर्मकार्य समाप्त झालें असें समजतात.

जे श्रद्धावान् नाहींत त्यांना श्रद्धा च नाहीं, पण ज्याची श्रद्धा आहे ती श्रद्धा च निर्वीर्य झाली आहे. एक व्यापारी आहे त्यानें व्यापार करण्यासाठीं एक मुनीम ठेवला आहे. सर्व कार्य मुनीम च करतो आणि स्वत: नालायक होऊन कांहीं हि करीत नाहीं त्याने घरीं पूजा करण्यासाठीं एक ब्राह्मण ठेवला आहे. घरीं 'पल्नी आडवन्' (कार्तिकेय भगवान्) यांची मूर्ति आहे त्या मूर्तिपूजेचें सर्व पुण्य त्याला च मिळतें. यात्रेसाठीं त्यानें ब्राह्मण पाठविला आणि त्याचा सर्व खर्च स्वत च केला. ब्राह्मणाला फिरण्याचा व्यायाम झाला आणि त्या व्यापाऱ्याला यात्रेचें पुण्य मिळालें सारांश, जे श्रद्धाहीन आहेत त्यांनीं धर्म संपुष्टात आणला याबद्दल माझी तक्रार नाहीं, परंतु माझी मोठी तक्रार ही च आहे कीं जे श्रद्धावान् आहेत त्यांनीं हि धर्मकार्य थोड्या च लोकांचे हातीं सोंपवून आपल्याला त्यापासून मुक्त केलें आणि धर्माचा अंत केला.

### धर्म पुजाऱ्यावर सोंपविला गेला

मी एक उदाहरण देतों. हिंदु धर्मांत वानप्रस्थाश्रम ही एक मोठी गोष्ट आहे. शास्त्रानीं सांगितलें आहे कीं मनुष्यानें आपली विषय वासना मर्यादित ठेवली पाहिजे जसा तो सस्कारपूर्वक गृहस्थ झाला तसें च त्याला एका विशिष्ट अवधीनंतर सस्कारपूर्वक गृहस्थाश्रमांतून मुक्त हि झालें पाहिजे. हिंदु धर्माची ही विशेष गोष्ट मानली जाईल शास्त्रग्रंथात याच्या माहात्म्याचें पुष्कळ वर्णन आलें आहे. पण आज त्याची अमलबजावणी होत नाहीं. श्रद्धावान् हिंदु या बाबतींत काळजी करीत नाहींत त्यांनीं ती सर्व काळजी पुरोहितावर सोंपवली आहे

### श्रद्धावान् लोकांची 'गोपाल विद्री'

आज सकाळीं च आम्ही पल्नीस्वामींच्या दर्शनार्थ डोंगरावर गेलो

होतों. लोकांनीं रस्त्यात पायऱ्या व मंडप बांधले आहेत. एवढ्याने आपलें कर्तव्य पूर्ण झालें असें त्यांना वाटतें डोंगरावर एका गिरणीवाल्यानें एक मंडप बांधला आहे व मोठ्या अक्षरात त्यावर गिरणीचें नाव लिहिलें आहे. जशीं धर्मवचनें आणि पलनीस्वामींचें नाव लिहिलें गेलें आहे तसे च पायऱ्या इत्यादि बनविणारे, गिरणीवाले इत्यादींचीं नावें हि लिहिलीं आहेत लोक समजतात कीं आम्हीं मंदिर बांधलें आणि तेथे परमेश्वराच्या सेवेंत आपलें नाव हि अर्पण करून टाकलें किती धर्महीन कार्य आहे हें ! लोकांना येवढी साधी अक्कल हि नाहीं. ते समजतात कीं आम्ही मंडप, पायऱ्या बांधल्या; आता आमचें कर्तव्य संपलें. वानप्रस्थाश्रमाच्या स्थापनेची काळजी मंदिराचा पुजारी करील आम्हीं एकदा धारापुरम् गावीं फिरत असता एका घरावर एक तामीळ जाहिरात पाहिली. तेथें एक सुंदर चित्र होतें. बाळकृष्ण मुरली वाजवत होते आणि खालीं लिहिलें होतें, 'गोपाल बिडी'. हें सर्व कोण थांबविणार ? हें काय धर्मकार्य आहे ? पण कोणी हि श्रद्धावान् हिंदु यावर विचार करणार नाहीं. तो या बाबतींत आपली जबाबदारी नाहीं असें समजतो. इतक्या मोठ्या अक्षरात परमेश्वराच्या नावाबरोबर बिडीची जाहिरात दिली जावी आणि कोणाला हि थोडें दुःख होऊ नये ! गिरणीवाल्यानीं डोंगरावर मंडप बनविला हें चांगलें केलें पण त्यासाठीं गिरणीचें नाव मोठ्या अक्षरात लिहिण्याची काय गरज होती ? तेथे जाऊन आम्ही पलनी-स्वामींचें स्मरण करू कीं गिरणीवाल्याचें ? अशा तऱ्हेनें श्रद्धावान् लोकांनीं सर्व धर्मांची हानि केली आहे

### आस्तिकांच्या विरुद्ध आवाज

तामीळनाडमध्यें प्रवेश करता च लोकांनीं मला सांगितलें होतें कीं,' बाबा, येथें पुष्कळ नास्तिकता आहे तुम्ही त्याच्याविरुद्ध बोलावें.' परंतु मी आस्तिकांच्या विरुद्ध बोलत आहे. मी म्हणालों, 'नास्तिकांच्या विरुद्ध बोलण्याची मला काय गरज ? मी नास्तिक नाहीं. आस्तिक आहें. म्हणून आस्तिक लोक जें पाप करीत आहेत त्याच्याविरुद्ध बोलण्याचा मला अधिकार आहे. नास्तिकांचे बाप आस्तिक आहेत त्याबाबत माझ्या मनात थोडा हि संदेह नाहीं. त्यांनीं च नास्तिकांना निर्माण केलें. जर आम्ही खरेखुरे आस्तिक असतों तर

आमच्या जीवनाचा प्रकाश चोहींकडे पसरला असता आणि कोणी नास्तिक झाला नसता. धर्माच्या ज्या संस्था बनविल्या गेल्या त्याचा हा परिणाम आहे. मठसंस्था, मंदिर इत्यादींच्या द्वारें जगामध्यें धर्मप्रचार होईल अशी आशा होती ह्याच्या द्वारा कांहीं च काम झालें नाहीं असें मी म्हणत नाहीं, कांहीं थोडें काम झालें परंतु तें फार च लहान आहे आणि तें काम लहान नसून मोठें असतें तरी सुद्धा धर्माची जबाबदारी आम्ही कांहीं थोड्या लोकां वर टाकतों हा त्यावर माझा आक्षेप राहणार च.

समजा, मीं झोंपण्याची जबाबदारी एखाद्या मनुष्यावर सोंपविली आणि त्याला त्याबद्दल पगार हि दिला तो दहा दहा तास झोंपीं गेला आणि त्यानं आपली जबाबदारी चांगल्या तऱ्हेनें पार पाडली, तर मग मला झोंप न येऊन चालेल काय? त्याच्यावर झोंपण्याची जबाबदारी टाकल्यानें मला काय फायदा होईल? ज्याप्रमाणें माझी झोंप मला च घेतली पाहिजे, त्याची जबाबदारी मी दुसऱ्यावर टाकूं शकत नाहीं, किंवा ज्याप्रमाणें आपलें खाणें आपण स्वतः च खाल्लें पाहिजे, त्याची जबाबदारी दुसऱ्यावर टाकतां येत नाहीं, त्या च प्रमाणें माझ्या धर्मकार्याची जबाबदारी माझ्यावर च आहे ती मी दुसऱ्यावर सोंपवूं शकत नाहीं धर्माची जबाबदारी आपण ज्यांच्यावर सोंपविली, त्यांनीं ती चांगल्या प्रकारें पार पाडली नाहीं ही माझी पहिली तक्रार आहे परंतु त्यांनीं ती उत्तम प्रकारें पार पाडली असती तरी ही गोष्ट च चुकीची आहे ही माझी दुसरी तक्रार आहे

### सेवेची जबाबदारी थोड्या प्रतिनिधींवर

जी परिस्थिति धर्मसंस्थेची आहे, ती च स्थिति राज्य आणि समाज सेवेच्या बाबतींत आहे. आम्ही थोड्या लोकांना निवडून देतों आणि ते आमचे प्रतिनिधी या नात्यानें समाजसेवेचें सर्व काम करतात. त्याच्या हाताखालीं नोकरवर्ग असतो त्या निवडून दिलेल्या लोकांवर आम्हीं राज्य आणि सेवेची जबाबदारी सोंपविली आहे. मदुरा जिल्ह्याची सेवा करण्याची जबाबदारी येथील जिल्हाधिकारी व निवडलेल्या प्रतिनिधींची आहे आतां आम्हाला त्याबाबत कांहीं करावयाचें नाहीं असें येथील लोक समजतात. जर धर्म कार्य पुजारी लोकांवर आणि समाजसेवेचें कार्य निवड-

लेल्या प्रतिनिधींवर सोंपविलें तर आपण आपल्यावर कोणती जबाबदारी घेतली ? आपण म्हणाल कीं खाणें-पिणें व झोंपणे ही जबाबदारी आम्हीं घेतली आहे. परतु तुम्हीं अशा काहीं गोष्टींची जबाबदारी दुसऱ्यावर सोंपविली त्यामुळे तुम्ही चागल्या प्रकारें खाऊ पिऊ हि शकत नाहीं. तुम्हीं ज्याच्यावर काम सोंपविलें ते चागल्या तऱ्हेनें काम करत नाहींत म्हणून तक्रार होते. पण ते चागल्या प्रकारें काम करतील तरी सुद्धा त्यावर माझा आक्षेप आहे. जे लोक आपलें राज्य आणि सेवा भार थोड्या लोकावर सोंपवितील, धर्म आणि चिंतनाची जबाबदारी थोड्या लोकावर सोंपवितील, ते अगदीं निष्क्रिय होतील. त्याच्या जीवनामध्यें प्राण तत्त्व रहाणार नाहीं. लोक अजून हे जाणत नाहींत. उलट बाबाला विचारतात कीं तुम्ही गावो-गाव का हिंडता ? जमीन मिळविण्याचा आणि वाटण्याचा त्रास का घेता ? सरकारद्वारा हे काम का करुन घेत नाहीं ? लोकांचा हा प्रश्न योग्य आहे. ते म्हणतात कीं आम्हीं सेवा करण्यासाठीं नोकर ठेवले आहेत तर तुम्ही का त्रास घेता ? तुम्हास जमीन पाहिजे तर आम्ही १-२ एकर जमीन देऊ, त्यात शेती करा आणि मजेनें खा प्या. लाखो एकर जमीन मिळविण्यासाठीं का हिंडता ? म्हणजे लोक स्वत सार्वजनिक सेवेच्या कार्यांची जबाबदारी समजत नाहींत, परतु बाबा काम करत आहे, तर त्याला विचारतात कीं हें निष्कारण काम का करता ?

## इंग्लंडचें उदाहरण

ही हिंदुस्थानच्या च समाजाची स्थिति आहे अशी गोष्ट नाहीं. जगातील सर्व समाजामध्यें कमीजास्त प्रमाणात ही च स्थिति आहे. इग्लड व त्याचें पार्लमेंट लोकशाहीचा उत्तम नमुना म्हणून मानलें जातें परतु तेथील लोकानीं ज्याच्या हातात अधिकार दिले, त्यानीं हल्लीं हल्लीं इजिप्तवर हल्ला केला. ही मोठी गौरवाची गोष्ट आहे कीं इग्लडच्या लोकानीं त्या आक्रमणाला विरोध दर्शविला. तरी सुद्धा ते थाबवू शकले नाहींत. इतकी उत्तम लोकशाही चालविणारे हि कमजोर ठरले. पुढें जेव्हा निवडणुका होतील तेव्हा ते आपला प्रभाव दाखवतील ही वेगळी गोष्ट आहे, पण आता जें वाईट काम झालें, होत आहे व होईल, तें थाबवण्यासाठीं आवाज उठवला

तरी हि त्याचें कांहीं चाललें नाहीं. सर्व जगानें या आक्रमणाविरुद्ध आपला आवाज उठविला. 'यूनो 'त प्रस्ताव हि मांडला गेला. म्हणून शेवटीं त्याना आक्रमण थांबवावें लागलें.

जेव्हा आपण आपल्या राज्यशासनाचा भार थोड्या च लोकांवर सोंपवतों तेव्हा ही च अवस्था होते. रशिया, इंग्लंड, चीन, अमेरिका प्रत्येक देशाची ही च स्थिति आहे. त्यानीं आपला कारभार थोड्या लोकांचे हातीं सोंपवला आहे व त्यांचें अनुसरण इतरांना करावें लागत आहे. थोड्याबहुत प्रमाणात सर्व जगाची ही च स्थिति आहे. पण हिंदुस्थानची विशेष आहे. कारण येथील जनतेंत इंग्लंड इत्यादि देशांतील लोकांप्रमाणें जागृति झाली नाहीं. आम्ही आपला धर्म व व्यवस्थेचें काम थोड्या च लोकांचे हातीं सोंपविलें आहे दोन्हींमुळें आम्ही पुरुषार्थहीन झालों आहोत. सर्वोदय समाज प्रत्येक व्यक्तीला असें सांगतो कीं आपल्या शासनाची व्यवस्था तुम्ही स्वत च करा, आपल्या धर्माचें आचरण तुम्हीं च करा.

## सुशासनात च अधिक धोका

आज मी जेव्हा डोंगरावरील मंदिरात जात होतों तेव्हा रस्त्यात मनात जे विचार आले ते आपणासमोर मांडले मला आनंद वाटलो कीं अशीं स्थानें बनलीं आहेत म्हणून लोकात कांहीं ना कांहीं श्रद्धा उत्पन्न झाली आहे. या लोकांनीं जीं चांगलीं कामें केलीं त्याची मी कदर करतों. जर आम्हीं त्या कामाच्या संस्था बनवून हीं कामें थोड्या च लोकांचे हातीं सोंपवलीं नसतीं तर यापेक्षा फार चांगलें काम झालें असतें आमचें सरकार सुद्धा कांहीं चांगलीं कामें करतें व कांहीं वाईट जुन्या राजानीं हि कांहीं चांगलीं व कांहीं वाईट कामें केलीं. जीं बुरीचीं कामें जुन्या राजानीं केलीं व आजचें सरकार करीत आहे त्या बाबतींत मला कांहीं तक्रार करावयाची नाहीं जीं बुरीचीं कामें आहेत तीं व त्याचे परिणाम जगभर जाहीर होतात पण जगाचें भलें करण्याची जबाबदारी थोड्या लोकांवर सोंपविली गेली आणि ते भलें करतील असें आम्हाला वाटतें, ही च चिंता करण्याची गोष्ट आहे.

राज्यसंस्था कधीं कधीं चांगलीं कामें करते. पण त्या चांगल्या कामाचा

समाजाच्या मनावर वेगळा च परिणाम होतो. ही च माझी मुख्य तक्रार आहे पुढच्या वर्षी निवडणुका होतील तेव्हा हे लोक आपलेपाशीं मतें मागण्यासाठीं येतील आणि म्हणतील कीं, आम्ही इतकीं इतकीं चांगलीं कामें केलीं आहेत. जर त्यांनी खरोखरीं च चांगलीं कामें केलीं असतील तर लोक त्यांच्या उपकाराच्या ओझ्याखालीं दबून जातील. याचे च मला दुःख आहे. कांहीं लोकांनीं उपकार करावे आणि बाकी सर्व लोकांनीं त्यांच्या खालीं दबून जावें हें च चुकीचे आहे. लहान मुलाची जबाबदारी माता पित्यावर असावी हें ठीक आहे परंतु दहा दहा हजार वर्षांच्या संस्थाचे नंतर आम्ही मुलासारखें च रहावें काय ? आम्हीं समजलें पाहिजे कीं विज्ञान इतकें पसरलें आहे आणि हजारों वर्षांची ज्ञानपरंपरा चालत आली आहे, अशा वेळीं प्रत्येक मनुष्यानें आपआपल्या ज्ञानाचा आणि आपआपल्या धर्माचा कारभार आपल्या च हातीं घ्यावा हें चांगले

लोक मला विचारतात कीं सरकार चुकीचे काम करतें तेव्हा तुम्ही त्यांच्याविरुद्ध जोरानें का बोलत नाहीं ? मी त्याविरुद्ध जोरानें बोलत नाहीं कधीं कधीं योग्य वेळीं बोलतों. परंतु पाहतों कीं सरकार कांहीं चांगलें काम करीत आहे असें जेव्हा मला दिसतें तेव्हा च मी सरकारविरुद्ध बोलतों. सरकारच्या चुकीच्या कामाविरुद्ध आवाज उठवण्यासाठीं माझी जरुरी नाहीं. परंतु त्यांच्या चांगल्या कामाविरुद्ध आवाज उठवण्यासाठीं माझी जरुरी आहे. लोकांना हें सांगण्याची जरुरी आहे कीं तुम्ही शेळ्या बनत आहात. तुम्ही शेळया होऊन ' मेंढपाळानें छान व्यवस्था केली ' असें बोलूं लागला तर ती काय आनंद होण्याची गोष्ट आहे ? त्यावर मी काय बोलूं ? मला असें वाटतें कीं जेव्हा मेंढपाळ चांगलें काम करीत नाहींत तेव्हा निदान मेंढरांना तरी समजतें कीं आपण मेंढरें बनत आहोंत त्यांना आपल्या स्थितीची जाणीव होते आणि ते समजूं लागतात कीं आम्ही मेंढरें नाहींत, मनुष्य आहोंत आम्हीं आपला कारभार आपल्या हातीं च का ठेवूं नये ? म्हणून माझा आवाज सुशासनाच्या विरुद्ध उठतो दुःशासनाच्या विरुद्ध तर महाभारतात व्यासांनीं च आवाज उठवला. लोक जाणतात कीं वाईट राज्यशासन होता कामा नये. वाईट राज्यशासन

देशात कापसाचें चागले पीक झाले असो, तरी हि कापसाच्या किंमतीवर आपला कोणता च प्रभाव पडत नाहीं. अमेरिकेच्या कापसाच्या किंमतीवर येथील कापसाचा किंमत ठरेल आणि त्याच्या प्रमाणात आपल्या येथील शेतकऱ्याना किंमत मिळेल.

### अस्मानी सुलतानींपासून वांचण्याचे तीन उपाय

एक तर आमच्यावर आकाशाचा प्रभाव आहे आणि दुसरा हा सुलतानी बाजारभावाचा प्रभाव. पाऊस पडला नाहीं, कापसाचें पीक चागलें आलें नाहीं, तर शेतकऱ्याचे नुकसान होईल. पाऊस पडला, कापसाचें पीक चागलें आले परंतु किंमती घसरल्या तरी हि त्याचें नुकसान होईल. अशा प्रकारे आज आमचा शेतकरी अत्यंत पंगू झाला आहे. या दोन सत्तापासून त्याला वाचवावयाचें आहे. आकाशातील सत्तेपासून वाचण्याचे तीन उपाय आहेत. आम्हीं पाण्याची व्यवस्था केली पाहिजे. एखाद्या वर्षी पाऊस कमी पडला म्हणून आमची शेती गेली असे होता कामा नये. दुसरा उपाय, आपल्या गावात दोन वर्षाचें धान्य शिल्लक ठेवणे. पुढच्या वर्षी चागले पीक आल्यानतर च जुनें धान्य विकू. या वर्षाचें धान्य या च वर्षी संपेल असें होता कामा नये. आणि तिसरा उपाय हा कीं आम्हीं भलेपणाने व्यवहार केला पाहिजे. जर आम्ही भलेपणानें वागू तर परमेश्वर हि वेळेवर योग्य पाऊस पाडील. जर आम्हीं पापाचरण केलें तर पाऊस हि आमच्यावर प्रहार करील. अशा प्रकारें न्याय, नीति, प्रेम आणि धर्मानें चालणें हा तिसरा उपाय आहे. आम्ही जर या तीन गोष्टी करू तर अस्मानी सुलतानी-पासून आवश्य वाचू.

### दुसऱ्या सुलतानीसाठीं स्वावलंबन

बाजारातील किंमतीच्या सुलतानींपासून वाचण्याचा उपाय गावाचें स्वावलंबन हा आहे. मी तुम्हाला एक उदाहरण देतों. १९२० पासून मी खादी वापरू लागलों. १९३६ सालात मीं कापड विकत घेतलें नाहीं; म्हणजे खादीसुद्धा विकत घेतली नाहीं. आश्रमातील शेतात आम्हीं कापूस पेरला, आम्हीं च कातलें आणि आम्हीं च कापड विणलें. आपलें कापड आम्हीं च वापरलं, म्हणून कापडावर आम्हाला एक कवडी हि खर्च करावी

लागली नाहीं. आमचे च शेत होते आणि आमचे च श्रम. कापूस पेरण्या साठीं आदले वर्षीची सरकी च वापरली, म्हणून बाजारात कापडाची किंमत या ३६ वर्षात किती वाढली आणि किती उतरली तें आम्हाला माहीत नाहीं. या ३६ वर्षात एक महायुद्ध झाल. तेव्हा कापडाची किंमत कोठल्याकोठे गेली मध्यतरीं कंट्रोलचा काळ आला त्या वेळीं लोकाना कापड मिळणें मुष्कील झालें होतें, परतु आम्हाला काहीं त्रास झाला नाहीं आम्हाला बाजारच्या किंमतीचा पत्ता च नव्हता. साराश, अशा तऱ्हेने गावोगावच्या लोकानीं आपल्या मुख्य मुख्य गरजाच्या बाबतींत एकत्र येऊन स्वावलबन केले तर ते बाजारच्या किंमतीपासून वाचतील. तरी हि सर्वस्वीं वाचतील अस मी म्हणत नाहीं, कारण रॉकेल तेलासारख्या वस्तु एकदम गावात निर्माण करण कठिण आहे आम्ही आमच्या गावात दिवे मुळीं च बनवू शकत नाहीं अस मुळीं च नाहीं शेणाच्या गॅस प्लँटची व्यवस्था उपयोगात आणून आम्ही प्रकाश तयार करू शकू, आम्ही हें सर्व करू शकू आणि आम्हाला ते केलें हि पाहिजे, पण ते एकदम होणार नाहीं. काहीं वस्तु बाहेरून विकत घ्याव्या लागतील. त्या महाग पडल्या तरी चालतील. त्या वस्तूच्या बाबतींत आम्हाला त्रास होईल. तरी हि रोजच्या मुख्य मुख्य गरजाच्या बाबतींत आपण स्वावलबी होऊ तर आम्ही बाजारभावाच्या सुल्तानीपासून पुष्कळ च वाचू

## पंचायतवाल्यानीं ग्रामराज्यासाठीं प्रयत्न करावे

गावोगावच्या ग्रामपचानीं ' ग्रामराज्य ' बनवल पाहिजे. आपलें गाव स्वतत्र राज्य असावें. गावच्या सर्व लोकानीं मिळूनमिसळून काम करावें. गावाची सर्व शेती गावाच्या मालकीची असावी कोणी उपाशी राहू नये. प्रत्येकाला जमिनीचा तुकडा दिला जावा तो त्या जमिनीचा मालक होऊ नये, तर त्यात पिकवून त्यान खावें. एखाद्याच्या शेतात कमी पीक निघालें तर गावच्या दुसऱ्या लोकानीं त्याला मदत करावी. गावासाठीं काय व किती पेरल जावें याचा निर्णय गावातील लोकानीं मिळून करावा कापड, तेल, गूळ, जोडे इ० वस्तु गावात च तयार कराव्यात. गावातील लोकानीं पुरुषार्थी बनण्यासाठीं शिक्षणाची व्यवस्था असावी. गावातील भाटणाचा

गावात च निकाल व्हावा. गावची व्यवस्था अशी असावी कीं भाडणे च निर्माण होऊ नयेत. तरी हि कोणी मूर्ख भाडू लागला तर गावातील सज्जनानी त्याचा न्याय द्यावा. कोणाच्या हि घरीं लग्न असले तर त्या घराला खर्च पडू नये. गावातील लोकानीं मिळून लग्नखर्च करावा. व्यक्तिगत कर्ज नसावे. गावासाठीं कर्ज घेतले जावे. अशा तन्हेनें गावचें राज्य ग्रामोदय होईल तर गाव निश्चित वाचेल. जर गावोगावीं ग्रामराज्य होईल तर महायुद्ध सुरू झालें तरी आमचीं गावे वाचतील.

## पंचवार्षिक योजना ' विश्वावलंबी ' आहे

महायुद्ध सुरू झाल्यावर आमची पचवार्षिक योजना टिकेल कीं नाहीं या बाबतींत शका आहे. अजून कोणतें हि मोठे युद्ध सुरू झालें नव्हते. फक्त सुएझ कालव्याचा कारभार थाबला. त्याचा हि येथील व्यापारावर परिणाम झाला. हा फक्त अरुणोदय होता, सूर्योदय झालेला च नव्हता. तेव्हा ही स्थिति जेव्हा सूर्यमहाराज वर येतील तेव्हा काय होईल कोण सागणार ? पचवार्षिक योजना ' स्वावलबी ' नाहीं एवढें च नव्हे तर ' विश्वावलबी ' आहे म्हणजे च ती आपल्या स्वत च्या आधारावर तयार केलेली योजना नाहीं. पण आमचा ग्रामदान आणि ग्रामोदयाचा विचार अगदीं स्वतंत्र विचार आहे. विश्वयुद्धानें हि त्यात बाधा येण्याचं कारण नाहीं, उलट त्यामुळें त्याला अधिक च जोर येईल.

पलनी ( मदुरा )
१८–११–'५६

आज लोकांनीं धर्मकार्य आणि सेवाकार्यांची जबाबदारी काहीं थोड्या लोकांवर सोपविली आहे. किंवा असे म्हणा कीं थोड्या लोकांनीं कुशलतेनें सर्व जबाबदारी किंवा अधिकार आपल्या हातीं घेतले आहेत आणि लोकांनीं ते सहन केले आहेत. लोकांनीं त्यांना सत्ता दिली असें म्हणा किंवा त्यांनीं सत्ता घेतली आणि लोक त्यांच्या अधीन झाले असें म्हणा.

## ' सत्तेच्या मार्फत सेवा ' हा भ्रांति-मंत्र आहे

जे झाले आहे त्याच्या मुळाशीं एक श्रद्धा अशी आहे कीं जगांत सत्तेच्या मार्फत लौकर आणि चांगलें काम होतें. म्हणून ' सत्तेमार्फत सेवा ' हा एक मंत्र झाला आहे. याला च मी ' भ्रांति-मंत्र ' म्हणतो. प्रत्येक काळात काहीं ना काहीं भ्रम काम करतात. त्या भ्रमाच्या मुळाशीं काहीं सत्य असतें. ह्या काळात एका विशेष सत्याचें दर्शन झालें आहे ते असें कीं, कोणता हि गुण व्यक्तिगत न राहता सामूहिक बनला पाहिजे. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं अशा प्रकारच्या सत्याचें दर्शन पूर्वींच्या काळीं झाले नव्हतें. दर्शन तर झाले होतें च परतु विज्ञानामुळें त्याचें स्पष्ट दर्शन आजच्या काळात झाले. परतु ह्या सत्य-दर्शनाबरोबर एक छायारूप ' भ्रांति-दर्शन ' पण झालें आहे त्याची काहा आवश्यकता नव्हती, तरी सुद्धा झाले आहे.

गुणाला सामूहिक रूप मिळाले पाहिजे असे आज मानलें जाते. त्याच्या आधारावर सामूहिक जीवन बनलें पाहिजे. त्यासाठीं व्यवस्था झाली पाहिजे, आणि व्यवस्थेसाठीं सत्ता पाहिजे. अशा प्रकारें गुणाच्या प्रतिष्ठेसाठीं गुणाची उणीव आहे; म्हणून सत्तेची आवश्यकता आहे. म्हणून आजच्या लोकशाहींतील पुष्कळशा लोकाच्या विचाराची मजल येथपर्यंत आहे कीं, लोकामध्यें ज्ञानाच्या मार्फत गुण-प्रचार हि झाला पाहिजे आणि त्याला अनुकूल च सरकारचें सत्तेचें रूप असलें पाहिजे; इतकी च फार झालें तर जास्तींत जास्ती लोकाची मजल जाते. केवळ सत्तेनें किंवा गुण प्रचारानें काम होणार नाहीं. गुण-

प्रचारासाठीं दुसरी शक्ति सत्ता जरूर आहे. म्हणून लोकामध्ये प्रथम सत्तेला मान्य करण्याचा गुण असला पाहिजे त्यासाठीं शिस्त ( डिसिप्लीन ) शिकवली जाते. शिक्षण सुद्धा सरकारच्या हातीं दिले जात, कायदे बनवले जातात. अशा तऱ्हेने अनेक प्रकारानीं लोकाना निश्चिष्ट विचाराच्या मागे जाण्यास भाग पाडलें जाते. त्याचा परिणाम असा होतो कीं त्या गुणाच महत्त्व कमी होतें.

## गुणविकासामध्यें सत्ता हानिकारक

मालकी सर्वांची आहे असे लोकानीं समजावे असें मला वाटतें. समाजाला हा गुण समजला पाहिजे. हें समजाविण्यासाठीं कायदा झाला तर चागलें होईल असं मानलें जातें, परतु अशामुळें अगदीं उलट स्थिति होते. कायद्यानें गुणाची वाढ न होता गुणाची शक्ति कमी होते, त्यामुळें गुण यात्रिक आणि निष्क्रिय बनतो. समजा, मालकी सोडण्याचा कायदा जबर-दस्तीनें केला गेला किंवा थोडे लोकाना समजावून व थोडेसे सत्तेच्या मार्फत कार्य केलं गेलें तरी ममत्वभावनेच्या निरसनामुळें समाजात होणारा जादूचा सचार होणार नाहीं.

आज जगातील अनेक विचारक या च मोहात पडले आहेत. ते सागतात कीं आजचा समाज आदर्श समाज नाहीं आणि विनोबा सागतात ती गोष्ट आदर्श समाजाचा आहे, आजच्या समाजाची नाहीं. या आदर्श समाजा-पर्यंत जाउन पोंचण्याला काहीं काल पाहिजे मध्यतरींचा जो काल आहे त्यात सत्तेची गरज आहे. अशा रीतीनें सर्वांना सत्तेचा मोह चिकटला आहे पण मला वाटते कीं, ‘ आमची कोणावर कशा हि प्रकारची सत्ता नसावी ’ हें जोंपर्यत मनुष्याला समजत नाहीं तापर्यंत समाज च बनणार नाहीं. सामाजिक कार्य सत्तेमुळें होतें हा एक भ्रम आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, सत्तेनें समाज बनत नाहीं. माझे विचार तुम्हाला पटोत वा ना पटोत, तरी त्याची सत्ता तुमच्यावर चालावी असं जर मला वाटलें तर मी आग्रवादी होईन, समाज विरोधी होईन. मला जो विचार पटला त्याला च मी प्राधान्य देतों, विचार स्वातंत्र्य स्वत च्या दृष्टीनें आवश्यक मानतों, व लोकाना त्याची आवश्यकता नाहीं असं मानेन तर समाजाचे दोन तुकडे पडतील. जेथें समाजाचे दोन तुकडे होतील तेथें समाज कसा बनणार ?

म्हणून गुणाना सामाजिक बनविण्यात जे अडथळे आहेत ते दूर सारले च पाहिजेत. जेव्हा त्याच्यामध्ये सत्ता येते तेव्हा अडथळे येणार च. ही गोष्ट जरा सूक्ष्म आहे पण ती आम्हीं समजून घेतली पाहिजे.

### गृहस्थाश्रमांत सत्ता

परमेश्वरानें मुलाना आई-बापाचे हाती दिलें आहे. आपण पाहतो कीं, ४-५ वर्षांतच त्या मुलाचे मनात स्वतंत्र विचार येऊ लागतात आणि त्या वेळीं त्याच्या आणि आई-वडिलाच्या विचारात संघर्ष सुरू होतो. अशा वेळीं आईबाप काय करतात ? या बाबतींत जुन्या लोकाचे एक वचन आहे. पण तें किती भ्रान्तिमूलक आहे तें आपण पाहा. गृहस्थाबद्दल सांगितलें गेलें आहे कीं, त्याला सर्व बाबतींत हिंसेचा त्याग केला पाहिजे. पण त्या हि बाबतींत दोन अपवाद आहेत ' अन्यत्र पुत्रात् शिष्याद् वा । ' पुत्र व शिष्य दोघाना सोडून बाकी कोणाची हि ताडना त्यानें करता कामा नये. पुत्र व शिष्य याना शिक्षणासाठीं शिक्षा केली च पाहिजे फक्त गृहस्थाकरिता अहिंसेच्या व्यवस्थेच्या बाबतींत हे अपवादरूप म्हणून सांगितलें गेलें. म्हणून हा केवळ भूतदयामूलक विचार आहे. त्याना वाटतें कीं जर आम्हीं मुलाला शिक्षा केली नाहीं तर ते चुकीच्या मार्गानें जातील. ते आपले हित जाणत नाहींत म्हणून योग्य वेळीं प्रेमाने प्रेरित होऊन शिस्त केली च पाहिजे. येथें मातापित्याना सल्ला देणारानीं हार खाल्ली आणि दंडशक्तीला वरदान दिलें. जो मुलगा आई बापाचे पोटीं आला त्याची काय स्थिति होती ? मनुष्याचे दुसरे गुण त्यात नव्हते, एक च गुण होता व तो म्हणजे श्रद्धा. बाकीचे गुण नंतर येतात. मुलाने श्रद्धेने मातेच्या उदरात जन्म घेतला. तो श्रद्धेने च मातेच्या अंगावरच्या दुधाला आशीर्वादरूप समजतो. या दुधानें माझें पोषण होईल कीं नाहीं याची त्याच्या मनात थोडी हि शंका, तर्क रहात नाहीं पूर्ण श्रद्धेनेच तो हा दुधाचें पान करतो. जरी माता चुकीचा आहार करणारी असली व तिच्या दुधानें त्याचे नुकसान होणार असलें तरी हि त्याच्या श्रद्धेंत उणीव रहात नाहीं. थोडा मोठा झाल्यावर तो समजू लागतो आणि आई सांगते तसें वागतो. आईनें सांगितलें कीं हा चन्द्र आहे, कीं मुलगा तें मान्य करतो. इतका श्रद्धावान् प्राणी आपल्या

हातीं आला असताना त्याला शिक्षा करण्याची वेळ आपणावर यावी ही किती नालायकीची गोष्ट आहे! तरी आम्ही समजतो कीं मुलाला शिक्षा केली तर कांहीं गुण वाढतील. शिक्षा करणे एक दोष आहे, शिक्षा सहन करणें दुसरा दोष आणि शिक्षेच्या भीतीनें आचरणात बदल करणे हा तिसरा दोष इतक्या सर्व दोषांच्या मार्फत गुणप्रचार करण्याचा आम्ही विचार करतो, अशा तऱ्हेने गृहस्थाश्रमात सत्ता चालते.

## विद्यालयें व धर्मसंस्था यांची सत्ता

आज शाळेत हि सत्ता चालते. हल्लीं तक्रार केली जाते कीं 'मुलांत शिस्त नाहीं' पण ते ज्ञानी लोकांचा अनुभव विसरतात. ज्ञानी लोकांनीं म्हटलं आहे कीं 'शिष्यापराधे गुरोर्दण्डः।' विद्यार्थ्यांत शिस्त नसली तर तो शिक्षकाचा दोष आहे, शिक्षणपद्धतीचा दोष आहे, समाज व्यवस्थेचा दोष आहे. आज आम्ही शिस्त हा फार मोठा गुण मानतों आणि बाकीचे सर्व गुण गौण समजतों. वास्तविकपणें असे झालें पाहिजे कीं, न समजता शिष्यानें आपली एखादी गोष्ट ऐकली तर गुरूला दुःख व्हावें. समजल्याशिवाय मुलगा आपले ऐकत नाहीं, स्वतंत्रपणें विचार करतो, तर गुरूला आनंद व्हावा. असें जेव्हा घडेल तेव्हा च गुणांची वृद्धि होईल. मुले श्रद्धावान् असतात म्हणून गृहस्थाश्रमात सत्तेची गरज नाहीं. तिथें सत्ता आली आहे. विद्येंत हि आम्हीं सत्तेला च स्थान दिले आहे. तेथें हि तिची कांहीं गरज नव्हती. कारण गुरु ज्ञानी असतात, व जिची सत्ता चालावी अशी ज्ञानाशिवाय कोणती गोष्ट आहे?

आम्हीं धर्मसंस्थेंत हि सत्तेला च स्थान दिलें आहे. कोणता हि सत्पुरुष सत्तेची अपेक्षा करीत नाहीं व कोणता हि मठाधिपति सत्ता सोडण्यास तयार होत नाहीं. म्हणजे च बरोबर उलटें कार्य झालें. संतांचे कार्य चालविण्यासाठीं च मठ, मंदिरें इ० बनविलीं जातात. शंकराचार्यांनीं आपल्या सर्व वस्तूंचा त्याग केला, आपल्याजवळ यत्सली च सत्ता ठेवली नाहीं. त्यांनीं असें च म्हटलें कीं, "मी विचार समजावीन. आपणाला जोंपर्यंत समजणार नाहींत तोंपर्यंत समजावीन. हें च माझें शास्त्र आहे. मी आपणाला कांहीं करावयास सांगत नाहीं. फक्त समजाविण्याची च माझी

इच्छा आहे. " पण आज त्याचे मठाधिपति सर्व प्रकारची सत्ता गाजवितात त्यांचे नावाने आज्ञा निघतात. ते काहीं लोकांवर बहिष्कार घालतात काहीं लोकांना प्रायश्चित्त करण्यास सांगतात हे फक्त आपल्या च देशात आहे असें नाहीं तर युरोपात हि आहे. वास्तविक धर्मक्षेत्रात सत्तेला जागा च असू नये, कारण तेथे फक्त विचार समजाविण्याची गोष्ट असते

अशा प्रकारें घर, शाळा धर्मसंस्था यात आम्हीं सत्तेला च प्रमुख स्थान दिलें आहे नतर समाजव्यवस्थेत हि सत्तला स्थान असत, म्हणून हे सर्व सत्तेचें राजकारण ( पॉवर पॉलिटिक्स ) वरवरच्या उपायाने जाणार नाहीं त्यात जो मूलभूत दोष आहे आणि जो मानवहृदयात हि आहे, त्याचे निवारण केलं पाहिजे

**गुण स्वयंप्रचारक**

गुण व्यक्तिगत राहिले तर ते मर्यादित असतात, म्हणून ते सामाजिक झाले पाहिजेत. हे च योग्य होईल दुसर एक सत्य असें आहे कीं, व्यक्ती-मध्यें जर खरोखरी च गुण असतील तर ते स्वत च पसरतील सूर्य प्रकाशाच्या प्रचाराला दिव्याची गरज नाहीं. जस सूर्य किरण स्वयप्रचारक आहत तसे च गुण हि स्वय प्रचारक आहत दयाळू मनुष्याची करुणा त्याच्या डोळ्यातून प्रकट होते तो जरी एक हि शब्द बोलला नाहीं तरी सभोंवतालचें वातावरण करुणामय होतें म्हणून ज्याना असें वाटतें कीं, गुण व्यक्तिगत राहू नयेत, ते गुणाच स्वरूप च ओळखत नाहींत जेव्हा आमच्यात गुण च नसतील तेव्हा आमच्यामार्फत त्याचा प्रचार तरी कसा होईल? म्हणून गुणाचे सामानीकरण करण्यासाठीं आपल्यातील गुणाचा विकास करण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.

आम्हाला वाटतें कीं, सर्वांनीं सकाळीं चार वाजता उठावें व त्यासाठीं आम्ही घटा वाजवितों. तरी लोक उठत नाहींत. तव्हा आम्ही जवळ जाऊन ओरडतों. इतक्यानें हि कोणी उठला नाहीं तर-आम्ही त्याला हालवितों. तरी हि उठला नाहीं तर पाणी शिंपडतों आणि त्यानें हि उठला नाहीं तर काठीनें मारतों. तेव्हा तो उठतो च. मारपीट करणें हा काय गुण आहे? गुणप्रचारात जेव्हा त्याची मदत घेतली जाते तेव्हा गुणाच गुणत्व

नष्ट होते. लोक मला म्हणतात कीं, तुमचे सर्व तत्त्वज्ञान मान्य आहे परंतु चार वर्षे आपण मालकी नष्ट करण्याचा विचार लोकांना समजावीत आहात, गुणप्रचार करीत आहात, तरी हि काम होत नाहीं. इतकी थोडी प्रगति झाली आहे, तर काम केव्हा होणार ? काम लवकर झालें पाहिजे. मला हि वाटते कीं काम लवकर व्हावें. परंतु हे च काम लवकर व्हावें कीं सर्व कामें लवकर व्हावींत ? मला वाटत, आजारी लवकर बरा व्हावा. परंतु उशीराने बरा होण्याऐवजीं तो लवकर मेला तर ते तुम्हाला पसंत पडेल काय ? आपल्याला शीघ्रता पाहिजे का रोगमुक्ति ? जर रोगमुक्ति पाहिजे असेल तर आपल्याला सात सप्तके औषध घ्यावें लागेल आणि इतके पथ्य करावे लागेल.

## वेळ लागणें वाईट नव्हे, तर आवश्यक हि आहे

जगामधे सर्वत्र सत्ता चालू आहे आणि शांतीची इच्छा असून हि शांति मिळत नाहीं. याला एक च उपाय आहे. तो म्हणजे सत्ता त्याग. परंतु ही गोष्ट सत्ताधाऱ्यांना आणि सत्तेची आकांक्षा करणाऱ्यांना सुचत नाहीं. त्यांना ती सुचणार च नाहीं. कारण ते सत्तेतले च जीवजंतू आहेत. परंतु आश्चर्य हे आहे कीं आईबापांना, गुरुजनांना, धर्मशास्त्रवाल्यांना हें का सुचत नाहीं ? जेव्हा या तीन क्षेत्रांत परिवर्तन होईल तेव्हा राजनैतिक क्षेत्रांत हि ते होईल. म्हणून या कामाला जितका वेळ लागेल तितका देणें आवश्यक आहे. या उलट जर तें कार्य लौकर होऊं लागेल तर ही जुनी च गोष्ट चालू आहे काय, अशी शंका आली पाहिजे. मी रात्रीं झोंपण्या पूर्वीं ध्यान करीत असे. एक दीड महिन्यांत च माझी समाधि लागू लागली. मला शंका यायू लागली कीं, ज्या समाधीसाठीं पुष्कळ परिश्रम करावे लागतात ती दीड महिन्यांत मला कशी साधली ? या गोष्टीची परीक्षा घेण्यासाठीं मीं रात्रीं झोंपण्यापूर्वीं ध्यान करण्याऐवजीं सकाळीं उठून ध्यान धरणें सुरू केलें. लवकर समाधि लागली नाहीं. तेव्हा माझ्या लक्षांत आलें कीं रात्रीची समाधि लागत असे त्यांत झोंपेचा अंश होता. म्हणून जर लवकर समाधि लागली तर साधकाला शंका यायली पाहिजे. म्हणून जर असें दिसेल कीं लोक आमचा विचार लवकर मान्य करूं लागले तर

आम्हाला अवश्य शंका आली पाहिजे. म्हणून जो काळ आमच्या कार्याला लागत आहे तो जास्त नाहीं. इतक्या कालावधीची जरुरी च आहे

असे म्हणतात कीं, ' यात बाबाचीं पाच वर्षे गेलीं ' परंतु कारांचीं किती गेलीं, नातवांचीं किती गेलीं, मुलांचीं किती गेलीं ? एवढ्या बाबाने काम करण्यानें काय होणार ? इतक्या मोठ्या विशाल समाजात पाच वर्षांच्या प्रयत्नान जें झालें तें पुष्कळ आहे जास्त लवकर परिणाम झाला तर आम्हाला कधीं कधीं शंका येते कीं आम्ही चुकीचं कार्य करीत नाहीं ना ? आमचे कार्यकर्ते काही चुकीचा प्रचार करत नाहींत ना ? परंतु अशी शंका येते त्या वेळेला उत्तर मिळते कीं हे विज्ञानाचं युग आहे, म्हणून काम लवकर होत आहे. जुन्या काळात जे काम दहा वर्षांत झाले ते आजच्या काळात दोन वर्षांत होईल. आजच्या काळात काम लवकर झाले तरी हि ते आपला कालावधि घेईल च म्हणून आम्हाला कालावधीची काळजी करता कामा नये. परंतु या गोष्टीची काळजी केली पाहिजे कीं आम्ही योग्य प्रकारें विचार पसरवीत आहोंत कीं नाहीं. आम्ही लोकांवर विचार लादत नाहीं ना हे पाहिले पाहिजे.

## सूर्यासारखा निष्कामकर्मयोग

सत्तेची ही अभिलाषा कशी नष्ट होईल याचें च मी सतत चिंतन करीत असतो. नंतर मी माझ्या मनाचें संशोधन करतों कीं आमच्या विचाराची च सत्ता चालावी असा विचार माझ्या मनात कोठे लपला तर नाहीं ना ? जर असा अनुभव आला कीं ' लोकांनीं आमची गोष्ट मानली तर मी सुखी होतों आणि मानली नाहीं तर दु खी होतों ' त्या वेळीं असें समजलें पाहिजे कीं, मी लोकांवर काहीं सत्ता लादू इच्छितों. म्हणून मी परमेश्वराची अशी प्रार्थना करतों कीं, ' समाजावर आमचा प्रभाव पडावा ' अशी काहीं भावना मनात राहिली असल तर ती दूर कर. माझा विश्वास आहे कीं मनात परोपकाराची इच्छा ठेवल्याशिवाय काम केलें गेलें तर तें लवकर होईल. सूर्य उगवतो सर्व जगाला प्रकाशित करतो. तो अशी इच्छा बाळगतो का कीं लोकांनीं लवकर उठावें, आपले दरवाजे लवकर उघडून मला प्रवेश द्यावा ? तो फक्त उगवतो तो सेवक आहे. तो स्वामीच्या दर

वाजाशीं उभा राहतो. जर कोणीं दरवाजा उघडला नाहीं तर तो आत घुसणार नाहीं; बाहेर च उभा राहील. थोडासा दरवाजा उघडला तर तेवढा च प्रवेश करील आणि पूर्ण उघडला तर पूर्ण प्रवेश करील. परंतु तो कधीं गैरहजर रहाणार नाहीं. मालकाला वाटेल तेव्हा उठण्याचा अधिकार आहे जर तो झोपेल तर त्याला झोपण्याचा अधिकार आहे, पण सेवकाला झोपण्याचा अधिकार नाहीं. त्याला सेवेसाठीं नेहमीं जाग्रत राहिले पाहिजे. मालकानें लवकर उठावे ही इच्छा च त्यानें सोडली पाहिजे. अशा प्रकारें सूर्यनारायणाचा आदर्श समोर ठेवून आम्ही निष्कामकर्मयोग करीत राहिलो तर जगातून सत्ता लवकरात लवकर नष्ट होईल.

**पलनी** ( मदुरा )
१८-११-'५६

## सरकारनें खादीकरितां काय करावें : ३३ :

जर मी सरकार झालों तर सरकारद्वारा काहीं गोष्टी जाहीर करून देईन.

( १ ) प्रत्येक मनुष्याला कातण्यास शिकविण्याची जबाबदारी सरकारची आहे. त्यासाठीं सर्व खर्च सरकार करील. ज्याप्रमाणें प्रत्येकाला शिक्षित ( लिटरेट ) करण्याची जबाबदारी सरकारची मानली जाते त्याप्रमाणें हिंदुस्थानातील ज्या खेडुताला लिहणे, वाचणें व कातणें येणार नाहीं त्याला आम्ही शिक्षित समजणार नाहीं.

( २ ) लोकाना चरखे पाहिजे असतील तर सरकार देईल आणि त्याची किंमत गाववाले हप्त्याहप्त्यानें देतील.

( ३ ) जें गाव किंवा माणूस आपणासाठीं कापड करील त्याच्या कापडाची विणण्याची मजुरी सरकार देईल. त्याला एक मर्यादा राहील. मनुष्याला कमींत कमी किती कापड लागेल हें सर्वजण मिळून ठरवतील. आम्ही समजतों कीं प्रत्येक खेडुताला कमींत कमी बारा वार कापडाची जरूरी आहे. पण माझ्या राष्ट्रीय योजनेंत प्रत्येकाला बारा वार च नाहीं तर पचवीस वार कापड मिळेल. अगदीं कमीचें रेशन करायचें असले तरी

आम्हाला प्रत्येक खेडुतामागें बारा बाराची शिवाई पुरुट केली पाहिजे. दुसऱ्या भाषेत बोलावयाचें तर आम्ही असें म्हणू कीं 'आम्हाला विणाईचें राष्ट्रीयीकरण करावयाचें आहे, विणणें ही एक सेवा (सर्व्हिस) करावयाची आहे.'

ह्याच प्रमाणे डॉक्टरची सुद्धा 'सेवा' (सर्व्हिस) झाली पाहिजे. सरकार-कडून डॉक्टर नेमला जाईल आणि त्याला पगार मिळेल. तो पण फी घेणार नाहीं. आज जशी डॉक्टरची इच्छा असते कीं लोक आजारी पडावेत तशी इच्छा रहाणार नाहीं. डॉक्टर आणि विणकर सेवक होतील. अंबर चरख्या-मुळे सूत पण चांगले निघेल तर बारा वार कापडासाठीं दीड रुपया मजुरी द्यावी लागेल. प्रत्येक मनुष्यासाठीं फक्त दीड रुपया देण्यानें हिंदुस्थानातील सर्व खेडुतांसाठीं विमा होईल. तो दीड रुपया कसा मिळवावयाचा याची अक्कल सरकारजवळ आहे सरकार तें निरनिराळ्या प्रकारानीं करू शकतें

आम्ही अशा तऱ्हेने चरखे वाढविण्याचें आणि बेकारी निवारण करण्याचें काम करू तर असंख्य चरखे चालतील. ग्रामयोजना केल्याशिवाय लोकांवर खादी वापरण्याची जबाबदारी न टाकता काम केले जाईल तर दोन चार महिन्यात जास्त चरखे चालू होतील परंतु चरख्याची वाढ पुढे होणार नाहीं. परंतु आमच्या योजनेनुसार काम चालेल तर चार महिन्यात पाच हजाराच्या बदली तीन हजार चरखे चालू होतील. परंतु पुढें लाखो चरखे चालतील

पल्लनी (मदुरा)
१९-११-'५६

गेल्या तीन चार महिन्यात जगात आणि हिंदुस्थानात अशा घटना घडल्या कीं त्यामुळे प्रत्येकाच्या हृदयात तीव्र प्रतिक्रिया निर्माण झाली. इंग्लडच्या इतिहासात हा पहिला च प्रसंग होता कीं ज्या वेळेला राष्ट्राची संमति घेतल्यावेरीज पक्षनिष्ठ बहुसंख्येच्या आधारावर दुसऱ्या देशाशीं लढाई सुरू केली. लोकशाहीच्या दृष्टीनें ही मोठी काळजीची गोष्ट झाली. त्याबरोबर च एक आशादायक गोष्ट घडली कीं, इंग्लडमधील लोकांनीं मोकळेपणीं आपला आवाज उठवला. हंगेरी इत्यादि ठिकाणीं जें घडलें त्या बाबतींत आम्हाला फार माहिती नाहीं पण ती हि गोष्ट फार चिंताजनक आहे. सर्व जगाची स्थिति कधीं अधिक भयानक दिसते तर कधीं कमी. परतु आम्हीं हे जाणले पाहिजे कीं ती भयानक दिसो या न दिसो, वास्तविकपणें ती भयानक च आहे

## गांधी-विचारांत गोळीबार बसूं शकत नाहीं

जेव्हा आम्ही हिंदुस्थानकडे पहातो तेव्हा गेल्या तीन चार महिन्यात जें काहीं झालें ते आणि त्यापूर्वी जेव्हा राज्यपुनर्रचना समितीचे कार्य सुरू झालें तेव्हा ज्या घटना घडल्या त्या जगातील घटनाइतक्या च चिंताजनक आहेत विशेषतः जेव्हा अहमदाबादमधील घटना घडली तेव्हा मला कबूल करावें लागलें कीं, ती घटना माझ्या कल्पनेत हि नव्हती. हिंदुस्थानात ( बिहार प्रात सोडून ) अहिंसा-परायण लोक विशेषतः गुजराथमध्यें आहेत. गाधीजींच्या मुळें तेथें एक निष्ठा निर्माण झाली आहे. त्याविरुद्ध या घटना घडल्या. जेव्हा मी घटनेचा उल्लेख करतों तेव्हा त्याचा अर्थ दोन्ही बाजूनीं घडणाऱ्या घटना असा आहे. कर्तव्य समजून गोळ्या चालविल्या गेल्या आणि नतर त्याची चौकशी करण्याची हि जरूरी मानली गेली नाहीं. ही अहमदाबाद किंवा मुबई शहराची च गोष्ट नव्हे; गेल्या सात आठ वर्षांत मुबई राज्यात लागोपाठ वीस वेळा गोळीबार झाला; परतु कधीं हि त्याची चौकशी केली गेली नाहीं.

सर्वांत अधिक दुःखाची गोष्ट ही की ही गोष्ट 'आम्ही' च करतों, दुसरे लोक नव्हेत. 'आम्ही' चा अर्थ गांधीजींची शिकवण मानणारे लोक म्हणून व्यक्तिगत दृष्टीनें मी जबाबदार आहे का दुसरा कोणी हे विचारण्यात काहीं तथ्य नाहीं आपल्या मंडळींत एक फार जुना विचार आला आहे. त्याच्या अनुकूल वचनें जगाच्या आध्यात्मिक आणि धार्मिक साहित्यांतून दाखविता येतील की जितकीं अहिंसेच्या बाबतींत आम्हां दाखविलीं. राज-नैतिक साहित्याचा काहीं प्रश्न च नाहीं त्यांत अशीं वचनें आहेत च. परंतु धार्मिक साहित्यांत, ज्यावर जग विश्वास ठेवतं, अहिंसेच्या बाबतींत जितकीं उदाहरणें दिसतात तितकीं च उदाहरणें अशा प्रकारच्या गोळीबाराला दुजोरा देणारीं मिळू शकतील अशा प्रकारें शास्त्र वचन किंवा आपल्या परिस्थितीचें वास्तविक ज्ञान यांच्या आधारावर गोळीबार करणें हें जरूर किंवा उचित आहे असें समजू परंतु ती च गोष्ट सर्वोदय विचार किंवा गांधी विचारांत बसू शकते असें आम्ही मानू शकत नाहीं गांधीजींचें नांव घ्यायला मला फार संकोच वाटतो, परंतु तें नांव आम्ही टाळू शकत नाहीं कारण मुलाला असे खास वाटतें की आपण आईचें काम करावें, उगीचच तिचें नांव घेऊ नये तरी हि त्या आईच्या नांवाच्या आधारावर एखादी गोष्ट केली जाते तेव्हां तें नांव मध्ये येतें च आम्ही या विचारांत पडणार नाहीं की गांधीजी असते तर कदाचित् त्यांनीं याचा बचाव केला असता किंवा याला आशीर्वाद दिला असता किंवा दिला हि नसता त्याला जसं समजायचें असेल तसं समजण्याचा त्याला अधिकार आहे पण आम्हाला हि आमच्या मताप्रमाणें समजण्याचा अधिकार आहे म्हणून मी असं समजतों की ही गोष्ट सर्वथा गांधी विचाराच्या विरुद्ध आहे

परंतु गांधी विचार सोडा तरी मी असें सांगतों की ही गोष्ट माझ्या हि विचारांत बसू शकत नाहीं मीं महाभारत वाचलें आहे त्यांत याविषयीं पुष्कळ चर्चा आहे असें असून हि गोळीबार केला आणि व कोणत्या हि परिस्थितींत त्याची चौकशी केली जाऊ नये या गोष्टीचा मी बचाव करू शकत नाहीं लोक सध्या विचारतील की चौकशी करून काय करायचें आहे ? यावर माझें असं उत्तर आहे की आम्हाला कोणाला हि शिक्षा

करावयाची नाहीं. मीं तर सांगितलें होतें कीं चोर चोरी करतो. त्याला तीन वर्षांची शिक्षा देण्याऐवजीं तीन एकर जमीन दिली जावी. कोणाला हि शिक्षा देण्यात आम्हाला आनंद नाहीं. तरी हि एखादी गोष्ट लपविली जावी, त्याचा वारंवार बचाव केला जावा, बचावासाठीं चुकीचे पुरावे दिले जावेत, ह्या सर्वांमुळें हृदयाला फार च वेदना होतात.

## पक्षनिष्ठा सत्यनिष्ठेच्या प्रतिकूल आहे

लोकांनीं हिंसा केली हें स्पष्ट च आहे. परंतु शेवटीं लोक ते लोक च. त्यांना प्रजाजन या नात्यानें गणलें जाईल. पण आम्ही जे जबाबदार नेते, राज्यकर्ते या समाजसेवक आहोंत त्यांची विशेष जबाबदारी समजली जाईल. म्हणून जेव्हां आम्हा लोकांकडून अशीं कृत्ये होतात आणि त्यांचा बचाव केला जातो तेव्हां फार वेदना होतात. ह्यापेक्षा हि अधिक वेदना ह्यामुळें होतात कीं यामध्यें कॉंग्रेसचे आमच्यापैकीं काहीं मित्र सामील आहेत. त्यांच्या हातात काहीं सत्ता आहे आणि व्यक्तिशः चौकशी झाली पाहिजे असें म्हणतात, पण ते उघड बोलू शकत नाहींत, यात सत्याची जी हानि होत आहे ती मला मनुष्यहानि इत्यादींपेक्षा अति भयानक वाटते. परंतु या बाबतींत हि मी त्यांना ते आमच्याहून वेगळे आहेत असें समजून दोष देत नाहीं कारण ते या गोष्टीला सत्यनिष्ठेचें एक अंग मानतात. प्रत्येक मनुष्य जसा आपणा स्वतःला समजतो तें त्याचें म्हणणें आपण समजून घेतलें पाहिजे. मला वाटतें कीं अशा वेळीं न बोलणें आणि लोकमत असें तयार न करणें हानिकारक आहे. परंतु ते समजतात कीं, पक्षाची एक ' निष्ठा ' असते आपल्या पक्षानें एक काम केलें आणि ते चुकीचें असलें तर आपापसात चर्चा करू. पक्षप्रमुख त्या बाबतींत चर्चा करण्यास तयार नसतील तर ती तेथे च सोडली जावी. सामान्य जनतेत पक्षाविरुद्ध बोलू नये. ' आपापसात त्याविषयीं जरूर बोलू पण जाहीरपणें काहीं हि बोलणार नाहीं हें च सत्यनिष्ठेचें अंग मानलें जातें कारण ती व्यक्ति पक्षात दाखल झाली आहे. पहिल्यापासून च माझ्या मनात पक्षाबद्दल प्रतिकूल भावना आहेत. अलीकडे हे सर्व दृश्य मीं पाहिलें त्यामुळे माझ्या मनात आणखी प्रतिकूल भावना निर्माण झाली. मला वाटतें कीं ' पार्टी लॉयल्टी '

( पक्षनिष्ठा ) ही सुद्धा सत्यनिष्ठेचा एक सामान्य प्रकार, सीमित सत्यनिष्ठा आहे. पण तो मोठ्या सत्याचा नाश करणारा आहे. म्हणून त्याचा त्याग केला पाहिजे. जी पक्षनिष्ठा सज्जनांना न कळत दुर्जन बनविते ती भयंकर च आहे. ती एखाद्या मायावीप्रमाणे आहे. यामुळे सत्यावर आणि अहिंसेवर हि प्रहार झाला. अशा स्थितींत आम्ही जर असे म्हणू कीं आंतरराष्ट्रीय क्षेत्रात हिंदुस्थानचा आवाज अहिंसेच्या बाजूला असावा किंवा त्याने जे कांहीं केले त्याचा परिणाम जगावर व्हावा तर त्या साऱ्या अपेक्षा चुकीच्या ठरतील. अशा आमच्या आवाजाचा कांहीं हि परिणाम होणार नाहीं.

## खरोखरी च अहिंसेची इच्छा नाहीं

'कॅमोफ्लाज' जिचा ढोंग याचा हि परिणाम होतो. पण अहिंसेच्या योजनेंत तो होत नाहीं. हिंसेच्या योजनेंत त्याला स्थान आहे व त्याचा उपयोग हि आहे. अहिंसेंत सत्य असतें तेव्हा च ती यशस्वी होते. ज्या अहिंसेत सत्य नाहीं, देशाच्या भरभराटीसाठीं शांतीची गरज आहे फक्त एवढा च विचार आहे, ती अहिंसा योग्य नाहीं. असें वारंवार बोललें जातें कीं, 'आम्ही मागासलेले आहोंत.' हिंदुस्थानसारखे च आशियात दुसरे किती तरी देश मागासलेले आहेत. जगात जर हिंसा चालली तर त्याचा विकास थांबेल. म्हणून धर्मांत कमी दहा पधरा वर्षे आम्हाला शांतीची अत्यंत आवश्यकता आहे. तसें पाहिलें तर आम्हाला कायम च शांतीची अपेक्षा आहे. पण ह्या वेळीं तिच्याशिवाय आमचें अगदीं च चालणार नाहीं. पण मला हें हि बोलणें धोक्याचें वाटतें. कांहीं मागासलेल्या देशाच्या विकासासाठीं शांतीची मागणी करणें म्हणजे शांतीची खरी तहान नव्हे. आपल्या मनात अशा तऱ्हेची मागणी ठेवण्यानं आमचा नैतिक आवाज जगात बलवान् होणार नाहीं.

## गोव्याचा प्रश्न

समोर गोव्याचा हि प्रश्न आहे. तसें पहाता तो अगदीं ल्हानसा दिसतो. पण वस्तुत: तो फार खोल प्रश्न आहे. त्यात कितीतरी बाबी आहेत.

गोव्यावर आक्रमण करण्याची आमची इच्छा नाहीं. असें म्हटलें जातें कीं, जर आम्हीं त्यावर आक्रमण केलें तर आमचा विजय होईल. परंतु या बाबतींत हि मला शंका आहे. कारण तो इतका सोपा प्रश्न नाहीं. कारण गोव्याच्या पाठीशीं अनेक शक्ति एकत्रित झालेल्या आहेत पण तें असो. आम्ही त्याच्यावर आक्रमण करून जिंकू शकू हा विचार मी सोडून देतों. तरी हि आम्ही आक्रमण करू इच्छीत नाहीं कारण आमची अहिंसेची नीति आहे. यात हि फार मोठी शांतीची शक्ति भरलेली आहे असें नाहीं. कारण यात आम्हीं पोर्तुगाल सरकारच्या विरुद्ध ' पीसफुल मेजर '–शांतिपूर्ण उपाय केले आहेत. असें सांगतात कीं, काहीं सीमाबंदी व काहीं व्यवहार हि बंद केले आहेत. हा मार्ग शांतिमय आहे. पण त्यात अहिंसेची शक्ति नाहीं. म्हणजे च याच्या मुळाशीं आमच्या समोरच्याबद्दल प्रेम नाहीं.

## अहिंसा कशी फोफावेल ?

अहिंसेची शक्ति तेव्हा च प्रकट होते कीं जेव्हा समोरच्या दोषी समजल्या जाणाऱ्याबद्दल आमच्या मनात प्रेम असेल आणि त्याच्या उन्नतीसाठीं आवश्यक आहे असें समजून आम्ही आमचें पाऊल उचलू. त्यात आमचें कल्याण आहे च, पण त्याचें हि कल्याण आहे. जेथें अशी स्पष्ट भावना असेल तेथें च अहिंसेची शक्ति प्रकट होते. त्यामुळें समोरील व्यक्तींत काहीं परिवर्तन घडतें किंवा घडण्याचा संभव दिसतो. परंतु आम्ही जर एक निषेधात्मक ( निगेटिव ) कार्य करीत असू, म्हणजे प्रत्यक्ष लढाईच्या बदली अशा प्रकारचा बहिष्कार घालू, तर त्यामुळें शांतीची शक्ति प्रकट होणार नाहीं. एकीकडे आम्ही निषेधात्मक काम करतो, शांतीची जरूरी आहे म्हणून शांतीच्या गोष्टी बोलतों, आणि दुसरीकडे आपल्या समाजावर गोळीबार करतो. त्याचा बचाव हि आमच्याजवळ आहे. पक्षनिष्ठेमुळें उघडपणें आम्ही त्याचा निषेध करीत नाहीं. पण आम्हीं समजलें पाहिजे कीं ही वृत्ति अहिंसेची शक्ति निर्माण करणारी नाहीं.

म्हणून अशा वेळीं जेव्हा आम्ही एकत्र येतों तेव्हा मुख्य चिंतनाची गोष्ट अशी असली पाहिजे कीं अहिंसा कधीं फोफावेल कीं नाहीं ? अहिंसेचें

ध्येय आमच्यापुढे ठेवू इच्छितों कीं काहीं हि करून आम्ही आमचें काम निभावून घेऊ इच्छितो. आजच्या राजनीतींत आणि परिस्थितींत आमच निभावेल प्रत्येक काळचे सरकार सज्जनाचा बचाव करतें कधीं त्याना पचवून हि टाकते. कधीं त्याना अपवादस्वरूप समजत. इंग्लंडमध्ये उद्या अनिवार्य सैनिकभरती सुरू झाली तरी ते सुद्धा 'सदसद्विवेकबुद्धीनें विरोध करणारे' ( conscientious objectors ) अशा लोकाना सोडून देतात. त्यानीं इतकें जमते करून घेतलें आहे तसे च आमच्यासारख्या थोड्या लोकाना आजचा समाज किंवा आजचें सरकार निभावून घेईल आणि आमचें हि निभावेल. परंतु त्यामुळे हिंदुस्थानात अहिंसेची शक्ति वाढेल असे मी मानीत नाहीं.

## अहिंसा मूर्तीला शस्त्रानीं प्रणाम

नुकतेंच प्यारेलालजींनी एक पत्र लिहिलें. ३० जानेवारीला बापूजींच्या समाधीसमोर सर्व लोक येऊन प्रणाम करतात. त्यात मिलिटरीचे लोक हि असतात ते सशस्त्र तेथें जातात यावर प्यारेलालजींनीं असा प्रश्न केला कीं, अहिंसेच्या मूर्तीला, जिला आम्ही युगावतार म्हणतो, आदर दाखवावयाचा असेल तर आम्ही आपलीं शस्त्रें घरीं ठेवून आलो तर काय हरकत आहे ? त्याना असं वाटत कीं, हें हिंसा शक्तीचंच प्रदर्शन आहे. परंतु ही एक सिंबलची 'प्रतीका'ची गोष्ट आहे ती मी सोडून देतों त्यानीं आणखी एक गोष्ट मला लिहिली कीं, ' उत्तर प्रदेशाचें सरकार शिक्षणात लष्करी शिक्षण सुरू करण्याचा विचार करीत आहे याची तुम्ही चौकशी करा. ' हिंदुस्थानात आमच्या देखत शाळातून लष्करी शिक्षण आवश्यक केले जावे यात काहीं आश्चर्य नाहीं समजा, हे सर्व यत्नविण्यात आम्ही असमर्थ ठरला आणि फक्त आपल्या जीवनाचा बचाव केला तर एवढ्याने अहिंसेची ताकत प्रकट होणार नाहीं. म्हणून आपण या सर्वांचा विचार केला पाहिजे

## सत्याग्रहाचें संशोधन

सौम्य, सौम्यतर, सौम्यतम ही सत्याग्रहाची प्रक्रिया आहे. हे आमच यज्ञरूपच आहे. याच आम्ही संशोधन केले पाहिजे या सर्व प्रश्नाचें

आमचेजवळ काहीं उत्तर आहे किंवा नाहीं याचा भरपूर शोध केला पाहिजे. उत्तर अवश्य असले पाहिजे. अहिंसेंत उत्तर नाहीं असे होऊं च शकत नाहीं. आम्ही याचें सशोधन करून त्या दृष्टीनें अधिक सौम्य, अधिक कोमल, बनलें पाहिजे. आम्ही अधिक सत्यनिष्ठ झालें पाहिजे. मला असें वाटतें कीं, जो कार्यक्रम आम्हीं हातीं घेतला आहे तो आवश्यक आहे च परतु विचारासाठीं तो कार्यक्रम जरा बाजूला ठेवून या गोष्टीचें मानसिक चिंतन करावें. अशा प्रकारचें शिक्षण आम्हीं स्वतः घ्यावें व आपल्या बांधवाना द्यावें काय ?

## हिंसेनें विश्वास कसा जाईल

काहीं दिवसापूर्वीं हरिभाऊजींनीं अहिंसक सेनेबाबत दोन तीन पत्रें लिहिलीं होतीं. त्यात हा विचार प्रकट केला गेला कीं, 'सैन्य येऊन नाहीं करील, त्याच्या आधीं आमच्या शान्ति सेनेने लोकाना आवरण्याचा प्रयत्न करावा ! जर शातिसेना यशस्वी झाली नाहीं तर च फौज यावी.' परतु ह्या विचाराने मला दुःख होते. कारण यात शेवटचा विश्वास सैन्यावर, हिंसेवर च आहे. म्हणजे च यात हिंसा हा च परमेश्वर आहे. आमचे सर्व प्रयत्न अयशस्वी होतात तेव्हा च आम्ही परमेश्वराला शरण जातों. जोंपर्यंत प्रयत्न अयशस्वी होत नाहींत तोंपर्यंत प्रयत्न करत राहतों च. त्या च प्रमाणें अहिंसा वगैरे प्रयोग प्रथम केले जावे, परतु जेव्हा ते यशस्वी होणार नाहींत तेव्हा लाचार होऊन हिंसा करावी लागेल. हा एक प्रकारचा विश्वास आहे. आणि दुसरा विश्वास असा कीं, 'हिंसेनें च काम होईल. तात्कालिक का होईना पण काम होईल च' हे दोन्ही विश्वास एक च आहेत. अशा च प्रकारचा विश्वास आम्ही समाजात सर्वत्र पहातों. आम्हाला अशी सेना तयार केली पाहिजे कीं जिच्या सैनिकामध्यें काहीं गुण असतील. त्या गुणाच्या अभ्यासात अहिंसेचा उपयोग आम्ही कसा करू शकतों याचा आम्हीं विचार केला पाहिजे. जगात जिती हि हिंसा चालू असली तरी तिच्याशीं सामना देईल अशी समाजाच्या काहीं भागाच्या जीवनातून आपण विरक्त राहून स्वतत्र अहिंसाशक्ति निर्माण करू शकतों का हें पाहिलें पाहिजे.

## अपरिग्रहाचें महत्त्व

मी सत्य-अहिंसेच्या बाबतींत बोललों. बाकी सर्व तत्त्वे त्यातून निघतात, म्हणून त्याच्या स्वतंत्र उल्लेखाची गरज नाहीं. परंतु विशिष्ट परिस्थितींत दुसऱ्या तत्त्वाचे उच्चारण आणि त्याच्यासाठीं स्वतंत्र योजना करण्याची गरज पडते मला वाटले कीं, आम्ही सत्य व अहिंसा दोन नावें घेतो. त्याच्या-बरोबर च अपरिग्रहाचें नाव हि घेतले जावें. ते अध्याहृत न मानता त्यासाठीं योजना हि करावी.

भूदानाचें वातावरण सर्व हिंदुस्थानात निर्माण झाले नसलें तरी काहीं प्रदेशात त पुष्कळ च आह. विहारच्या लोकात ही भावना भरपूर प्रमाणात निर्माण झाली आह. त्याशिवाय लाखो लोकानीं दान देणें सभवत नाहीं तेथें लाखो एकर जमिनीचे दान च नाहीं, तर सपत्तीचे दान सुद्धा मिळाल आहे. तेथें सुद्धा कायदा करण्याची जबाबदारी त्याचेवर आहे ते कायदा करण्यास वाकू करीत आहेत. हे मार्गे पुढ पाहाणें अद्या लोकाच्या बाबतींत आहे. जे बाल्ण्यात क्रातिकारकाच्यापेक्षा जास्त आहेत परतु कृतीमध्यें मात्र त्याचें आचरण तसें नाहीं ह्याचें कारण काय आहे? कारण असें आहे कीं, त्याच्या द्वारें काम होईल ते सर्व अपरिग्रही नाहींत, परतु परिग्रह मानणारे आहेत त्याबरोबर च ते असें समजतात कीं, परिग्रह जितका वाढेल तितकें चागलें आहे. सगळे परिग्रह करू द्यास्त नाहींत म्हणून परिग्रह वाढू नये असें म्हणणें वेगळें पण परिग्रहाचा सिद्धान्त त्याना मान्य आहे आणि कमींत कमी आपल्याजवळ जें काहीं आह तें तरी ते सोडू इच्छीत नाहींत, अशा वेळीं ते वाकू करतात आणि भूमीसाठीं च तेवढा कायदा का लागू केला जावा आणि सपत्तीसाठीं का लागू केला जाऊ नय इत्यादि गोष्टी उपस्थित करतात ह्या सर्वाचा अर्थ इतका च होतो कीं जी ल्हानशी गोष्ट होऊ शकली असती ती अपरिग्रहाच्या अभावामुळें होत नाहीं.

सारांश, अपरिग्रह एक मूळ विचार आहे आणि तो आपण अमलात आणला पाहिजे. भूदान, सपत्तिदान इत्यादींच्या मुळाशीं अपरिग्रहाचा सिद्धान्त आहे. आम्हाला त्याच्याकडे लक्ष दिलें पाहिजे आणि कार्यकर्त्यांच्या व्यायामध्यें त्याचा समावेश केला पाहिजे. तसें जीवनाचें शिक्षण देणाऱ्या

आमच्या संस्था ठिकठिकाणीं नसल्या तरी कमींत कमी एकेका प्रांतामध्यें एकेक अवश्य असली पाहिजे. तेथें कार्यकर्त्यांना नेलें जाईल आणि त्याना शिक्षण मिळेल. ते आपलें जीवन कशा तऱ्हेनें ह्या साच्यामध्ये बसवू शकतील ह्याचें थोडेसें ज्ञान त्याना मिळेल. चार सहा महिन्याची च का होईना पण अशी योजना आम्हाला बनविली पाहिजे.

## शरीरश्रमांची आवश्यकता

अण्णासाहेब मला सांगत होते कीं कोरापुटमध्यें येऊन त्याना वर्ष झालें. ह्या अवधींत ते ह्या निर्णयावर आले कीं आपल्या जीवनामध्ये शरीर-परिश्रम दाखल केल्याशिवाय आदिवासीयावर प्रभाव पाडण्याचें किंवा त्याच्याशीं संबंध वाढविण्याचें दुसरें कोणतें च साधन नाहीं. एक तर आपल्याला त्याची भाषा समजत नाहीं. जरी भाषा समजली तरी तेथें केवळ भाषा समजण्याने फारसें काहीं होणार नाहीं, परंतु त्याच्याशीं मिसळून जर आपण परिश्रम करू तर त्या च एका मार्गाने आपण त्याना चांगले विचार देऊ शकू हें तर मीं मान्य च केलें. त्याच्याबरोबर आणखी एक विचार जोडला कीं आम्ही त्याना काहीं ज्ञान, काहीं गुण शिकवूं; परंतु कार्यकर्ते प्रथम जेव्हा शिष्य होतील तेव्हा च ते गुरु बनू शकतील. लोकापाशीं शरीरश्रम हा एक गुण आहे. तो प्रथम आम्हीं घेतला तर च त्याना आम्हीं आमचा काहीं गुण देऊ शकू. त्याचें जीवन शरीरश्रमाचें जीवन आहे; म्हणून आम्हीं शरीरश्रमाची सवय केली पाहिजे. अण्णासाहेब तशी सवय करण्याचा प्रयत्न करीत आहेत. आमच्या कार्यकर्त्यासमोर सत्य, अहिंसा आणि अस्तेय आदि अनेक गोष्टी आहेत; पण या तीन गोष्टी आम्हीं अवश्य ठेवाव्या आणि अमलात हि आणाव्या.

## निष्कामसेवा

हिंदुस्थानच्या आजच्या आपत्तींत एक आध्यात्मिक आपत्ति अशी आहे कीं, येथून निष्कामसेवा नष्ट झाली. आज येथें जी कोणती सेवा केली जाते तिच्यातून काहीं ना काहीं मोबदल्याची अपेक्षा केली जाते. मग ती व्यक्तिगत असो किंवा पक्षाकरिता असो. आज निष्कामसेवा दुर्लभ झाली

आहे. स्वराज्यापूर्वी ती थोडीशी होती कारण त्या वेळीं मोबदल्याच्या इच्छेला कमी संधि होती; परंतु स्वराज्यानंतर ही गोष्ट नष्ट झाली.

आता च मीं एका व्याख्यानांत सांगितलें कीं, आम्हीं धार्मिक संस्थांवर धार्मिक कार्य व सरकारवर सामाजिक कार्य सोंपविलें आहे; म्हणून खाणें, पिणें, झोंपणें इत्यादि नित्य कार्यांशिवाय आमच्यासाठीं दुसरें कार्य च राहिलें नाहीं. म्हणून संस्था आणि सरकारच्या मार्फत जी सेवा होऊं लागली ती सर्वच्या सर्व सकाम झाली. त्यांत निष्कामसेवा नाहीं च. यासाठीं आम्हाला एक अशी सेवावृत्ति निर्माण केली पाहिजे कीं जिचा विश्वास शुद्ध सेवेवर च आहे आणि त्यांत कोणता हि हेतु नाहीं. याची आज फार जरूरी आहे. असे लोक जरी थोडे निघाले आणि जरी आज त्यांची शक्ति थोडी असली तरी हि अशा जितक्या लोकाचा आम्ही संग्रह करूं तितकें आपलें काम फैलावेल.

## सकामसेवकांना हि सहन करा

निष्कामवृत्ति कार्यकर्त्यांच्या निष्ठेचा एक आवश्यक अंश झाला पाहिजे. त्याच्या च बरोबर त्याचें एक पथ्य असें आहे कीं, दुसऱ्या असंख्य सकाम-सेवा करणाऱ्यापेक्षा आपण मोठे आहों असें मानूं नये आणि त्याची मदत घ्यावी. निष्कामसेवा करणारा एखादी विशेष इच्छा ठेवून सेवा करणाऱ्या मनुष्याची सेवा सहन करूं शकला नाहीं, तर त्यात हि निष्कामता नाहीं. निष्कामसेवक आपण खरे निष्काम आहों कीं नाहीं एवढी च काळजी करील. बाकीचे लोक कामना ठेवून जर सत्कार्य करण्यास आले तर त्याना येऊं द्या. आम्ही त्याची मदत घेऊं. त्यांची इच्छापूर्ति होत असेल तर आमची कांहीं हरकत नाहीं. अशी वृत्ति झाली पाहिजे. या दोन्ही वृत्ति मिळून च निष्कामसेवा होते. जर असें झालें तर आम्ही असंख्य लोकांचें सदकार्य प्राप्त करू. तरी हि आम्हीं कोणत्या हि वासनेत वाहून जाणार नाहीं. निष्कामतेचा हा मीं जो दुहेरी अर्थ सांगितला त्याचा आदर्श आमच्या कार्यकर्त्यांसमोर असला पाहिजे.

## लोकनीतीची निष्ठा

सारांश, आजच्या परिस्थितीवर मीं खालील तीन गोष्टी तुमच्यासमोर ठेवल्या आहेत पहिली गोष्ट अहिंसा, सत्य, अस्तेय, दुसरी गोष्ट निष्काम-सेवा आणि सकाम वृत्ति सहन करणें; आणि तिसरी गोष्ट म्हणजे लोक-नीतीची निष्ठा हें एक महत्त्वाचे अंग झाले पाहिजे. या वेळीं सर्व सेवा-संघानें जो ठराव केला तो फार च चांगला आहे. जेव्हा असा ठराव होतो तेव्हा माझ्यासारख्याला उत्साह वाटतो कीं, समजाविण्यासाठीं कांहीं गोष्ट मिळाली. ठराव असा आहे कीं, यावर खूप चर्चा होऊ शकते; म्हणजे च चर्चेला उत्तेजन देणारा हा ठराव आहे. 'जर आम्ही मत दिलें नाहीं तर नागरिक कर्तव्याची हानि होणार नाहीं काय? जर पुष्कळ लोकांनीं आमचे म्हणणें मान्य केलें तर अयोग्य लोकांच्या हातीं राज्यकारभार जाणार नाहीं काय?' इत्यादि अनेक प्रश्न उद्‌भवतात. हे सर्व असून हि आजचा ठराव मोठा कल्याणकारी आहे. लोकनीतीच्या बाबतींत मी जितका विचार करतो, त्यातून हे निश्चित वाटतें कीं, जर आज राजनीति नष्ट करण्यासाठीं सुद्धा तिला मान्य करू तर तिला आपण नष्ट करू शकणार नाहीं, कारण तोडण्यासाठीं त्याच्याबाहेर राहावें लागतें. आपण वृक्षाच्या बाहेर राहून च त्याला तोडू शकतों. त्यावर चढून जर तें तोडण्याची इच्छा करू तर तोडू शकणार नाहीं. म्हणून तोडण्याच्या विचारानें त्याच्याशीं संबंध जोडण्याची इच्छा असते तो सुद्धा एक सूक्ष्मतम मोह आहे. आज ज्या परिस्थितींत जग आहे तें पहात असता त्याला निर्दोष मानावयास हि मी तयार होईन. काल एका ऑस्ट्रियाच्या मित्राला मीं कांहीं समजावून सांगितल. पण त्यास एक शंका राहिली. त्याच्या मतें बाकी सर्व ठीक आहे परंतु सर्व समाजाच्या परिवर्तनासाठीं सत्ताकेंद्रावर आमचा अंकुश राहिला नाहीं तर कसे चालेल? ही अंकुशाची गोष्ट मी योग्य समजतों. परंतु आमच्या मनात हें स्पष्ट असलें पाहिजे कीं जेव्हा आम्ही त्यापासून दूर होऊ तेव्हा च त्याच्यावर जास्त अंकुश ठेवू शकू.

## आलोचना केव्हां कार्यप्रवण होईल?

एका मित्रानें म्हटलें, "पक्षीय राजकारण, सत्तेचें राजकारण, यात न

पडण्याच्या आपल्या नीतींचा परिणाम असा होईल कीं, जगात होणाऱ्या वाईट कामावर हि टीका होणार नाहीं." मी तर म्हणतो कीं ही उलट गोष्ट आहे. त्यावर टीका होत नाहीं याचें कारण लोक पक्षात गुरफटले गेले आहेत. जो मोठा पक्ष आहे तो आपल्या निष्ठेखातीं टीका करीत नाहीं. जो त्याचा विरोधी पक्ष आहे त्याच्या टीकेला काहीं च किंमत नाहीं. ज्याचा किंमत आहे ते टीका करू शकत नाहींत. कारण ते पक्षात आहेत आणि तो च पक्ष कार्य करीत आहे. दुसरा जेव्हा टीका करतो तेव्हा त्याची किंमत नाहीं च. तेव्हा पक्षातीत होऊन आणि लोकनिष्ठा बाळगून केलेली टीका च परिणामकारक होते. परिणामकारक याचा अर्थ त्याचा नैतिक परिणाम व्हावा. व्यावहारिक, तात्कालिक परिणाम झाला नाहीं तरी चालेल.

### अण्णासाहेबांचें उदाहरण

मला अण्णासाहेबांच्या उदाहरणाची आठवण झाली. त्याना जें वाटलें तें त्यांनीं राज्यपुर्नरचनासमितीच्या बाबतींत स्पष्ट सांगितलें त्यांच्याबद्दल महाराष्ट्रात भरपूर आदर आहे. ज्या पाच दहा व्यक्तींबद्दल तेथे आदर आहे त्यात त्यांची गणना होते. आदर असून सुद्धा त्याच्या या वागण्याची महाराष्ट्रात पुष्कळ विपरीत प्रतिक्रिया झाली. तरी हि कोणाची हिंमत झाली नाहीं ही टीका असद्हेतुमूलक आहे असे म्हणण्याची. त्यांचा अभिप्राय चुकीचा आहे, महाराष्ट्राला हानिकारक आहे, ते महाराष्ट्रद्रोही आहेत, येथपर्यंत हि म्हटलें गेलें परंतु कोणीं हि असें म्हटलें नाहीं कीं ती टीका असद्हेतुमूलक आहे. ह्याचा फार मोठा नैतिक परिणाम होतो. तात्कालिक परिणाम घडला नाहीं तरी वातावरण शांत झाल्यावर त्याचा प्रभाव जरूर पडेल.

### कार्यरचना

आता निवडणुकीचा काल आहे. म्हणून आम्ही अधिक योजनाबद्ध कार्य करू इच्छीत नाहीं. फक्त एक विचार आपल्यापुढें ठेवतों कीं, निवडणुकी-नंतर आपल्या कार्यकर्त्यांची अशी योजना करा. आमच्यामार्फत ज्या भू दान-समित्या बनवावयाच्या आहेत त्या सर्वसेवासंघाखातीं आम्ही जो आदर्श

ठेविला आहे तो आदर्श आणि लोकनीति मान्य करणारे लोक च त्यात असावेत. बाकीच्या सर्व लोकांचें सहकार्य आम्ही घेत राहू. ते मीं आता सांगितलें च. लोकनीतीच्या बरोबर सर्व-संमेलन हि असले पाहिजे. हे त्याचें एक अंग च आहे.

आजकाल काहीं लोक बाबाच्यावर आक्षेप घेतात. ते म्हणतात कीं, बाबाचा हा 'शंभुमेळा' आहे. म्हणजे च शंभूच्या वरातींत जसे भूत, पिशाच, प्रेत आदि लोक होते, तसे च या जमातींत सर्व प्रकारचे लोक असतात. कोणी पी. एस्. पी. वाला असतो. कम्युनिस्ट सुद्धा असतो आणि एखाद दुसरा जनसंघातला हि. काहीं लोकांना वाटते कीं अशा अयोग्य लोकांचें सहकार्य घेतल्याने कार्यांत अशुद्धि येते. यावर मी दोन दृष्टींनीं विचार करतो. एक तर आम्ही जे कार्यकर्ते नेमू आणि जे या आंदोलनाचे मूलाधार होतील त्याची लोकनीतीवर निश्चित निष्ठा असली पाहिजे. या च बरोबर आम्ही अशी योजना करू कीं सर्व लोकांना हृदयपरिवर्तनाची संधि मिळेल. जर सर्व पक्षांतील लोकांना यात दाखल व्हावयाचें असेल तर त्यांना दाखल होण्यासाठीं आम्हीं संधि द्यावी.

### अहिंसेनें हिंसा सहन करावी

हिंसेमध्ये अहिंसक मनुष्याला सहन करण्याची शक्ति नाहीं पण अहिंसेमध्ये हिंसक मनुष्याला सहन करण्याची शक्ति असली पाहिजे. हिंसक राज्य असेल तर ते अहिंसक लोकांवर बंदी घालील, स्वतंत्रपणें बोलण्याची संधि देणार नाहीं. एखाद्या वेळीं त्यांना भयंकर मानून त्यांच्या-वर भाषणबंदी घालतील. परंतु जर अहिंसक राज्य असेल तर हिंसेचा प्रचार करणाऱ्याला हि पूर्ण स्वातंत्र्य मिळेल. हिंसेची तरफदारी करण्या-साठीं जितकीं व्याख्यानें द्यावयाचीं असतील, जितके लेख लिहावयाचे असतील, तितके लिहा. आमच्या राज्यात कोणत्या हि प्रथावर बंधन राहणार नाहीं. तेव्हा च अहिंसा विकसित होईल. मी या बाबतींत अगदीं निःशंक आहें. तर अनेकांचा या बाबतींत भ्रम आहे. ते म्हणतात कीं, यामुळें भूदान आंदोलनाची हानि होत आहे. परंतु मला असें वाटत नाहीं. भिन्न भिन्न पक्षांच्या भिन्न भिन्न पद्धती मान्य करणारे हिंसेवर काहींचा हि विश्वास

असणारे, अशा लोकांच्या हातीं या आंदोलनाचें चालकत्व राहिलें तर आमच्या आंदोलनाला धोका आहे असें मला वाटत नाहीं. कांहीं प्रमाणांत आम्हीं आतां च सहन केलें आहे. परंतु पुढें आम्ही आमच्या कामांत सर्व लोकांचें सहकार्य घेण्याइतकें आमचें मन तयार झालें पाहिजे.

## अहिंसेमध्यें सर्वांना संधि देण्याची शक्ति

समुद्र कोणत्या हि ओढ्याचा स्वीकार करण्यास नकार देत नाहीं. माझ्यांत शुद्ध नदी च यावी आणि घाण पाण्याचा नाला येऊं नये असें तो म्हणत नाहीं. म्हणून आम्ही जर या आंदोलनाला 'जनआंदोलन' अथवा 'अहिंसेचें आंदोलन' म्हणत आहोंत तर अहिंसेमध्यें सर्वांना पचविण्याची शक्ति पाहिजे. आम्हीं त्याचा स्वीकार केला पाहिजे. त्यांना संधि दिली पाहिजे. समुद्र ओढ्याला संधि देतो तेव्हां आपलें सारें रूप हि त्यास देतो. म्हणजे आपलें रूप देण्यासाठीं च तो त्याचा स्वीकार करतो. त्याच्यांत हिंमत आहे. तो ओढ्याला असें म्हणतो कीं तूं आलास तर माझ्या रूपांत काय फरक पडणार ? मी माझें च रूप तुला देईन म्हणून अहिंसेंत अशी शक्ति पाहिजे कीं जे कोणी लोक येतील त्यांना ती पचवून टाकेल. यासाठीं मीं एक उदाहरण दिलें होतें कीं, जर रूळ सत्त्वगुणाचे—अहिंसेचे—असतील तर तें पुरें आहे. मग त्यावर एंजीन या डबे कोणते हि असोत. त्यांत रजोगुण असो या तमोगुण असो, आम्हांला चिंता नाहीं. परंतु त्या रुळांत कांहीं दोष असतां कामा नये. ते योग्य दिशेला च टाकलेले असले पाहिजेत. अशा प्रकारें आम्हांला सर्व लोकांचें सहकार्य घ्यावयाचें आहे. आम्हांला त्यांना संधि द्यावयाची आहे.

## मी मोठ्या पक्षाचा नेता असतों तर

समजा, ज्या पक्षाच्या विरुद्ध सामना देण्या इतपत दुसऱ्या पक्षांत कोणी नाहींत अशा एखाद्या मोठ्या पक्षाचा मी पुढारी असतों तर मीं असं जाहीर केलें असतं कीं 'सर्व पक्षांतील चांगल्या लोकांनीं मला सहकार्य द्यावें.' चांगले लोक म्हणजे ज्यांच्यांत सचोटी आहे. हिंसावाले सुद्धां सचोटीनें हिंसा मान्य करीत असतील तर ती हि एक सचोटी आहे कम्युनिस्टांची आपल्या तत्त्वावर खरी निष्ठा असेल तर त्यांत हि सचोटी आहे. असे

जितके लोक असतील त्यातून मा निवड करीन. अमक्या तमक्या मनुष्या-विरुद्ध कोणाला हि उभें करणार नाहीं ज्याना काहीं अनुयायी आहेत, जे आपले विचार– मग ते चुकीचे का असेनात – मांडू शकतात, आणि जे पैशाच्या मोहाला बळी पडणार नाहींत, अशा लोकाना मी पार्लमेंटमध्यें येऊं देईन आणि सागन कीं, मला याचे विरुद्ध कोणास हि उभें करावयाच नाहीं राजकीय पुढाऱ्याना सूचना करण्यासाठीं मी हें सागत नाहीं कारण त्याना सूचना देण्याचा अधिकार मला नाहीं जे त्या कार्यांत पडतात व त्याची जबाबदारी उचलतात अशा च लोकाना तो अधिकार आहे. माझी जबाबदारी नसल्ल बोलण आहे. म्हणून यात मी सूचना करण्याची गोष्ट नाहीं. तरी हि मा हा एक प्रकट विचार आपणासमोर माडीत आहे कारण मला कोठं मंत्रिमंडळ बनवायचें नाहीं साराश, कीं भिन्न भिन्न पक्षातील लोक या कार्यांत प्रामाणिकपण सहभागी होऊ इच्छीत असतील – मग त्याचा विश्वास हिंसेवर असो कीं अहिंसेवर असो, ते ईश्वरनिष्ठ असोत वा नास्तिक असोत – त्या सर्वांना आम्ही सहभागी करू अशी आमची वृत्ति असली पाहिजे. दुसरे पक्षीं आम्हीं मान्यता दिलेले, लोकनीतीवर विश्वास असणारे मूळ सेवक दहा वीस असून चालणार नाहीं, तर लाखोंच्या संख्येनें असले पाहिजेत.

## त्रिविध निष्ठेचें सम्मेलन

आमच्यामध्यें हि त्रिविध योग्यता विकसित झाली पाहिजे (१) अहिंसा, सत्य व अपरिग्रह याची मूलभूत दृष्टि (२) निष्कामवृत्तीनें सेवा करण्याची शक्ति आणि सकाम लोकाना सहन करण्याची वृत्ति त्या च प्रमाणें (३) लोकनीतीमध्यें श्रद्धा. अशा सर्व लोकाचें समेलन झालें पाहिजे अशी त्रिविध निष्ठा निर्माण झाली तर हिंदुस्थानात अहिंसेला साधे च नाहीं अशा तऱ्हेचे जें चित्र मीं आरंभीं रेखाटलें होतें, तसें राहणार नाहीं. माझा विश्वास आहे कीं, हिंदुस्थानात अहिंसेचा फार आदर आहे लोकाच्या अंत करणाला अहिंसा जितकी आकर्षित करते तितकी दुसरी कोणती हि गोष्ट नाहीं असा तामिळनाडमध्यें मला अनुभव आला. ज्यात हिंसात्मक भाव भरला असेल तेवढे च आमचे शब्द त्याना बोचतात तेवढें जर आम्ही

बोललों नाहीं तर त्याना काहीं च बोचणार नाहीं. ते पूर्णपणे आकर्षक होईल.

## भाषावार प्रांतरचनेचे गुणदोष

मी आता काहीं व्यावहारिक बाबतींत बोलणार आहें. हिंदुस्थानात भाषावार प्रातरचना झाली या विचारात काहीं दोष नाहीं असें मीं अनेक वेळा सागितले आहे. चागला विचार चुकीच्या पद्धतीने अमलात आणला गेला तर ती गोष्ट वेगळी परतु त्या विचारात अगभूत काहीं दोष नाहींत कोणत्या ना कोणत्या प्रकाराने तो पुष्कळ च सोडवला गेला आहे परतु थोडासा शिल्लक आहे. देशाची भाषावार प्रातरचना करणे फार लाभाचे आहे. पण त्या च बरोबर एक दोष उत्पन्न होण्याची भीति असते त्या दोषाचा प्रतिकार केला पाहिजे.

## भाषा हें विचार प्रसाराचें माध्यम

आज अखिल भारतीय सेवकत्व बनण्याला अनुकूलता दिसत नाहीं इग्रज आल्यानतर हिंदुस्थानात अखिल भारतीय नेतृत्व झाले, अखिल भारतीय सेवकत्व झाले नाहीं गाधीजींच्या सारखे थोडे च लोक अखिल भारतीय सेवक होते. त्या काळीं अखिल भारतीय नेतृत्व इग्रजी भाषेमुळ आले ही स्पष्ट गोष्ट आहे ही माझ्या दृष्टीनें गैर गोष्ट नाहीं. इग्रजी भाषेमुळें च विवेकानदाचे कार्य झाले जर विवेकानद झाले नसते तर जी स्थिति तुकारामाची होती त्याच्यापेक्षा रामकृष्णपरमहसाची अधिक चागली झाली नसता. रामकृष्णापेक्षा तुकारामाची योग्यता कमी होती असे मला वाटत नाहीं परंतु विवेकानद झाले आणि त्यानीं इग्रजी भाषेमार्फत रामकृष्णाची कीर्ति जगात पसरविली तुकारामाचे जे उपकार जगावर झाले त्यात कोणत्या प्रकारची उणीव नाहीं आणि विवेकानद झाले नसते तर रामकृष्णपरमहसाच्या योग्यतेंत कोणती हि उणीव निर्माण झाली नसती. सताच्या विचारासाठीं प्रचाराची जरूरी आहे असें मला वाटत नाहीं पण हें मान्य केलें पाहिजे कीं, आज रामकृष्णपरमहसाचें जे काम चालू आहे त्यासाठीं विवेकानद फार मोठे प्रचारक झाले आणि इग्रजी भाषेमुळ ते प्रचार करू लागले.

हिंदुस्थान रामानुजांना फार मोठे गुरु मानते. परंतु तामिळनाडमध्ये जे महान् गुरु झाले त्यांचे रामानुज शिष्य होते. त्यांच्यासमोर, ज्ञानेश्वरासमोर तुकारामाचें मस्तक जसें नत होई, तसें रामानुजाचें मस्तक नत होतें. त्या ठिकाणीं नम्मालवार यांच्यासारखे महान् गुरु झाले. नम्मालवार यांचे रामानुजांवर जे उपकार झाले ते संस्कृत भाषेमार्फत सर्व हिंदुस्थानभर पसरले.

## हिंदीनें च अखिल भारतीय सेवकत्व

आध्यात्मिक विचार पसरविण्यासाठीं कोणत्या हि माध्यमाची जरूरी नाहीं हें मी मान्य करतों. पण व्यावहारिक विचार पसरविण्यासाठीं माध्यमाची जरूरी असते. एका काळीं संस्कृत भाषेच्या मार्फत सर्व हिंदुस्थानात विचार पसरविले जात असत. नंतर इंग्रजी भाषेमार्फत तें काम झालें. आता भाषावार प्रांतरचना झाली आहे. प्रत्येक प्रांताचा कारभार त्या त्या भाषेंत चालेल आणि चालला हि पाहिजे. अशा परिस्थितींत भारतीय सेवकत्व नष्ट होईल. तें चालू ठेवायला पाहिजे असेल तर हिंदी भाषेमार्फत च तें चालू होईल. आज अखिल भारतीय नेतृत्व धोक्यात आहे. पण अखिल भारतीय सेवकत्व निर्माण होऊ शकतें. याचें उदाहरण म्हणजे आमचे प्रोफेसर बंग हे होत. ते कोणी नेते नाहींत. पण अखिल भारतीय सेवक होऊ शकतात ते सर्व हिंदुस्थानात जाऊ शकतात आणि बोलू शकतात. तसें च ओरिसातील पट्टनायक हे हि हे काम करू शकतात. हल्लीं ते जास्त फिरत नाहींत कारण ते काम करीत आहेत. जर ते फिरले, गुजराथ वगैरे ठिकाणीं गेले, आपल्या अनुभवाचे चार शब्द त्यांनीं सांगितले, तर कोणत्या हि नेत्याच्या भाषणाचा परिणाम होणार नाहीं इतका त्यांच्या शब्दाचा होईल. त्यांच्या प्रांतात त्यांचा प्रभाव पडत आहे. पण त्यांनीं प्रांताच्या बाहेर हि गेलें पाहिजे.

## अखिल भारतीय सेवकत्वाची योजना

अखिल भारतीय सेवकत्वासाठीं अधिक योग्यतेची गरज नाहीं. अखिल भारतीय नेतृत्वासाठीं योजना करणें कठिण कार्य होईल. पण अखिल भारतीय सेवकत्वासाठीं योजना करणें कठिण नाहीं. आमच्यातील कांहीं

लोक असे असावेत की ज्यांनी आपापल्या प्रांतात काम करीत असताना थोडासा वेळ दुसऱ्या प्रांतासाठीं द्यावा. मी जास्त नाहीं पण सहाव्या हिश्शाची मागणी करतों. तेव्हां लोकांनीं वर्षातील दोन महिने दुसऱ्या प्रांतातील कामासाठीं द्यावेत. ते विद्वान् असण्याची जरूरी नाहीं. परंतु ते अनुभवी असावेत. त्यांच्यात सेवावृत्ति असावी आणि त्यांनीं समाजाचें निरीक्षण केलेलें असावें. अशा लोकांनीं सर्व हिंदुस्थानभर काम करीत राहिलें पाहिजे. त्यांची संख्या कमीत कमी शंभर असावी, आणि इकडून तिकडे विचार पोंचविण्याचें काम त्यांनीं करावें.

भूदान आंदोलनासाठीं या गोष्टीची फार जरूरी आहे कारण हिंदुस्थानचें शरीर जड आहे त्याच्या एका कोपऱ्यात एखादी घटना घडली तर ती दुसऱ्या कोंपऱ्यात पोंचत हि नाहीं. 'कोरापुट' मधें इतकें ग्रामदान झालें. पण येथें तामिळनाडमध्यें त्याचा काहीं परिणाम नाहीं. साहित्याची कमतरता इत्यादि अनेक कारणें आहेत कीं ज्यांची पूर्तता आपण करूं शकू. परंतु त्यामुळें काम होणार नाहीं. साहित्य आणि वर्तमानपत्रामार्फत शहरापर्यंत च बातमी पोहोंचेल गांवोगांवीं बातमी पोंहचविण्यासाठीं शिबिर इत्यादींची योजना झाली पाहिजे आणि भिन्न भिन्न प्रकारच्या अनुभवी लोकांनीं इकडून तिकडे गेलें पाहिजे. अशी एखादी व्यापक योजना आपण आखली पाहिजे.

### प्रत्येकाच्या नांवावर एकेक जिल्हा

व्यापक योजना सखोल नसेल तर निकामी ठरेल. म्हणून आम्हाला खोलवर असणारी योजना केली पाहिजे मी यावर दोन वर्षे विचार करीत आहे. परंतु देवरभाईंनीं जेव्हां मला ही च गोष्ट सांगितली तेव्हां मला वाटलें कीं, ही सूचना व्यावहारिक आहे माझ्या सूचना व्यावहारिक आहेत कीं नाहींत याची माझ्या मनात नेहमीं शंका येते पण जेव्हां देवरभाई मला म्हणाले, 'आपण माझ्या नांवावर एक जिल्हा कां टाकीत नाहीं?' तेव्हां ती दूर झाली माझ्या मनात हा च विचार होता कीं, प्रत्येकाचा संबंध कोणत्या ना कोणत्या जिल्ह्याच्या कामाशीं असावा. आपल्या नांवावर एखादा जिल्हा असावा पण जिल्ह्यावर आपलें नांव असूं नये तसें झालं

तर बाकीचे सर्व कार्यकर्ते शून्य ठरतील आणि तो मनुष्य अहंकारी होईल. त्यामुळें तो किंवा त्याचा जिल्हा कोसळून पडेल. म्हणून प्रत्येकाच्या नावावर एक जिल्हा असावा. ऑफिसात काम करणाऱ्या मनुष्याच्या नावावर हि एक जिल्हा असावा. नाहीं तर तो ऑफिसचें काम करील. म्हणून त्याचें काम एकांगी होईल. अशा प्रकारें तीनशें जिल्ह्यासाठीं आमचेजवळ माणसें नसलीं आणि निम्म्या जिल्ह्यासाठीं च असलीं तरी चालेल तो मनुष्य त्या जिल्ह्यातील सर्व लोकांचे सहकार्य मिळवून काम करील. दोन चार लोकांनीं मिळून एक जिल्हा घ्यावा असें हि होऊ शकतें. ज्याप्रमाणें वृक्षाचा संबंध मातीशीं जोडला गेला पाहिजे तसा च आमचा संबंध हि कोणत्या ना कोणत्या जिल्ह्याशीं असला पाहिजे. नुसते आकाशात किती भटकणार ?

### अनुभवसिद्ध सल्ल्याचें महत्त्व

आमचा वल्लभस्वामी इकडची बातमी तिकडे व तिकडची बातमी इकडे पोहोंचविण्याचे व्यापारी कार्य करतो. तें काम हि चांगलें आहे. त्याची जरूरी आहे. परंतु व्यापारी कामाबरोबर च थोडें उत्पत्तीचें काम हि केलें पाहिजे. आज त्याचा सल्ला विना अनुभवाचा असतो. परंतु त्याच्या हातीं काहीं काम असेल तर तो अनुभवाच्या कसोटीवर घासलेल्या च गोष्टी सांगेल. महमदानें कुराणामध्यें किती तरी वेळा सांगितलें आहे कीं ' मी कोणी कवि नाहीं. ' याचा अर्थ असा च कीं कवीजवळ स्फूर्ति असते. मी स्फूर्तीमुळें ही गोष्ट सांगत नाहीं तर प्रत्यक्ष अनुभवानें च सांगत आहे. अशा प्रकारें प्रत्यक्ष अनुभव असेल तर आमचें काम अधिक तेजस्वी होईल. सर्व काम जनतेवर सोंपवून दिलें जावें असें व्हावयास पाहिजे आणि तो मनुष्य फक्त शून्य म्हणून रहावा. जर आम्हीं एखाद्याची नेमणूक केली तर तो शून्य होणार नाहीं. तो किती हि मोठा आकडा असो तरी तो शून्यापेक्षा कमी च होईल. कारण शून्यामागें दुसरे आकडे राहू शकतात. अशा प्रकारें तो मनुष्य दुसऱ्याकडून काम करून घेईल. सर्वोच्यामागें तगादा लावणारा तो असेल. तो सर्व काम तेथल्या माणसामार्फत च करील. असें झालें तर आमच्या अनेक अडचणी दूर होतील. केंद्रावरून संचलन करण्याचा फार मोठा भार नाहींसा होईल. स्थानिक प्रयत्नांना भरपूर वाव मिळेल. म्हणून माझी विशेष

सूचना अशी आहे कीं, प्रत्येकानें आपला संबंध एकेका जिल्ह्याशीं जोडावा आणि अशा प्रकारें जिल्ह्याजिल्ह्यातून सेवक तयार व्हावेत

## तामिळनाडचें हृदयद्वार उघडलें

आता तामिळनाडविषयीं काहीं सांगतो हिंदुस्थानात अनेक प्रश्न आहेत. त्यातील हा एक प्रश्न आहे कीं, उत्तर हिंदुस्थानचा दक्षिण हिंदुस्थानशीं, विशेषत तामिळनाडशीं, कसा संबंध जोडावा आतरिक एकता आहे च पण बाह्यएकता कशी आणावी, असा देशासमोर प्रश्न आहे म्हणून च तामिळनाडमध्यें भूदानाबरोबर अन्य गोष्टी जोडल्या आणि सर्वांचे बाबतींत लोकाना समजावीत आहोंत याचा परिणाम असा झाला आहे कीं सहा महिन्यानतर तामिळनाडचें हृदय उघडें झालें आहे

आता येथील लोक ग्रामदान देऊं लागले आहेत लोकाचा तयारी होऊं लागली आहे व ते 'हो' हि म्हणू लागले आहेत आता च मी धारापूरम् व कोईमतूर येथील लोकाना विचारलें कीं, "आपण कमींत कमी किती ग्रामदान मिळवू शकाल? कमींत कमी आकडा सागा" त्यानीं विचार करून सागितलें कीं, "आम्हाला आशा आहे कीं जर आम्ही चार पाच महिने प्रयत्न करू तर शभर ग्रामदानें मिळवू" ते हें काम करतील यात मला शका नाहीं. त कामाला लागतील त्याच्या मुखातून 'निष्ठापूर्वक' इतकें निघालें यामुळ च मला वाटलें कीं, तामिळनाडचें हृदय खुलें झालें आहे. आधीं हृदय खुलें झालें नव्हतं आता तामिळनाडमधील लोक मला आपल्यापैकीं च समजू लागले, एवढें सहा महिन्यात काम झालं

## खादीचें हि वचन

मीं तामिळनाडमध्यें जाऊन काहीं क्रातिकारी कार्य करीन अशी अपेक्षा धरली तर तो उद्धटपणा होईल तामिळनाड लोकामधील कोणी निघाले तर तें मी जाणू शकतों, परतु बाहेरचा मनुष्य येथें यावा, त्याच भाषणाचें भाषातर केलें जावें, त चागलें वाईट कसें हि असलें तरी त्याचा परिणाम व्हावा, अशी आशा करणें योग्य नव्हे. मीं हि अशी आशा बाळगली नाहीं हळूहळू आपण समाजाशीं एक होऊं या च आशेनें मीं काम केलें सहा

महिन्यात ग्रामदानी गावं मिळू लागलीं. अशीं हि काहीं गावं निघतील कीं तीं ग्रामदानाबरोबर च आमच्या दुसऱ्या विचाराचा हि प्रचार करण्याची प्रतिज्ञा करतील. असं एक गाव तयार झालें आहे त्यानें ग्रामदान तर दिलें च परंतु त्याबरोबर अशी हि प्रतिज्ञा केली कीं, आम्ही आमच्या गावीं खादी निर्माण करू आणि ती च वापरू याचा अर्थ असा कीं, या ठिकाणीं ज्याला ग्रामयोजना म्हणता येईल असं वातावरण निर्माण झालें आहे

## योजना अखिल भारतीय असावी

अशी योजना पाच हजार गावांत मिळून होऊं शकेल आणि लोक समजून, विचार करून तयार करू शकतील सर्व सेवा संघान या दिशेनें प्रयत्न करावे असें मीं म्हटलें होतें भारतांत त्याचे कमींत कमी तीन विभाग असावेत एक पूर्व विभाग. त्यांत बिहार आणि उत्तर प्रदेश असावा. दुसरा जथा येथें व तिसरा तामिळनाडमधें अशा प्रकारें तीन शाखा करून समय दृष्टीनें काम केलें तर, मला वाटतें, जसा कोरापुटमधें एक नमुना होईल, जसा बिहारमध्यें एक होईल, तसा च कदाचित् त्याच्यापेक्षा भिन्न असा एक विशिष्ट प्रकारचा नमुना तामिळनाडमधें होऊं शकेल ' विशिष्ट प्रकारचा ' अशासाठीं कीं कोरापुटचा नमुना एक मोठी ' अभ्यास शाळा ' –प्रॅक्टिसिंग स्कूल–आहे. फार मोठें पुण्यकार्य आहे तेथें आम्हाला मागासलेल्या जमातीची सेवा आणि अगदीं नवीन पद्धतीनें सर्वच्या सर्व काहीं निर्माण करण्याची संधि मिळू शकते आता ' पोस्ट ग्रॅज्युएट'–पदवी उत्तर अभ्यासक्रम–चालू आहे. आतापर्यंत जितकी विद्या मिळविली असेल त्या सर्वांची परीक्षा तेथें होईल ते एक विशेष प्रकारचें काम आहे

## तामिळनाडचें पाणी पाहिजे

तामिळनाडची गोष्ट वेगळी आहे येथील सर्व लोक समजूतदार व बुद्धिवान् आहेत ते जे काहीं करतील तें विचारपूर्वक करतील जर अशा च प्रकारें विचार करून काम करणारीं पन्नास गावें असतील तर येथें सर्वोदयाचा फार मोठा प्रयोग होऊं शकेल मीं तामिळनाड येथील लोकांना सांगितलें कीं, ' आम्ही येथील थोडें पाणी तिकडे नेऊं इच्छितों ' आपला हा जुना रिवाज च आहे कीं येथील समुद्राचें पाणी तिकडे न्यावयाचें व

तिकडचे गंगाजल इकडे आणावयाचे. आम्ही कोरापुट व बिहारचें पाणी घेऊन येथे आलों आणि ही गंगा वाहती केली. आता याचा मोबदला म्हणून आम्हाला समुद्राचें पाणी द्या. ते घेऊन आम्ही तिकडे जाऊ. तामिळनाडचे काही पाणी असले च पाहिजे. माझी अशी इच्छा आहे कीं त्या दृष्टीनें सर्व सेवा-संघाचे लोकांनीं विचार करावा आणि येथे आपलें एक मजबूत स्थान तयार करावें.

तामिळनाडला मी पूर्ण न्याय देऊं इच्छितो म्हणून ते मला जितके दिवस ठेवूं इच्छितील तितके दिवस रहाण्यास मी तयार आहें. आम्ही बाबाचा उपयोग करून घेत आहोत असें त्याना वाटले पाहिजे. बाबा त्याचा उपयोग करून घेत आहे असें त्याना वाटता उपयोगी नाही. ते बाबाच्या जितक्या वेळाची मागणी करतील तितका वेळ देण्यास बाबा तयार आहे. मीं सांगितलें आहे कीं, तुम्ही मला १२ मार्चला तामिळनाडमधून मुक्त करावें; परंतु विशेष परिस्थिति निर्माण करून आपण मला येथें ठेवून घेऊं इच्छीत असाल तरी माझी येथें राहाण्याची तयारी आहे. येथें आम्हाला पाणी मिळालें नाहीं तरी आम्हीं पाण्याशिवाय निघून जाऊं अशी मर्यादा मीं घातलेली नाही. आम्ही समुद्राची घागर भरून घेऊन जाऊं इच्छितों, एवढे च मीं तामिळ-नाड येथील लोकांना सांगितले आहे

## उपाधिरहित होऊन मुक्त विहार करण्याची इच्छा

यानंतर माझी अशी इच्छा आहे कीं, मीं नुसतें फिरत रहावें. शिबीर असेल तर शिबिरासाठीं आणि चर्चा असेल तर चर्चेसाठीं जावें. सर्वोदय इ०वर चर्चा असते च, तरी हि मुक्त विहार करण्याची माझी इच्छा आहे. आजच्या या कार्यक्रमामुळें त्रास होत आहे म्हणून नव्हे तर यापुढचें माझें काम मुक्तविहारामुळें च चांगले होईल. विशेषत. महाराष्ट्र आणि गुजराथ-मध्यें जाताना माझ्या मनात आलें कीं, हें भूदान इ०चें कवच उतरून ठेवावें. ज्याप्रमाणें बालक उघडा नागडा आईजवळ जातो तसें च तिथें जावें. मीं तिथें सांगेन कीं, " मला काहीं खास बोलावयाचें नाहीं; फक्त आपली सेवा करावयाची आहे, चर्चा करावयाची आहे, सल्लामसलत घ्यावयाची आहे. तुम्ही जें सांगाल ते ऐकण्याची तयारी माझी आहे. जर

तुम्हाला परिवर्तन–बदल करण्याची गरज आहे तर-मला हि परिवर्तन करावयाचे आहे. ” जर तामिलनाड येथील लोक मला भरलेला समुद्र-कलश देऊन पाठवतील तर यापुढें व्यक्तिगत पुण्य संपादन करण्याची मला कांहीं गरज नाहीं. आतापर्यंत जे पुण्य संपादन केलें तें व्यक्तिगत नसलें तरी त्याला व्यक्तिगत स्वरूप होतें च. तें व्यक्तिगत स्वरूप नाहींसें होऊन मी ‘ निमित्त ’–‘ केवल ’ होऊन राहीन. खरूपवच्या या ‘ केवल ’ शब्दात फार अर्थ भरलेला आहे. मला आशा आहे कीं, गुजरात-महाराष्ट्रातील सेवक या गोष्टीचें रहस्य समजतील.

गुजरात महाराष्ट्राला मी काहीं नवीन विचार देऊं शकेन असा मला अभिमान नाहीं. परंतु मीं हातीं एक काम घेतलें आहे आणि त्याकरिता सर्वांना विचार समजाविणें जरूर आहे. त्याच्या मुळाशीं काम आहे. कार्य होत राहील. आणि मला विश्वास वाटतो कीं, फार मोठें आणि सखोल कार्य होईल. पण तें पुढें न ठेवता मीं अकर्तृ-स्वरूप होऊन जावें गुजरातमधून मला पुष्कळ च मिळालें आहे. संस्कृत सोडून महाराष्ट्रातील जितकें मराठी वाङ्मय मीं वाचलें तितकें कोणत्या हि अन्य भाषेचें वाचलें नाहीं. जरी जगातील पुष्कळ भाषांचा पुष्कळ खोल परिणाम मजवर झाला आहे तरी हि मी आजारी असताना किंवा बेभान स्थितींत मला वाटत नाहीं कीं संस्कृत वा मराठीशिवाय माझ्या मुखातून सहजपणें दुसरें वचन निघेल. कारण त्या भाषा अगदीं आत खोलवर गेल्या आहेत. त्या वचनात काही विशेष शक्ति आहे अशी गोष्ट नाहीं.

एका खिश्चन मित्राशीं संभाषण चाललें होतें. त्यानें विचारलें कीं ‘ आपणाला बायबलपासून काय मिळालें ? ’ त्याच्या कधीं मनात हि न आलेल्या विशेषतः ‘ न्यू टेस्टामेंट ’ आणि ‘ ओल्ड गॉस्पेल ’ मधील गोष्टी जेव्हा मीं त्याला सांगितल्या तेव्हा त्याला आश्चर्य वाटलें. जर त्यावर व्याख्यान देण्यासाठीं मी बसलो तर हिंदुधर्मात किंवा इस्लाममध्ये नाहींत अशा कितो तरी गोष्टी जगापुढें मीं मांडू शकेन. असें आहे तरी आणि मी या अनेक भाषा शिकलों नसतों तरी माझ्या आध्यात्मिक तयारींत फरक पडला असता असे मला वाटत नाहीं असे मीं त्याला सांगितलें. कारण लहानपणीं जे

संस्कृत, मराठी आणि नंतर गुजराथी वचनें मीं वाचलीं आणि ऐकलीं तीं पुरेशीं आहेत. दुसरीं किती हि वचने मीं नंतर ऐकलीं तरी त्यानीं त्या च भावनेला पुष्टि मिळाली. त्या भावनेची शक्ति पुष्कळ च वाढली. हे बाकीच्या सर्व साहित्याचे मी उपकार मानतो. पण मला जी मूलभूत वस्तु मिळाली त्यासाठीं इतऱ्या भिन्न धर्मांच्या पासून मिळविलेल्या गोष्टींची जरूरी होती असें मला वाटत नाहीं.

सारांश, महाराष्ट्र व गुजरातमधून मीं सर्व काहीं मिळविलें आहे. म्हणून तेथें देण्यासारखें माझ्याजवळ काहीं च नाहीं. मी सेवा करण्यासाठीं तिथें जाणार आहे. आपल्या मनात मी एखादा खास विचार, एखादी उपाधि, एखादा कार्यक्रम ठेवणार नाहीं. पण असें होण्यासाठीं तामिळनाड-कडून मला एक पूर्ण कुंभ समुद्राचें पाणी मिळाले पाहिजे.

## आजारासाठीं क्षमा याचना

मी आजारी पडलों याची मला काहींशी लाज वाटते. हें आजारपण एव्हं घडलें असतें असे मी मानतों ,आणि या परिस्थितीला पुष्कळ कारणें आहेत असे मला वाटत नाहीं. मनुष्याचे हातून अनेक चुका होतात कीं ज्याचें त्याला भान नसते. ती जी उणीव आहे ती मीं पाहिली. मीं आजारी पडता कामा नये. मी गीतेवर टीका लिहीत असता ' गीताई कोषात ' एक टिपणी दिली आहे : सत्त्वगुणाचें लक्षण भगवद्गीतेंत दिले आहे. ते असें— ' प्रकाशकम् अनामयम् । ' अर्थात् तो ज्ञानरूप प्रकाशमय असतो आणि त्यात आमय म्हणजे रोग नसतो, तो आरोग्यदायी असतो. नेहमीं आपल्या देशात असें मानण्यात आलें आहे कीं सत्त्वगुणी लोक नीतिवान्, बुद्धिवान् व चरित्रवान् असतात. परतु ते निःसंशय तीव्र बुद्धीचे असतात असें मानलें गेलें नाहीं. ' सत्त्वगुणी माणसें च बुद्धिवान असू शकतात ' हा च त्या गीता-वचनाचा अर्थ आहे. त्या च बरोबर असे हि मानण्यात आले नाहीं कीं ' सत्त्व-गुणी मनुष्यानें आजारी पडता कामा नये. जेथें आचार आहे तेथे थोडासा तरी रजोगुण, तमोगुण आला च. ' पण शेवटीं हा प्रकृतिधर्म–निसर्गधर्म आहे व तो ईश्वराचे हातीं आहे. सत्त्वगुणाबरोबर आरोग्याचा विशेष संबंध नाहीं असें मानलें जातें. तरी हि त्या वचनावर माझा विश्वास आहे. मला

वाटतें, सत्त्वगुणात जशी नीति व चारित्र्य असते तशी च कुशाग्र बुद्धि व संपूर्ण आरोग्य असलें पाहीजे. अन्यथा सत्त्वगुणात काहींतरी उणीव राहिली असे वाटते व अनुभव हि असा च येतो. जेव्हा या गोष्टीचे आकलन झाले तेव्हापासून कधीं काहीं चूक घडल्याशिवाय मी आजारी पडलो नाहीं असा अनुभव येऊ लागला. काही ना काहीं चूक झाली आणि ती चूक आढळून हि आली म्हणून मी आपली क्षमा मागतों.

पलनी ( मदुराई )
-२०-११-'५६

## ' सत-आयन 'चा आवाज : ३५ :

हल्लीं माझ्यात अत्यंत एकाग्रता आली आहे. कोणते हि काम घेतले तर ते एकाग्रतेनें करण्याची मला सवय च आहे. परंतु सध्या एक विशेष प्रकारचा मानसिक अनुभव येत आहे आता च शंकररावजींनीं त्याचें वर्णन केले आहे. त्याचा उच्चार करण्याची माझी इच्छा नव्हती, परंतु यात्रेला निघण्यापूर्वी मला मूर्च्छा आल्यासारखें झालें, म्हणून मी थांबलों मला पहिल्यापासून च आज वाटत होतें कीं, मी यात्रा करू शकणार नाहीं. तरी अनुभवाशिवाय अंदाजानें निर्णय घेणें योग्य नाहीं म्हणून मी निघालों.

हा एक प्रकारचा अविवेक च समजला जाईल; पण हा एकाग्रतेचा परिणाम आहे पतंजलींचे एक सूत्र आहे—"ततः पुनः शान्तोदितौ तुल्य प्रत्ययौ चित्तस्यैकाग्रता परिणाम ।" एका क्षणात जी भावना शान्त होते आणि दुसऱ्या क्षणीं जी भावना निर्माण होते त्या दोन्ही भावना जेव्हा तुल्यबळ होतात तेव्हा एकाग्रतेचा परिपाक झाला असें समजलं पाहिजे. म्हणजे एक च भावना सतत कायम राहावी असें ते सांगत नाहींत, त्याला हि एकाग्रता म्हणतात. पण या सूत्रात जें सांगितलें गेलें आहे तो एकाग्रतेचा परिपाक आहे. एक च भावना कायम राहाणें वेगळी गोष्ट आहे. भावना प्रत्येक क्षणीं निर्माण होते आणि लीन होते. अशी निर्माण

होणे आणि लीन होणे या क्रिया चालू राहातील तर तो प्रवाह चालू राहील; परतु लीन झाल्यावर उठणारी भावना ती च असेल, ती च भावना परत परत उठून लीन होत असेल, तर तो एकाग्रतेचा परिणाम आहे. हल्लीं मला त्याचा अनुभव आला. येथ अनेक प्रकारची चर्चा झाली यात्रेत हि अनेक विषयावर चर्चा चालते; त्या पण साऱ्या चर्चा वरवर च होतात; पण आत मा त्र त्याच क्रान्तीच्या कल्पनेचा जप चालत राहातो असा मला अनुभव येत आहे.

## जगाची संशयाकुल अवस्था

आता च एका मित्रानी सागितलें कीं, 'सत्तावन्न सालीं चमत्कार होऊ शकेल ' एक विचित्र'गोष्ट आहे. नुकतीच हगेरी, पोलड इ० ठिकाणीं गडबड झाली असें दिसते कीं, जेव्हा रशिया हगेरीवर आपले वर्चस्व निर्माण करीत आहे त्या च वेळीं तो असे हि सागत आहे कीं, " आम्हीं निःशस्त्रीकरणास तयार आहों. आम्हीं आपले ॲटम व हैड्रोजन बॉम्बचे प्रयोग हि बद करण्यास तयार आहोंत. आटकच्या ' शस्त्रास्त्रशक्तीची खुली तपासणी व्हावी. ' " या सूचनेंत काहीं परिणामकारी अर्थ आहे असें आम्हाला वाटत नाहीं. तरी हि ' त्यासाठीं आम्ही तयार आहोंत. ' प्रथम ते याला तयार नव्हते. साराश, मोठ्या राष्ट्रानीं इतकी च सेना ठेवावी असें जें चालू आहे ते केवळ ढोंग आहे असें नाहीं. असे स्पष्ट दिसते कीं देशातील निवडक नेत्याच्या, ज्याच्यावर देशाची जबाबदारी आहे अशाच्या, बुद्धींत खूप खळबळ चालू आहे याचीं कित्येक उदाहरणे आहेत परस्पर-विरोधी आरोप केले जातात; त्यावून काहीं हि मार्ग निश्चत नाहीं; काहीं सुचत नाहीं. इकडे तर सैन्यावरची श्रद्धा सोडवत नाहीं, आणि तिकडे सैन्यावर पूर्ण श्रद्धा बसत नाहीं. जेव्हा एखादी श्रद्धा असेल–मग ती चुकीची का असेना–तेव्हा च कर्मयोग चालतो. जरी परिणाम वाईट झाला तरी कर्मयोगासाठीं निश्चय हा असला च पाहिजे, परतु आज जबाबदार नेत्याची मन.स्थिति अशी झाली आहे कीं, त्याचा कोणत्या च गोष्टीबाबत निश्चय होत नाहीं, ते सशयाकुल अवस्थेत आहेत. अशा वेळीं जो आपली बुद्धि निश्चित राखू शकेल, नि.सशय व शात ठेवू शकेल, त्याच्याकडे च

जगाचें नेतृत्व येईल. त्याला नेतृत्व करण्याची इच्छा नसली तरी तें करावें लागेल.

## अहिंसेच्या दिशेनें विचारप्रवाह

आज तर असें दिसून येतें कीं विश्वयुद्ध केव्हां होईल, हें कोणी हि सांगूं शकत नाहीं. तरी हि मला वाटतें कीं, ज्या शक्ती काम करीत आहेत त्या अहिंसेच्या दिशेने च कार्य करीत आहेत. अहिंसेला संधि देण्यापूर्वीं कोणी न योजता च एखादे वेळीं गडबड उडून जाईल तर ती वेगळी गोष्ट आहे. या बाबतींत कोणी च कांहीं सांगू शकत नाहीं. पण मला मात्र यांत कांहीं संदेह वाटत नाहीं. जितका मी विचार करतों तितके मला हें च दिसतें कीं, साऱ्या वृत्ती एका च दिशेकडे येत आहेत. आम्ही येथें म्हणत आहोंत कीं, ' निवडणुकीच्या पद्धती चुकीच्या आहेत पक्षीय राजकारण ( पार्टी पॉलिटिक्स ) चांगलें नाहीं. लोकशाहींत सुधारणा झाली पाहिजे इ० गेलीं दोन चार वर्षें आम्ही हे विचार बोलत आहोंत. परंतु ज्यांच्याकडून अशी अपेक्षा नव्हती अशा लोकांना आज ते सुचूं लागले आहेत. आज कॉंग्रेसच्या नेत्यांना हि असेंच वाटूं लागलें आहे. हें सर्व कोण करीत आहे ? आमच्या विचाराचा हा परिणाम आहे असा दावा मी करूं शकत नाहीं आणि करणे हि चुकीचें आहे.

खरें पाहिलें तर जगात अशी एक शक्ति आहे. ती विचार सुचवीत आहे. म्हणून समान-रूपांत विचार-प्रवाह चालू आहेत. वेदात याना ' मरुद् गण ' म्हणतात. हे वायूपेक्षा भिन्न, स्थूल वस्तुरूप आहेत. मरुद्गण चिन्तनयुक्त व प्रवाही आहेत. याचा अर्थ असा कीं चिन्तन प्रवाह चालू रहातात. सुरुवातीपासून च ते चालू आहेत एकेका काळीं भिन्न भिन्न ठिकाणीं अनेकांना एक च विचार सुचतो. काळाच्या दृष्टीनें असें म्हटलें जातें कीं अमक्याला हा विचार अगोदर सुचला व तमक्याला नंतर. ज्याला प्रथम सुचला त्यानें प्रेरणा दिली असें म्हणणे चुकीचें आहे. एखाद्याला आधीं सुचला ही आकस्मिक घटना आहे. मरुद्गण शाश्वत आहेत आणि मला त्याचा क्षणोक्षणीं प्रत्यय येतो.

जेव्हा आम्ही वर्तमानपत्र वाचतो तेव्हा तुलसीदासजींनीं म्हटल्याप्रमाणे वाटू लागतें. **"शतरंज कोसो समाज, काठको सबै समाज।"** बुद्धिबळाचा खेळ चालू आहे सर्व लाकडी हत्ती, घोडे आहेत. लाकडा-शिवाय कोणती हि वस्तु नाहीं. उगीच च त्यात भेदभाव निर्माण करून आम्ही खेळत आहोत. हा सर्व खटाटोप व्यर्थ च चालू आहे. शस्त्रास्त्र वाढवा, बॉम्बचे प्रयोग करा, इत्यादि निरर्थक खेळ चालू आहेत. तरी हि सर्व शक्तींचा उद्देश निश्चितपणें अहिंसेत परिवर्तित होणार आहे यात मला संशय नाहीं.

## अचिंत्य शक्तीचा चमत्कार

१९५७ मध्ये काय होईल आणि काय होणार नाहीं हे कोणी सांगू शकत नाहीं, पण काय समजून आम्हीं १९५७ चा उच्चार केला हें हि सांगू शकत नाहीं. असें मात्र खास वाटतें कीं, अनेकांची इच्छाशक्ति एकत्र येत आहे. (मी एक विचित्र शब्दप्रयोग करीत आहे) सहजगत्या 'अनिच्छेनें इच्छाशक्ति एकवटत आहे'. कारण, ज्यांच्या विचारात खूप फरक होता त्यांचे विचार हि जुळू लागले आहेत. ते जवळ येत आहेत. हिंदुस्थानातील कम्युनिस्टांच्या मागें एक जुना इतिहास आहे, त्यांचे काहीं प्रकार लोकांना माहीत आहेत. म्हणून पुष्कळ लोक त्यांच्याकडे सशंकित दृष्टीनें पाहतात; पण ते संशयाला नव्हे तर सहानुभूतीला पात्र आहेत. नि संशय ते अहिंसे-कडे येत आहेत. आता च श्रीमन्‌जी म्हणाले कीं, कम्युनिस्टांनीं आपली चाल बदलली असें नाहीं; पण त्यांनीं ती जाणूनबुजून ती बदलली असेल. पण त्यांचे विचार निश्चितपणें अहिंसेकडे येत आहेत असें मी समजतों. हिंदुस्थानात आणि बाहेर हि अशी परिस्थिति निर्माण होत आहे. कम्यु-निस्टांची पद्धत च सुरीची आहे. प्रतिकाराची शक्ति येईपर्यंत ते असें च करीत राहतील इत्यादि गोष्टी मी मानीत नाहीं. आज हि त्यांच्यात प्रतिकाराची शक्ति आहे. तरी हि त्यांना आपली सुरीची कल्पना सोडणें भाग पडत आहे. एक अशी शक्ति आहे कीं, जी भूदानाची प्रेरणा देत आहे आणि ती च कम्युनिस्टांच्या विचार चिंतनात परिवर्तन घडवीत आहे.

## ही परवशता हि गौरवाची गोष्ट आहे

त्याना उत्तर मिळेल इतका भूदानाचा विचार शक्तिशाली करूं शकलो नाहीं. काय प्रयत्न केला आहे ? थोडेसें भटकतों व लोकाना समजावितो. परतु आता च विमला म्हणाली कीं, 'आम्हा कोठच्या कोठे गेलो आहोंत'. एखाद्या आन्दोलनाची फलश्रुति मोजावयाची असेल तर किती एकर जमीन मिळाली इ० गाष्टींवरून मोजता येणार नाहीं तें कार्य एका दिवसात होऊ शकेल. त्याचें गणित करायला नको पण 'कल्पनेमध्ये आम्ही कोठच्या कोठे गेलो' हे पहावें लागतें. तें हि विचार करून गेलों नाहीं. 'भूदानातून ग्रामदान निघेल, नतर आम्ही ग्रामराज्यापर्यंत पोचू. स्वतत्र जनशक्तीचा विचार करू व शासनमुक्त समाजाकडे जाऊ.' या सर्व गोष्टी आम्हाला स्वत.ला च माहीत नव्हत्या 'शासनमुक्त समाज' शब्द सुद्धा नतर च निघाला. मला तो प्रथम सुचला हि नव्हता. अभावित रूपानें मीं याचा उच्चार केला असेल. आणि यासाठीं एखादा अभावित शब्द हि पहिल्यापासून रूढ असेल. परतु जे आठवतें तें हें च कीं याची कल्पना गेल्या दोन तीन वर्षांत च स्पष्ट रूपाने मला आली. आधीं तशी ती नव्हती. अशा प्रकारे एक योजना होऊन राहिली आहे आणि या योजनेंत आम्ही सर्वजण काम करीत आहोत

यात परवशता आहे असा आक्षेप घेतला जाईल हे मी कबूल करतों. आणि यात च त्या कल्पनेचा गौरव आहे असें मानतों. यात परवशता अवश्य आहे. परतु 'पर' म्हणजे दुसरा नव्हे 'परम तत्त्व' अथवा परमेश्वराची च वशता आहे. आपण केवळ एक त्याच्या हातचे अवजार आहों असा अनुभव येतो तेव्हा च कार्य होतें. मला तसा अनुभव येत आहे म्हणून आम्ही केवळ आमच्या बुद्धीनें चाललों तर या कार्याला न्याय मिळणार नाहीं. माझें असें म्हणणे नाहीं कीं, आपण आपल्या बुद्धीचा उपयोग च करू नये. परमेश्वरानें ज्याना बुद्धि दिली आहे त्यानीं तिचा उपयोग करावा च. मला फक्त एवढें च सागावयाचें आहे कीं, बुद्धीच्या उपयोगाला सुद्धा मर्यादा असते. जेथें आमची बुद्धि पोचत नाहीं त्या क्षेत्रात या शक्ती काम करीत आहेत.

### पंडितजींचें मन हि याला अनुकूल आहे

मीं निवडणुकीवर टीका केली. हा माझा स्वतंत्र विचार नाहीं. गांधीजींनीं हि हे च सांगितलें होतें. गयेमध्यें हि जेव्हा मी यावर प्रथम माझे विचार प्रकट केले त्या वेळीं या विषयावर मीं आधींपासून च कांहीं विचार केला नव्हता. मीं पंडितजींना पत्र पाठविलें कीं, जर आपण संमेलनाला याल तर मला बरें वाटेल. त्यांच्यामागे अनेक कामे आहेत. ते सर्व गोष्टी जाणतात. कोठे जायचें उचित इत्यादि ते ठरवू शकतात. अशाना मीं पत्र लिहिणें उद्धटपणाचें होतें. माझ्याकडून असें वर्तन कधीं होत नाहीं; परंतु त्या वेळीं मी पत्र लिहिलें; आणि ते हि पुष्कळ कष्ट सोसून आले. मला वाटलें कीं, मीं कांहीं विचार त्यांचेसमोर ठेवावे. त्यामुळें कांहीं ज्ञानचर्चा होऊं शकेल. गीतेंत सांगितलें आहे कीं, " तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया। " त्याप्रमाणे च फक्त कांहीं परिप्रश्न करण्याच्या नम्र विचारानें च मीं दोन तीन गोष्टी त्यांच्या-समोर ठेवल्या. सर्व प्रश्न त्यांच्यासमोर ठेवण्याचा माझा विचार नव्हता. त्यांचीं लगेच उत्तरें मिळावीं असें हि मला वाटलें नव्हतें. सहजपणें कांहीं विचार मांडले होते. १९४८ सालीं वर्ध्याच्या पहिल्या सर्वोदय संमेलनात मी अशा प्रकारचे कांहीं विचार मांडले ते अचानक च माझ्या मनात आले होते. त्या वेळीं त्यांनीं कांहीं उत्तरें दिलीं. स्वाभाविक च त्यात कांहीं निश्चयवृत्तीची अपेक्षा नव्हती आणि तसा संभव हि नव्हता, परंतु दोन वर्षांनीं पुन्हा ते भेटले; तेव्हा त्यांचें मन त्या विचाराकडे वळल्याचें मला दिसून आलें. ही सर्व अहिंसेची तयारी आहे. एस्. आर. सी च्या बाबतींत अशा कांहीं घटना झाल्या त्यावरून नियतीची कांहीं योजना चालू आहे असा भास होत आहे.

### आम्हीं क्रांतीसाठीं तयार असावें

आम्हीं आपल्या बुद्धीचा उपयोग करून आपले विचार खंडित अथवा कुंठित करू नयेत. कांहीं लोक म्हणू शकतील कीं, आतापर्यंत जें झालें त्यापेक्षा १९५७ मध्यें जास्त काय होणार? त्यांचें म्हणणें योग्य च होतें; जर आम्हीं केवळ आमच्या शक्तीनें काम केलें असतें तर हें काम १९५७ पर्यंत च काय पण शंभर वर्षांत हि पूर्ण झालें नसतें यात मला थोडा हि संदेह

नाहीं, कारण ही हृदयपरिवर्तनाची गोष्ट आहे. जर कायदा किंवा रक्त-क्रांतीची गोष्ट असती तर वेगळी गोष्ट होती, पण आम्हाला कायद्याचा उपयोग करावयाचा नाहीं. कारण त्यात लाभाऐवजीं हानि च आहे. आम्हीं हृदय परिवर्तनानें मालकी सोडवू इच्छितो. तें काम आमच्या शक्तीन होणारें आहे. तरी हि आम्ही समजतों कीं, हे काम होईल, होऊ शकेल व झाले पाहिजे. कारण जगातील सर्व शक्ति आम्हाला तिकडे च नेत आहत. मी तुम्हाला इतके च सागू इच्छितो कीं, यात मीं बुद्धीचा उपयोग केला नाहीं आणि तुम्ही हि करु नका येथें बुद्धीच काम नाहीं. १९५७ मध्ये जगात क्राति होणार आहे अशी आपल्या मनाची तयारी करा. त्यासाठीं आत्मसमर्पण करण्याची तयारी ठेवली पाहिजे, कारण संधि आली होती आणि आम्ही गैरहजर राहिलो अस होऊ नये. संधि आली नाहीं तर गोष्ट वेगळी. विनोदाने याला मी ' नाटक ' म्हणतो. नाटक म्हणजे काहीं मिथ्या गोष्ट आहे अस नाहीं, तो पूर्वप्रयोग आहे. त्याला इग्रजींत रिहर्सल म्हणतात.

## ३१ डिसेंबरला दोर कापून टाका

अण्णासाहेब सहस्रबुद्धे यानीं निधि वगैरेंची गोष्ट सागितली. तें ऐकण्यात हि मला गोडी नाहीं असे मी सागू इच्छितो. आम्हाला १९५७ पर्यंत जी निधिमुक्ति करावयाची आहे ती आम्ही हळू हळू करू अस जें सागितले गेलें त्यात काहीं तथ्य नाहीं. त्यात कमकुवतपणा आहे. हा दोर तोडला च पाहिजे. त्यातून एकदम नैतिक शक्ति निर्माण होईल आज पुष्कळाच्या मनात हा भ्रम आहे—जो केवळ भ्रम नव्हे तर त्यात काहीं तथ्य हि आहे. पण भ्रम अधिक आहे कीं भूदान आदोलन पगारी कार्यकर्त्यांच्या मार्फत चालू आहे. मीं तामिळनाडमध्यें पाहिलें आहे कीं, सध्या येथें सुमारें पाचशें कार्यकर्ते काम करत असतील. त्यातील फक्त पन्नास पगारी कार्यकर्ते असावेत. आज हिंदुस्थानात जास्त बेकारी आहे. म्हणून ज्याला नोकरी मिळते तिकडे सर्वांचें लक्ष जातें. या बाबतींत हि तसें च घडलें. भूदानात काहीं लोकाना काम मिळाल तेव्हा काहीं लोकाचें लक्ष इकडे वेधलें गेलें. परिस्थितीमुळें च हें सर्व झालें. परतु हा भास निर्माण करण्यास आम्ही

जबाबदार आहोंत कारण आम्हाला वाटतें कीं, पगारी कार्यकर्त्यांशिवाय आमचें काम चालणार च नाहीं. याचा अर्थ असा कीं, पगारी कार्यकर्त्यांच्या भरवशावर च आमचें काम चालू आहे म्हणून ही गोष्ट एकदम तोडून टाका आणि जाहीर करा कीं ' आता १९५७ साल येत आहे. म्हणून या वर्षाच्या ३१ डिसेंबरपासून सर्व पगार बंद होईल. बजेट वगैरे कांहीं मांडले जाणार नाहीं. ' तेव्हां च आम्हाला प्रांतीचे दुसरे रस्ते सुचतील. मग संपत्ति दान इत्यादि सुद्धा सुचेल. सर्वांत मोठी गोष्ट सुचेल जिच्यापुढें संपत्ति दान फिकें पडेल. ती म्हणजे सूत्रदान आणि सूत्रांजलि. इतकी शक्तिशाली गोष्ट आमच्याजवळ आहे. तरी हि या जिवंत प्रवाहाकडे आम्ही लक्ष देत नाहीं. कारण एक जुना प्रवाह चालू आहे. आम्ही जास्तींत जास्त सूत्रांजलि आणि सूत्रदान याजपासून प्राप्त करून घेऊ आणि बाकीची संपत्ति दानानें प्राप्त करूं. म्हणून एकदा असें करावें च लागेल कीं, एका विशिष्ट तारखेपासून निधि वगैरे सर्व बंद.

पुष्कळ वेळा जेलमध्यें एक प्रयोग चालत असे त्याची मला आठवण येते. धोक्याची घंटा वाजत असे आणि सर्व लोक एका ठराविक जागेवर एकत्र होत असत. जर खराखुरा धोका उद्भवेल तर कसें वर्तन केलें पाहिजे ह्याचा सर्व प्रयोग चालत असे. तें सर्व खोटें होतें तरी सुद्धां आम्ही ज्या ठिकाणीं असू तेथून धावत च त्या जागेवर जात होतों. त्या च प्रमाणें एकदा ३१ डिसेंबरला सर्व कांहीं बंद असें करून टाका त्यामुळें चोहींकडे काम बंद पडेल अशी शंका येईल पण त्यामुळें कांहीं बिघडणार नाहीं. असें ठरवून आम्ही असें करूं कीं, " सर्वजण एकमेकाला सांभाळू आणि कोणाचा हि त्याग करणार नाहीं. आमच्याजवळ जे कांहीं आहे तें वाटून खाऊं. " त्याच्याशिवाय शक्ति वाढणार नाहीं. क्रांतीच्या उदयाच्या वेळेस आम्ही झोंपून राहू आणि क्रांति संपल्यावर जागृत होऊं तर क्रांतीचा अर्थ काय ? क्रांति आली आहे. त्याची हवा पसरली आहे. अशी आमची श्रद्धा असावी आणि त्यासाठीं आम्ही आपलें मन तयार ठेवावें. परंतु जर आम्हीं आपल्याला या बंधनात जखडून टाकलें तर क्रांति येईल हि आणि आम्ही मात्र म्हणत राहू कीं सत्तावनमध्यें आम्ही असा विचार करूं आणि तसें

वरू. म्हणून '५७ सालापूर्वी जे करणे ते केले पाहिजे म्हणजे बऱ्या च गोष्टी आपल्याला सुचू लागतील.

**प्रत्येक जिल्ह्याशीं चेतनसंबंध**

मला वाटत कीं, प्रत्येक जिल्ह्याशीं एखाद्या माणसाचा संबंध असावा. ज्याला आत्मविश्वास वाटेल तो काम करील. आम्ही हि आमच्या मनात त्याचें नाव ठेवू. आमची ही योजना क्रांतीकडे नेणारी आहे. हिंदुस्थानात तीनशे जिल्हे आहेत. त्यासाठीं तीनशे माणसांची गरज आहे. सर्व सेवा-संघाचे मार्फत सर्वसाधारण प्रकाशन, साप्ताहिक इ० गोष्टी चालतील त्या-पासून त्यांना प्रेरणा मिळत राहील. ते लोक जनतेत जाऊन काम करतील. नंतर असा अनुभव येईल कीं, हें कार्य कांहीं जिल्ह्यात चालेल व कांहीं जिल्ह्यात चालणार नाहीं. क्रान्तीच्या विचाराच्या दृष्टीनें ही सूचना मी फार च महत्त्वाची समजतो. प्रत्येक जिल्ह्याशीं मी चेतनेचा—जिवत—संबंध जोडू इच्छितो. जेथ समिति असेल तेथें सर्व एकत्र होतील. पण तेथें चेतना कमी आणि समूह जास्त असे होत. जेव्हा जिल्ह्यासाठीं एक च व्यक्ति असेल तेव्हा तेथें जिवत संबंध राहील. ती व्यक्ति एकटी च आहे म्हणून शून्य बनून वागेल आणि सर्वांशीं संबंध जोडील. त्याला बाहेरून कांहीं हि मदत मिळणार नाहीं. म्हणून नम्रतेन तो सर्वांची मदत घेईल, सल्लामसलत करील. अशा प्रकारें एकेका 'चेतने'जवळ एकेक जिल्हा राहील. या योजनेंत धोका असू शकतो. एखादा मनुष्य कमी शक्तिशाली असेल तर तेथें काम कमी होईल. जेथ अयोग्य माणूस असेल तेथ काम हि अयोग्य होईल. परंतु अशा मोठ्या क्रांतींत धोके असले तरी ते पचून जातात. त्या-पासून कांहीं नुकसान होत नाहीं. त्यात पुष्कळ च अनुभव येतो. त्यात क्रांतीच्या तयारीची गोष्ट आहे.

**धनच्छेदापासून क्रान्तीकडे**

मीं धनच्छेदाची गोष्ट सांगितली. समजा कीं, आज इथ आलेल्या सर्व लोकांनीं निश्चय केला कीं, आजपासून आम्ही पैशाच्या उपयोग करणार नाहीं. आता या बैठकीतून परत जाण्यासाठीं पैसे नसल्यास पायीं जाऊ तर एका क्षणात आम्हाला या क्रान्तीचें दर्शन घडेल. लोकांना हि त्याचें दर्शन

पडेल की, हे लोक कसे वेडे झाले आहेत. बैठकीसाठीं आले आणि परत जाण्यासाठीं पैसा नाहीं म्हणून पायीं जात आहेत. अशा प्रकारचें वेड आमच्यात संचारलें पाहिजे. मी असें सुचवीत नाहीं, आपण या च क्षणीं पैशाचा त्याग करा, पण ३१ डिसेंबरला जाहीर करा कीं, आम्हीं सर्वच्या सर्व सोडलें आहे

मला एक जुनी गोष्ट आठवली. एकदा भूकंप होत होता. रात्रीची वेळ होती. मी खोलींत बसला होतों. एक क्षणभर मनात विजेसारखा विचार चमकून गेला कीं बाहेर पळालों तर वाचू शकेन, परंतु मला अचानक गीतेचें स्मरण झाले आणि मी तिथें च बसून राहिलों गीता अशी आई आहे कीं, ती तात्काळ धावत येते मीं विचार केला कीं, जर पळून बाहेर गेलो तर जसा वाचण्याचा संभव आहे तसा मरणाचा हि संभव आहे जर मी वाचणार असेन तर बसून राहिल्याने हि वाचेन, पळण्यानें हि वाचू शकेन आणि मरणार असल्यास पळून जाण्यानं हि मरून जाईन, म्हणून पळण्यात अर्थ नाहीं जर मृत्यु येणार च असल तर असेल नसेल ती श्रद्धा एकवटून परमेश्वराचें स्मरण करता करता मरावें पळून जाताना येणाऱ्या मृत्यूपेक्षा दुसरें वाईट मरण नाहीं तसा च जर आपण आता निश्चय करू कीं, निधि वगैरे सर्व बंद करावयाच आहे, तर त्याचा आमच्यावर विजेसारखा प्रभाव पडेल. सर्व हिंदुस्थानावर त्याचा प्रभाव पडेल आमच्या या निश्चयातून अशी एक गाठ निघेल कीं, त्यामुळे सर्वांच अनेक संशय नाहीसे होतील ही हि एक क्रांतीची च गोष्ट आहे, म्हणून याचा आम्हीं मनात निष्ठापूर्वक संकल्प करावा

## १९५७च्या संकल्पानें च देशाची अब्रू राहील

आपण लोकांनीं संमेलन भरवायचे ठरविलें हे ठीक च केलें. त्याच्याशा अनुकूल, प्रतिकूल अनेक विचार प्रकट केले गेले या वर्षीं जी निवडणूक होइल तिला आमच्या दर्शन पुष्कळ मदत होइ साडेपाच वर्षांनतर आज सर्व राजनैतिक पक्षांची सहानुभूति भूदानाला प्राप्त झाली आहे. जे लोक राजनैतिक पक्षात नाहींत त्यांची हि सहानुभूति मिळाली आहे लोकांना वाटते कीं, यात क्रांति आहे. हेंत १९५७ची गोष्ट दुसरी आहे.

'५७च्या संकल्प आम्ही व्यक्तिगत संकल्प समजत नाहीं आणि तसा ते लोक हि समजत नाहींत पाच कोटी एकराचा संकल्प पुरा व्हावा असे मानणारे कांहीं लोक काँग्रेसमध्ये हि आहेत मला वाटतें कीं, या कामीं आपली शक्ति लावण्याचा त्यांचा संकल्प हि आहे. लोकांना वाटत कीं, निवडणुकीमुळें आमच्यामागें अनेक भानगडी आहेत पण एकदा निवडणूक झाली, कांहीं व्यवस्था झाली, तर त्यानंतर संमेलनाचा उपयोग '५७च्या दृष्टीनें अवश्य करिता येईल तोंपर्यंत आम्ही आमचें काम जोरानें करीत राहू आणि अवश्य कांहीं करू शकू कारण आम्हीं ३१ डिसेंबरपासून 'धनच्छेद' केला असेल जिल्ह्याजिल्ह्याशीं कोणाचा तरी संबंध येईल आणि त्यापासून कामाला वेग मिळेल

निवडणूक संपल्यावर देशासमोर एक प्रश्न उभा राहील. जे लोक भूदानाबद्दल सहानुभूति बाळगतात, परंतु अजून जे कार्य करू शकले नाहींत — विशेषत त्यांच समोर प्रश्न उभा राहील कीं, ज्याबद्दल सर्व देशात इतका बोलबाला झाला आहे त्या एवढ्या मोठ्या संकल्पाला आम्ही पराभूत होऊ देणार काय? आम्ही असे च बसून रहाणार आणि या लोकाची फजिती होऊ देऊ? यामुळें देश, राजनैतिक पक्ष, वा सरकार यांचा काय मान राहील? ही गोष्ट स्पष्ट च आहे कीं, सर्व लोक हा च विचार करतील कीं, हें काम थांबलें तर सर्व देशाच्या प्रतिष्ठेची च हानि होईल प्रत्येक गावातून हा च आवाज उमटेल सर्वांचीं मनें आम्हाला मदत करण्यास तयार होतील अशा दृष्टीनें संमेलन हा एक असा प्रसंग असेल कीं, त्यात सर्वांकडून च एक मोठा संकल्प होईल आणि सर्व लोक जोरानें काम करू लागतील मग हें काम दोन चार महिन्यात पूर्ण होण्यास कोणती च आडकाठी राहाणार नाहीं

## एका दिवसात वाटप का होऊ नये?

मीं नित्येक वेळा दिवाळीचें उदाहरण दिलें आहे आता मला एक नवीन उदाहरण मिळालें पंडित नेहरूनीं सांगितलें कीं, 'निवडणुकींत पुष्कळ शक्ति क्षीण होते द्वेष वाढतो म्हणून सुरुवातीला आम्हीं पंधरा दिवसात, पुढें सात दिवसात व नंतर एका दिवसात सर्व निवडणुकी पु या

करू.' सर्व निवडणुकी एका दिवसात पुन्हा होतील अशी व्यवस्था होऊं शकेल यात मला संदेह वाटत नाहीं. जर अप्रत्यक्ष निवडणुकी करायचे ठरेल तर ते आणखी च शक्य होईल. जेव्हा मला हे उदाहरण मिळालें तेव्हा मला मोठा उत्साह वाटला. पंडित नेहरू एका दिवसात निवडणूक करायची म्हणतात तर एका दिवसात जमिनीचें वाटप का होऊ शकणार नाहीं? सर्व देशाची इच्छाशक्ति जागृत झाल्यावर काहीं महिन्यात हें काम होऊ शकणार नाहीं असें मुळीं च नाहीं. आमची कल्पनाशक्ति च संकुचित आहे १९५७ मधें फक्त पाच कोटी एकरांचें वाटप च नव्हे, फक्त भूमि क्रांति च नव्हे, तर सर्व जगात शांतीची स्थापना होऊं शकेल. आज सर्व जगाचे डोळे हिंदुस्थानकडे लागले आहेत. त्यासाठीं आम्हीं आपलीं मनें तयार केलीं पाहिजेत.

**परमेश्वर आला आहे**

गीता सांगते—

> "यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
> अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥"

म्हणजे जेव्हा जेव्हा धर्माची ग्लानि होते तेव्हा परमेश्वर अवतार घेतो. आपण म्हणाल कीं, हा 'दैववाद' झाला. याच्याशीं आम्हाला काहीं करावयाचें नाहीं. साक्षात् परमेश्वर तर येत च आहे, पण जेव्हा 'आता परमेश्वर येणार आहे, आता परमेश्वर येणार आहे' अशी भावना सर्व लोकांत, सर्व सत्पुरुषांत जागृत होते, तेव्हा च परमेश्वराचा अवतार होतो. अशा स्थितींत जेथें अवतार होईल असें आम्ही म्हणतों, तेथें अवतार झालेला च असतो. जेथें 'परमेश्वर येत आहे' असं आम्ही म्हणतों तेथें अवतार झालेला च असतो. आता त्याला आणण्यासाठीं आपण जितका उशीर करू तितका उशीर लागेल तो आलेला च आहे. अवताराचें हे च रहस्य आहे. या दृष्टीनें आम्ही तयार झालों तर संमेलनात सर्व देशाचा संकल्प एकत्र होऊ शकतो. आज ती भावना आहे च. पण ती मनात च आहे.

## सामुदायिक पद यात्रेनें उत्साह

आता 'पगार इ० चा परित्याग आणि जिल्ह्यासाठीं एकेक मनुष्य' ही योजना चालू होईल. सामुदायिक पद-यात्रेमुळ ल्हान ल्हान लोक बाहेर पडू लागले आहेत. ५० जिल्ह्याचा एवढा मोठा उत्तर प्रदेश. मी तेथें दहा महिने फिरलो पण मी गेल्यानतर तो मृतवत् झाला. आमचे 'करण-भाई' जे 'अकरण भाई' झाले होते ते आज मला सागत होते कीं, 'आता मला आपल्याशी बोलण्याचें धैर्य आले आहे. कारण सामुदायिक पद-यात्रेमुळे आमच्या प्रदेशात उत्साह वाढला आहे. कार्यकर्त्यांना विश्वास वाटू लागला आहे कीं, आम्ही जनतेपर्यंत पोचू शकू, जी आमची जननी आहे ती मुलाचा स्वीकार करण्यास उत्सुक आहे.' अशा तऱ्हेनें दोन चार महिने असे काम चालले तर सर्व हिंदुस्थानात एक फार मोठी गोष्ट घडेल असे मला वाटते.

## अनेक प्रकारच्या समस्या

पुढील कार्यक्रमाची मीं काहीं योजना आखलेली नाहीं. मी चाचपडत आहे. कदाचित् तामिलनाडमध्ये च 'हिरण्मय' दर्शन घडावें अशी मला आशा वाटते. एकीकडून येथील लोकाना मीं एक तारीख दिली आहे कीं, '१३ मार्चला तामिलनाड सोडणार, परतु दुसरीकडे असें हि सांगितल आहे कीं, "मी येथें अनिश्चित काळपर्यंत हि राहीन. येथें काय घडतें त पाहून मी पुढे जाईन." आज हिंदुस्थानात अनेक प्रश्न आहेत. तामिल्नाडमध्ये मोठा प्रश्न हा आहे कीं, इतिहासकारानीं येथें आर्य व द्रवीड लोकात फार मोठा भेद निर्माण केला आहे. या प्रश्नाचा नाश या च चळवळीन होईल. आज गरीबाचें काम होत नाहीं. मग तो आर्य असो कीं द्रवीड. जर तें काम झालें तर एक मोठें कार्य झाल मुंबई-राज्यात तर प्रश्न च प्रश्न आहेत. तेथें एक काम झाले तर त्याबद्दल अनुकूल, प्रतिकूल, तटस्थ, मध्यम, सहायानुकूल सर्व प्रकारच्या प्रतिक्रिया झाल्या तेथ फार मोठ काम करावयाच आहे. पजाबची तर फार च मोठी दुर्दशा झाली आहे. तेथ शीख आणि हिंदु एकत्रित रहिले आहेत, पण त भयभीत आहेत. भूदाना-मुळें काहीं आत्मविश्वास जरूर निर्माण होत आहे.

## बिहारची जमीन वांटून टाका

बिहारमधील लोकांना मीं सांगितलें कीं, 'तुमच्यात जी शक्ति आहे तिच्यापेक्षा बलवत्तर शक्ति सर्व हिंदुस्थानात मला कोठे दिसली नाहीं. परंतु काहीं कारणाने तेथे अव्यवस्था आहे.' मीं त्याना सांगितले कीं 'तुम्हीं जोर करा आणि सर्व जमीन वाटून टाका. जमीन वाटणें कठीण काम आहे का?' ते सांगतात कीं, 'कायद्याच्या अडचणी आहेत. जमिनीचा नंबर इ० मिळत नाहीं.' मीं त्याना सांगितलें कीं, 'सर्व जमीन आपल्या देशाची च आहे. जितकें कार्य कायद्याने होईल तितकें कायद्यानें करा आणि जितकें कायद्याशिवाय होईल तेवढें कायद्याशिवाय करा. पण एकदा करून टाका. नंतर कटकटी उत्पन्न झाल्या तर होऊं द्यात. तक्रारी झाल्या तर काय होईल? वकिलाना काम मिळेल.' आज वकील लोक म्हणतात कीं, "भूदान चळवळीमुळे आमचा धंदा नीट चालत नाहीं." समजा, आम्हीं अयोग्य माणसाला जमीन दिली तर वकिलाचा धंदा चालेल; पण आम्हीं जाणूनबुजून चुकीची वाटणी केली तर ते अयोग्य काम होईल. तेथें काय परिस्थिति आहे हे मला माहीत नाहीं. कोणी मनुष्य 'मी मालक आहे' असें म्हणून जमीन दान देतो आणि आम्ही त्याची जमीन वाटतों. नंतर कळत कीं, तो मालक नाहीं. जर असें झालें तर कोर्टाचे काम वाढेल. म्हणून त्यात काळजी करण्याचे कारण नाहीं.

मीं विनोदानें म्हटलें कीं, "बिहारमधें असें सुंदर राज्य चालू आहे कीं, त्यापेक्षा अधिक शासनमुक्त समाज कोठे च नसेल. येथें राज्यकर्त्यांना हि पत्ता नाहीं कीं कोणाची जमीन कोठें आहे!" अशा स्थितींत कायद्यानें वाटणी करणे कठीण असलं तरी हि लवकर वाटणी करून टाका. नाहीं तर लोकाचे मनावर असा परिणाम होईल कीं, तुमच्यापाशीं पुष्कळ जमीन पडून आहे तरी हि ती वाटली जात नाहीं. अर्थात् आपली सर्व जमीन निरुपयोगी आहे, वाटण्यालायक नाहीं, सर्व च गोलमाल आहे, असे लोकांना वाटेल. म्हणून वाटण्यालायक जमीन लवकर वाटून टाका आणि जी जमीन कमी प्रतीची आहे तिची नंतर व्यवस्था करा. यामुळे बिहारची शक्ति रूप च वाढेल. मला विश्वास आहे कीं, बिहारचा ३२ लाख

एकराचा भाग-संकल्प जरूर पूर्ण होईल. उरलेली १२ लाख एकर जमीन मिळून जाईल असा जेव्हा मला विश्वास वाटला तेव्हा च मीं बिहार सोडला. तसा विश्वास वाटला नसता तर मीं बिहार सोडला नसता. बिहार-मधे आतापर्यंत मिळालेली जमीन वाटली तर बाकीची १२ लाख एकर जमीन निःसशयपणें मिळेल.

### ओरिसाकडून मला फार आशा आहे

ओरिसात नवबाबू वगैरे तयार झाले आहेत. तेथें खूप च काम चालेल. तेथील कामाच्या इतक्या शाखा आहेत कीं, त्या सर्वांचे काम पूर्णपणे पुढे चालू राहील. साराश, आपण सर्वजण धनच्छेद, प्रत्येक जिल्ह्यासाठीं एक मनुष्य व सामुदायिक पदयात्रा इ० च्या मार्फत क्रान्तीची तयारी करा. मीं ज्या गभीर गोष्टी सागितल्या त्यावर विचार करा. त्या केल्याने च क्रातीच्या दिशेने पुष्कळ प्रगति होईल आणि ती शीघ्र होईल.

पलनी ( मदुरा )
२१-११-'५६

## क्रान्तिकारी निर्णय : ३६ :

गाधीजींच्या निर्याणानतर गाधी विचारावर श्रद्धा ठेवणारे देशातील सेवक सेवाग्रामात एकत्र झाले आणि त्यानीं खूप विचारविनिमय करून 'सर्वोदयसमाजा 'च्या स्थापनेचा सकल्प केला. तो एक वैचारिक आणि क्रातिकारी सकल्प होता. त्यात विचार-परिवर्तन, हृदय-परिवर्तन आणि जीवन परिवर्तन अशा त्रिविध क्रिया समावलेल्या होत्या. अशा सकल्पाला क्रतु असें म्हणतात. अशा प्रकारे मार्च १९४८ मधे सेवाग्रामात 'सर्वोदय-क्रतु 'चा जन्म झाला.

### भूदान यज्ञाचा जन्म

क्रतूतून यज्ञाची निष्पत्ति होते च. 'अहं क्रतुः अहं यज्ञः ' हें गीता-

वचन सर्वांना माहीत आहे च त्यानुसार शिवरामपल्लीच्या सर्वोदय समेल्ना नंतर तेल्गणात अस्स्थितपणे आणि अभावित गतीने भूदान यज्ञाचा प्रादुर्भाव झाला गेल्या पाच वर्षांत या यज्ञाच्या एकेक कला प्रकट होत गेली सर्व सर्वोदय सेवक जणू काहीं तमस् मधून ज्योतीमध्यें आले गावो गावच्या लोकशक्तीचे ज दर्शन गेल्या पाच वर्षांत झाले तें अपूर्व होते या नवज्योतीचा प्रभाव सर्वोदयाच्या कार्यक्रमाच्या प्रत्येक शाखेवर पडला, आणि सर्वत्र चेतनेचा सचार झाला

## कुण्डच्छेदनामुळें च वैश्वानर प्रकट

नेहमीं लोकशक्तीचा नवा साक्षात्कार शून्या सचिताच्या आधारावर च होतो गाधीजींच्या स्मृतामुळे देशातील नेत्यानीं दूरदृष्टि ठेवून एक निधि गोळा केला होता तो आज हि तयार आहे आणि आपल्या कुशल योग्य सचाची वाट पाहात आहे या निधींतून भूदान आदोलनाला जी सहज मदत मिळू शक्त होती ती घेतली गेली व व ती घेणे योग्य हि होते, पण नवीन चेतनेला प्रथम साक्षात्कारात सचित जरी सहाय्यक होऊ शकलें तरी तो आधार प्राथमिक विकासानंतर हि चालू राहाण्यानें पुढील प्रगति थाबवू शकतो, जस मीं सागितले कीं, गाधी निधि जमविण्यात दूरदृष्टि खास होती पण सुदूर दृष्टि नाहीं मर्यादित दूरदृष्टि कधीं कधीं सुदूर दृष्टीला हानिकारक ठरते निधि आज हि आहे त्याचा मदत आज हि मिळत आहे व ती शिल्लक असेपर्यंत मिळत राहू शकेल, परतु मी वर्ष दीड वर्ष विचार करीत आहे कीं, तो आधार तोडल्याशिवाय वैश्वानर अग्नि प्रकट होणार नाहीं होमाग्नि प्रकट होऊ शकणार होता तो झाला परतु जोपर्यंत होमाग्नि कुडात च मर्यादित राहील तोंपर्यंत वैश्वानर अग्नीची आशा फोल आहे म्हणून कुण्डच्छेद करणे च – कुण्ड मोडून टाकणें च – भाग पडते

## सर्वजनावलबिततेचा सकल्प

आमचे सर्व सोबती यावर विचार करीत होते काहींच्या मनांत हो ना होतें च पण जस सत्तावन साल जवळ आलें तसें हो ना बद झाले आता जेव्हा 'सर्वोदय मित्र मडळी' पल्नी येथें विचार विनिमयासाठीं एकत्र

झाली तेव्हा निर्णय घेतला गेला कीं, आता भूदान यज्ञाला स्वावलंबी अर्थात् 'सर्वजनावलंबित' झालें पाहिजे. फ्रतूंन यज्ञ, यज्ञातून स्वधा हा क्रम च आहे ' अहं क्रतुः अहं यज्ञः स्वधाहम् । '

या निश्चयामुळे आता जनशक्तीचे अनंत प्रवाह वाहू लागतील. स्वधा म्हणजे आत्मधारणशक्ति ही एक आन्तरिक शक्ति आहे. म्हणून ते प्रवाह कशा प्रकारे निर्माण होतील याचा काहीं अंदाज हि घेता जाऊ शकत नाहीं.

## अनासक्ति व शोध

' जसजसा नवीन आधार मिळत जाईल, तसें सहाजिकपणें संचित हि सुटत च जाईल. ' हा विचार विचार नव्हे, एक मोहचक्र आहे.

' असंगशस्त्रेण दृढेन छित्वा । ततः पदं तत् परिमार्गितव्यम्

प्रथम अनासक्तीन याला तोडा. नंतर शोध करा. ही क्रान्तीची क्रिया आहे. आता शक्तीचा शोध आमचे हनूमान लावतील, अशी मला उमेद आहे. ज्या मातेने लाखो हातानीं भूमिदान दिलें, ती उदारतेची मूर्ति आहे. त्याच्यात मागण्याची शक्ति आहे, त्याला ती देते जर आम्हीं संचिताचा आश्रय घेतला नसता तर तिनें मागितल्याशिवाय हि दिलें असतें. पण हें आम्हाला सुचलें नाहीं. आम्ही ज्या स्थितींत होतों त्यात ते सुचू हि शकलें नसतें. आता सुचले आहे म्हणून मागणें भाग आहे आणि मिळेल हि.

कल्लालमपट्टी ( मदुरा )
२३-११-'५६

पत्नीच्या ठरावाचा अर्थ असा झाला कीं, मी नारायणाचा अनन्य-सेवक झालों. तुम्ही सर्वनारायण आहात. तुमच्याबद्दल मी अनन्यभावना ठेवली आहे. तुम्ही सर्व लोक हें काम कसे करणार ? त्यात कित्येक प्रकार असू शकतील. एका घरात पाच सहा भाऊ आहेत. त्यातील एका भावानें भूदानासाठीं आपला संपूर्ण वेळ द्यावा आणि त्याच्या चरितार्थाची जबाबदारी बाकीच्या चार-पाच भावानीं उचलावी. मोठ्या परिवारात एखादा मनुष्य अशा रीतीनें निभू शकतो. त्यासाठीं काहीं खर्च हि येणार नाहीं. तो आपली सर्व शक्ति भूदानासाठीं देईल आणि बाकीचे चार पाच भाऊ घराची काळजी करतील.

निधिमुक्तीची ही योजना बाबाच्या मनात गेल्या एक दोन वर्षांपासून चालू आहे. त्याची चर्चा हि कित्येक मित्रांशीं केली होती. एकदा राजेंद्र-बाबूंशीं हि याबाबत चर्चा झाली. त्यांच्यापुढे हि मीं हा च विचार मांडला.

### प्रत्येक कुटुंबाकडून

(१) प्रत्येक कुटुंबातील एक भाऊ सार्वजनिक सेवाकार्याला लागावा व बाकीच्या भावानीं त्याची सेवा करावी. हे ऐकून राजेन्द्रबाबू म्हणाले, ' त्याचा मला अनुभव आहे. माझ्या घरीं माझे भाऊ वगैरे घर सांभाळीत असत. यामुळे मी देशसेवेसाठीं मोकळा राहू शकत असें. जर त्यानीं माझी जबाबदारी घेतली नसती तर मी इतका मुक्त राहू शकलो नसतो. हे एक फार मोठें उदाहरण आपणाला मिळाले. तुम्ही त्याचें अनुकरण करू शकाल. असे कित्येक लोक आहेत कि.

### रचनात्मक संस्थाकडून

(२) सर्व रचनात्मक कार्यकर्ते आपल्या कार्याला लागले आहेत. त्याच्या चरितार्थाची योजना हि त्याच्या निर्माणकार्यातून होते. त्यानीं आपल्या *निर्माण कार्यात एक हिस्सा भूदानाचा आहे* असें समजावें. गावात ग्रामदान,

भूदान झाल्यानें त्याच्या आधारावर फार चांगलें निर्माणकार्य होऊं शकतें. त्यांनीं आपल्या कार्याबरोबर च भूदानाचें कार्य हि करीत जावें. त्यासाठीं कांहीं खर्च होणार नाहीं. उलट भूदानामार्फत निर्माणकार्य अधिक तेजस्वी होईल. हा रचनात्मक कार्य करणाऱ्या मदतीसंबंधीं विचार.

## सर्वोदय-प्रेमी मित्रांकडून

( ३ ) जे कोणत्या ना कोणत्या कार्याला लागले आहेत अशा काहीं सर्वोदय-प्रेमी मित्रांना आपलें घर चालवावें लागत; म्हणून त्यांची इच्छा असताना हि ते भूदानासाठीं वेळ देऊं शकत नाहींत. तरी हि ते आपल्यातील एका मनुष्याला सार्वजनिक सेवक म्हणून नेमू शकतील. त्याच्यासाठीं त्यांनीं आपापल्या संपत्तीचा एकेक हिस्सा द्यावा. एका मनुष्याच्या चरितार्थाला आवश्यक असेल तेवढें देण्याची योजना करावी. अशा प्रकारें ठिकठिकाणचीं मित्रमंडळी एक एक मित्र भूदानासाठीं देऊं शकतील.

## शिक्षकांकडून

( ४ ) ठिकठिकाणच्या शाळेतील शिक्षक स्वतः सर्वोदयाचा उत्तम अभ्यास करून आपल्या विद्यार्थ्यांना त्यात प्रवीण करूं शकतील. आपल्या पगारातील थोडा थोडा भाग देऊन ते एका विद्यार्थ्याला भूदानासाठीं तयार करूं शकतील.

## राजकीय पक्षांकडून

( ५ ) देशातील मोठमोठ्या संस्था भूदान मान्य करतात. त्या आपल्यातील काही कार्यकर्त्यांवर भूदान कार्याची जबाबदारी टाकूं शकतील. तामिल-नाडच्या प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें तसें केलें हि आहे. त्यांनीं या कार्यासाठीं श्री. गिरिमहाराजांना मुक्त केलें आहे. ते पुष्कळसा वेळ भूदानकार्या-साठीं देतात आणि प्रेमानें कार्य करितात अशा प्रकारें एकेका जिल्ह्या कडून व तालुक्याकडून योजना होऊं शकेल., अशा तऱ्हेनें मोठमोठ्या संस्था भूदान-कार्यासाठीं एकेक मनुष्य देऊं शकतील.

## दहा गांवांनी मिळून

(६) गावोगावचे लोक हि यात कार्य करू शकतील. त्यांनी आपल्या धान्यातील एक हिस्सा भूमिहीनांना व एक हिस्सा जे गावच्या हिताचें काम करतील अशा कार्यकर्त्यांना द्यावा. समजा, दहा गावासाठीं एक कार्यकर्ता काम करीत आहे तर त्याला महिन्याला पन्नास रुपये पाहिजेत. यापेक्षा जास्त देऊ नये फार मोठ्या परिवारातील मनुष्य तर येणार च नाहीं, म्हणून त्याचे पोट व परिवारासाठीं इतके पैसे पुरेसे आहेत. रुपयाचा प्रश्न नाहीं, आपण धान्य हि देऊ शकाल. दहा गावासाठीं एक कार्यकर्ता असेल तर प्रत्येक गावाला पाच रुपये च येतील. जर तो दहा गावाची चांगली सेवा करीत असेल व प्रत्येक बाबतींत गावाला मदत करीत असेल, तर महिन्याला पाच रुपयाचा बोजा फार नाहीं. त्यानें राजकीय भानगडींत पडू नये आणि निवडणुकींत हि भाग घेऊ नये. त्याने अहिंसा, सत्य, अपरिग्रह, अस्तेय यांचें व्रत घेऊन काम करावें. त्याच्या गरजा अगदीं कमी असाव्यात. तो लोकनीति मानणारा असावा व त्यानें निष्काम भावनेन सेवा करावी. लोकांची सतत सेवा करीत राहिल्यान लोक त्याला चांगल्या रीतीनें ओळखतील आणि तो गावच्या लोकांचा सेवक च होईल कोणती हि अडचण आली तर ते त्याला सांगू शकतील त्याची जबाबदारी घेणें दहा गावांना कठीण नाहीं

## दात्याकडून

(७) आतापर्यंत सुमारें पाच लाख लोकाहून अधिक लोकांनी दान केलें आहे. आता दाते लोकांनीं आपापला एकेक गट करावा आणि दुसऱ्यापाशीं जाऊन दान मागावें. सर्वच्या सर्व दाते हे कार्य करू शकणार नाहींत. कारण काहींना घरचें काम असेल. तरी हि शभरातून एक मनुष्य मिळाला तरी हि पाच लाख दात्यातून ५००० कार्यकर्ते निघू शकतील ही फार मोठी शक्ति होईल बाकीचे लोक संपूर्ण वेळ नाहीं तरी काहींना काहीं वेळ देऊ शकतील. अशाप्रकारें दान देणारे लोक या कामाची जबाबदारी घेतील तर फार मोठी शक्ति निर्माण होईल.

व्यापाऱ्यांकडून

(८) व्यापारी लोकांनीं हि यांत सहयोग द्यावा. ते गांवाचे अन्न खातात तेव्हां गांवाची सेवा त्यांनीं केली च पाहिजे. एका व्यापाऱ्यानें एका कार्य-कर्त्याची योजना केली तर त्याला हि सहजिकपणें सार्वजनिक सेवेचें पुण्य मिळूं शकेल.

अशा प्रकारें कार्यकर्त्यांचा एक समुदाय उभा करण्याचे अनेक प्रकार होऊं शकतील. जन-आधारित किंवा सर्व जनाचे आधारावर जे कार्यकर्ते तयार होतील ते चांगले च असतील. जर ते चांगले नसतील तर लोक त्यांना मदत करणार नाहींत. म्हणून ते सेवक सर्व दृष्टींनीं चांगले असले पाहिजेत. अशा प्रकारें निधीचा आधार तोडण्याचा जो निर्णय झाला तो पुष्कळ च लाभदायी आहे.

छत्रमपट्टी ( मदुरा )
२४–११–'५६

